


लेखक

र. गो. सरदेसाई



प्रकाशन : ता. १ सप्टेंबर १९४० ]                [ किंमत १॥। रुपये

## रघुनाथ गोविंद सरदेसाई

# यांचें वाङ्मय



### प्रकाशित

स्वाति ( कथासंग्रह )

चित्रा ( कथासंग्रह )

### आगामी



**कथासंग्रह :**

पुनर्वसु

पऱ्हेरीं

नवदल

तुसार

**लघुनिबंधसंग्रह :**

वामकुक्षींतील विचार

रजाचा गज

**विनोदी लेखसंग्रह :**

सुरसुरी

# स्वाति— लोकमत

सरदेसाई यांच्या लिखाणांत जिव्हाळा, तळमळ या गोष्टी प्रामुख्यानें दिसून येतात. मनुष्यस्वभावाचें सूक्ष्म नि मार्मिक अवलोकन करून त्याच्या छटा आपल्या कथांतून उतरविण्याचें कौशल्य श्री. सरदेसाई यांना सुरेख साधलें आहे.

— केसरी, २१-४-१९३९

स्वातींत खरीं कथामौक्तिकें आहेत.

— किर्लोस्कर, मे, १९३९

भावनांचें नाजूक रेखाटन, मनाचा वेध घेणारी वर्णनशैली आणि हृदयाला हलविणारे रसप्रसंग यांच्यामुळें हा कथासंग्रह सध्यां मराठी वाङ्मयांत पडत असलेल्या गोष्टींच्या श्रावणझडींत स्वातीच्या मौक्तिक बिंदूंसारखा रसिकांना वाटेल, हें निःसंशय.

— महाराष्ट्र, ११-६-३९

सरदेसाई यांची भाषा चांगली आहे– समर्पक उपमा व रूपकें हा त्यांच्या लेखनशैलीचा प्रभावी विशेष आहे."

— त्रिकाळ, २६-५-३९

कोणत्याही दर्जाच्या वाचकाला हा संग्रह हमखास आवडेल.

— चित्रमय जगत्, जून, ३९

'स्वाति' या लघुकथासंग्रहाकडे वरवर पाहणारांच्याहि प्रथमतः ही गोष्ट लक्षांत येईल, कीं 'स्वाति' नक्षत्रकाळांत पर्जन्यवृष्टीनें मौक्तिकरूप धारण केलेले हे कल्पना-जलकण सुंदर मोत्यांप्रमाणें पाणीदार, डौलदार, चमकदार आणि दर्शनीय आहेत. हा कथासंग्रह मौलिक तेजाचा मुक्ताहार आहे.

— ज्ञानप्रकाश, अग्रलेख, ५-५-३९

याखेरीज अनेक प्रमुख नियतकालिकांचे उत्कृष्ट अभिप्राय.



माझे मेहुणे

श्री. श्रीधर रघुनाथ वाकणकर

आणि

सौ. लक्ष्मीबाई वाकणकर

(बुधगांव)

यांस

चित्रा

रघुनाथ गोविंद सरदेसाई

# चित्रा







कॉन्टिनेन्टल बुक सर्व्हिस, पुणें २.

# खुषीच्या बायकोचा सक्तीचा नवरा

माझ्या बसायच्या खोलींत शिरतांच समोरच ज्या मुलीचा फोटो दिसतो, त्या मुलीनें माझ्या आयुष्यांत अतिशय मजेदार रीतीनें प्रवेश केला; आणि म्हणूनच तिची आठवण विसरणें मला तरी अशक्य आहे.

घरांत माझ्या लग्नाची वाटाघाट चालू झाल्यापासून उपवर मुलींच्या खानेसुमारीचें एक छोटेंसें ऑफिसच आमच्या घरांत उघडल्यासारखें झालें होतें. आणि अस्मादिकाची स्वारी या मुलींच्या मीनाबाजाराचें परीक्षकपद भूषवीत होती. अर्थातच, नव्यानेंच तंतुवाद्य छेडणारा जसा सुरेल स्वरापेक्षां बदसूरच अधिक काढतो, तद्वत् मी प्रथम-वर असल्यामुळें मुली पासापेक्षां नापास करण्याकडेच माझी प्रवृत्ति फार असे. या माझ्या चोखंदळ वृत्तीमुळें एक मुलगी पसंत करण्यासाठीं, मला बराच लांबचा व बऱ्याच ठिकाणचा प्रवास करावा लागला होता.

मी या वधू-परीक्षेच्या दौऱ्यावर असतांना हुबळी मुक्कामीं बेबीनें अभावितपणेंच माझ्या जीनव-ग्रंथांत आपल्या स्मृतीचें प्रकरण घुसडून दिलें.

हुबळी येथें असलेलीं आमच्या जातींचीं दोन-तीन स्थळें पाहण्यासाठीं आजच सकाळीं इथें येऊन, मीं माझ्या एका स्नेह्याकडे मुक्काम टाकला होता. सकाळचा वेळ गप्पा-टप्पा करण्यांत घालविल्यावर, भोजनोत्तर माझा मित्र आपल्या कामावर गेला आणि मी वामकुक्षीचा मधुर आस्वाद घेत माडीवर पडलों.

पोमेड लावून उलट फिरविलेल्या माझ्या डोकीच्या केसांवरून कुणी तरी हळुवारपणें आपला नाजूक हात फिरवीत आहे असा भास होऊन मी त्या सुरसुरींतून जागा झालों. डोळ्यांवर आडवा ठेवलेला हात दूर करून मीं पाहिलें--

कोणी तरी एक अनोळखी मुलगी चटकन् उठून बाजूला सरकली. मी जागा झालेला पाहून ती कांहींशी ओशाळल्यासारखी दिसली मला.

मीं तिच्याकडे वळून विचारलें,

" काय हवं तुला मुली ? "

" कांहीं नको."

असें तोंडांतल्या तोंडांत पुटपुटून ती चटकन् तेथून खालीं पळून गेली. छोकरी कोण बरें असावी असा मनाशीं विचार करीत मी पुन्हा पूर्ववत् डोळ्यांवर हात टाकून निद्रादेवीची आराधना करूं लागलों.

पण थोड्याच वेळांत पुन्हा तोच मघांचा नाजूक स्पर्श माझ्या डोक्याला जाणवूं लागला.

पुन्हा परत आली वाटतें ती चिमुरडी !

ती काय काय करते तें तरी पाहावें या उद्देशानें मी माझी जागा तिला न देण्याचें ठरवून तसाच स्वस्थ पडून राहिलों.

ती पोरगी केसांवरून हळूहळू हात फिरवीत तोंडानें एक गोड गाणें गुण-गुणूं लागली.

जणूं काय मघांशीं मला झोपेमधून जागें केल्याबद्दल हें अंगाईगीत म्हणून ती मला निजवूं पाहत होती.

किती मधुर होता तिचा आवाज ! जणूं काय दिलरुबाच !

मला मोह आवरला नाहीं. पहिल्यासारखी ती पुन्हा खालीं पळून जाऊं नये म्हणून मीं चटकन् तिचा हात पकडला नि हसत हसत म्हटलें,

"कशी पकडली एका मुलीला? मघां पळून गेलीस नाहीं का?"

ती किंचित् लाजली आणि मोहक हसली.

किती गोड दिसली ती त्या वेळीं!

तिचे दोन्ही गोंडस हात माझ्या हातीं घेऊन तिच्या आरक्त गौर वदनावर नजर रोखून मीं विचारलें,

"नांव सांगणार ना तूं आपलं मला?"

"बेबी—"

माझ्या नजरेला नजर भिडविण्याचा अयशस्वी प्रयत्न करीत ती बोलली.

"कुठं राहतेस तूं?"

"शेजारीं. इथं मुलांच्या बरोबर खेळायला येतें मी रोज."

आतां बेबी किंचित् धीट होऊं लागली असल्याचें त्या तिच्या उत्तरावरून मीं ओळखलें.

"मग आज खेळायचं टाकून इथंशी बसलीस एकटीच?"

माझ्याकडे एकवार साभिप्राय पाहून बेबी उत्तरली,

"उगीच!"

"मग बाकीचीं मुलं वाट पाहत असतील ना तुझी?"

"हो."

"पण तें मघांचं गाणं चांगलं मोठ्यानं म्हणून दाखवल्याखेरीज कांहीं एका माणसाला आम्ही आज नाहीं सोडणार खेळायला."

तिनें अर्थपूर्ण नजरेनें माझ्याकडे पाहिलें.

जणूं तिला म्हणायचें होतें—

"असं?"

"मग म्हणणार ना तें मघांचं गाणं?"

किंचित् लाजत-मुरकतच तिनें पद म्हणण्यास सुरुवात केली. पण पद म्हणतां म्हणतां तिची संकोचवृत्ति आपोआप नाहींशी झाली आणि त्यामुळें पदाला रंगहि चांगला भरला.

पद संपल्यावर मात्र मीं तिला जाण्यास परवानगी दिली.

तिच्या पाठमोऱ्या आकृतीकडे पाहत असतां मला गडकऱ्यांची चिमुकलीच कविता आठवली. किती सुंदर दशवर्षा कन्यका ही! सारे अवयव कसे रेखीव चित्रासारखे जेथल्या तेथें प्रमाणबद्ध बसलेले. आणि त्यांत गुडघ्यांपर्यंत पोंचणारा बिनबाह्यांचा व उघड्या गळ्याचा तंग झगा व तशीच तंग चड्डी! या तिच्या रेशमी पोषाकामुळें तर तिच्या मूळच्या मोहक अवयवांना मनोहर उठावदारपणा आला होता. तिच्या हातांइतक्याच नाजूक हस्तिदंती बिलवरांनीं समसमां संयोग घडवून आणला होता. गळ्यांत एक छानदारशी चेन रुळत होती. डोकींत उजव्या बाजूला काळा 'बो' होता आणि लांबसडक केसांची वेणी पाठीवर मोकळी सोडलेली होती. अंगठीचा खडा घासूनपुसून चकचकीत ठेवावा, तद्वत् बेबीच्या नैसर्गिक सौंदर्याची मोहमुग्धता प्रसाधनांनीं तेवती ठेवण्याचा प्रयत्न तिच्याकडे पाहतांच नजरेस येई.

बेबीची आणि माझी पहिलीच दृष्टि-भेट होती. पण एकदांच पाहूनहि एखाद्या सौंदर्यस्थळाबद्दल चित्रकाराला जसा एकाएकीं आत्मभाव वाटूं लागतो, तद्वत् बेबीविषयीं मला औत्सुक्य वाटूं लागलें. म्हणून संध्याकाळच्या चहाच्या वेळीं माझ्या मित्राच्या छोट्या भावाला मीं विचारलें.

"काय रे मधू, तुझ्याबरोबर खेळायला कोण कोण मुलं येतात रे रोज?"

"मुलं होय?" खेळ आणि मुलें म्हणतांच खुललेला मधू सांगूं लागला, "विनू, सुऱ्या, बेबी आणि नली..."

"ही बेबी कोण रे?"

मीं मधेंच त्याच्या धावत्या गाडीला ब्रेक घातला.

किंचित् हसल्यासारखें करून मधू म्हणाला,

"आहे झालं अशीच खैंपळांपैकीं."

"खैंपळ म्हणजे रे?"

पण माझ्या पश्नाचें उत्तर देण्यापेक्षां चहा पिण्यासाठीं आईनें मारलेली हाक अधिक महत्त्वाची वाटल्यावरून मधू आंत पळाला.

आणि नंतर इतर उद्योगांत मी गुंतल्यामुळें त्या दिवशीं तो विषय तितकाच राहिला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं एक स्थळ पाहण्यांत सारा वेळ गेला. दुपारचें जेवण करून मी माडीवर येतों, तों कालच्या जागीं माझ्या आधींच बेबी तयार! ती माझीच वाट पाहत असावीसें दिसले. कारण, मी येतांच सावरून बसून स्मितपूर्वक तिनें मजकडे पाहिलें. मींहि हसून विचारलें,

"काय बेबी, झालं जेवण?"

"हो, केव्हांच!"

"काय काय केलं होतं जेवायला आज तुमच्याकडे?"

"रोजचंच. भात, भाकरी, भाजी."

"तुझ्या घरीं कोण कोण मंडळी आहेत?"

"मी, आई आणि रुद्राप्पा."

"रुद्राप्पा काय करतो तुझा?"

"घरांतलं सगळं काम करतो तो."

"आणि तूं ग?"

माझ्या प्रश्नाचा रोख समजून बेबी काहींशी लाजून हसली. तिनें आपल्या झग्याच्या पांढऱ्या शुभ्र झालरी आपल्या सुकुमार मांडीभोवतीं चोपून साफ बसविण्यास सुरुवात केली.

मीं तिला माझ्याजवळ ओढून घेतली. तिनेंहि आज बिलकुल नाखुषी दाखविली नाहीं. तिचे दोनहि खांदे दोन्ही हातांनीं दाबून हलवीत मीं हसत म्हटलें,

"आतां आणखी एक काम आहे माझं. ओळख पाहूं?"

" माझ्याकडे आपल्या पाणीदार डोळ्यांतून एक तिरपा कटाक्ष फेकून बेबी म्हणाली,

"गाणं म्हणायचं एक? होय ना? कसं ओळखलं?" असें म्हणून बेबी मोकळेपणानें खुदकन् हसली. मीहि मनापासून हसलों आणि आमच्या मनांत किंचित्माल उरलेला परकीपणा यामुळें दूर होऊन त्या जागीं आपुलकीचा स्नेहभाव निर्माण झाला.

नंतर आम्ही खूप बोललों, हसलों, खेळलों, नाना गमती केल्या.

पुढें मी तेथें तीनचार दिवस होतों तेवढ्या मुदतींत बेबी पळभरहि मला विसंबून राहीनाशी झाली. दोन वेळ जेवण व रात्रीची झोप एवढ्यापुरतीच

काय ती, ती आपल्या घरीं जाई; उरलेला सारा दिवस ती पाळीव मांजरासारखी माझ्याभोंवती-भोंवतींच फिरत राही. तिच्या मधुर सौंदर्यामुळें व गोड स्वभावामुळें मलाहि तिचा ळळा लागत चालला होता. हुबळीच्या माझ्या मुक्कामांत बेबी व मी अवघे चार दिवसच एकत्र आलों, पण कांहीं तरी पूर्व लाग्याबांध्यामुळें आमच्यांत पुष्कळ वर्षांच्या सुहृद्भावासारखें प्रेम उत्पन्न झालें.

बेबीचा तर माझ्यावर एवढा लोभ जडला या चारपांच दिवसांत, कीं आपल्या बरोबरीच्या सगळ्या संवगड्यांना ती जणूं पार विसरून गेली. या चार दिवसांत ती त्यांच्याबरोबर खेळावयाला अशी एकदांहि गेली नाहीं. सारा दिवस माझ्या पाठीवर ! न जाणो कदाचित् मी एकदम आलों तसाच एकाएकीं कोठें तरी गडप होईन, अशी भीति तिला वाटत असावी.

पण बेबीनें मला कितीहि मोह लावला असला, तरी हुबळीचीं दोनतीन स्थळें पाहून झाल्यावर, मला परत जाणें भागच होतें. आणि तो समयहि पण नजीक आला. तेव्हां एके दिवशीं मीं बेबीला म्हटलें,

"बेबी, मी उद्यां जाणार आमच्या गांवाला."

"कुठं आहे तुमचं गांव ?"

"खूप दूर आहे."

"आणि परत केव्हां येणार ?"

"अग परत कशाला यायचं ? माझं काम तर संपलं इथलं !"

"मग मी येऊं तुमच्याबरोबर गांवाला ? मला नाहीं करमायचं तुमच्याशिवाय एकटीला—"

तिचा प्रश्न ऐकून मला मनांत आनंद झाला, पण तो फार वेळ टिकला नाहीं. बेबी कुणाची मुलगी ? तिला मी कसा नेऊं शकणार आपल्याबरोबर? परक्यांच्या मुलावर प्रेम करतां येईल, पण आपलेपणाचा हक्क कधीं तरी सांगतां येईल का ? बेबीला बरोबर नेणें माझ्या स्वाधीनची गोष्ट नव्हती, म्हणूनच मी तिची समजूत काढूं लागलों. पण त्याचा परिणाम उलटाच झाला व माझ्याबरोबर येण्याचा तिनें हट्टच धरला.

तेव्हां तिची समजूत घालण्यापुरतें मीं तिला न्यावयाचें कबूल केलें. तेव्हां तिला इतका आनंद झाला, कीं ती उद्या मारीतच आपले कपडेलत्ते

आणण्यासाठीं धावतच घरीं गेली; —आणि थोड्याच वेळांत आपल्या सामानाचें छोटेंसें बोचकें घेऊन ती आलीहि!

" चला जाऊं या तुमच्या गांवाला; झाली माझी तयारी."

तिची ती धांदल व गडबड पाहून मला हसूं आलें. पण तिला वाईट वाटूं नये म्हणून तें दाबून मीं म्हटलें,

" अग खुळे, आतां नाहीं जायचं कांहीं. उद्यां मीं मोटर बोलावली आहे तींत बसून जायचं."

तिचा कांहींसा हिरमोड झालेला दिसला, तेव्हां तिला माझ्या बोलण्याचा विश्वास वाटावा म्हणून मीं म्हटलें,

" बरं, आतां तूं आपलं सामान आणलंच आहेस तर ठेव इथं. उद्यां सकाळीं मोटर आली, म्हणजे हाक मारीन मी तुला."

" खरंच ? अगदीं खरं ?"

" हो, अगदीं खरं."

माझ्या या आश्वासनानें त्या विश्रब्ध जीवाला वाटलेला आनंद पाहून मला कसेंसेंच वाटलें. या प्रेमळ बालजीवाची आपण धडधडीत फसवणूक करीत आहोंत ही जाणीव मला बोंचूं लागली. पण काय करणार? प्रेमानें अंडें उबविण्याचे श्रम घेतले, म्हणून कोंकिळेच्या पिलावर कावळ्याला कधीं तरी हक्क सांगतां येईल का ?

बेबीला चुकविण्यासाठीं मी मोटर मुद्दाम पहाटेस घरीं बोलावली होती. पण आश्चर्य हें, कीं मोटर आल्याची वर्दी मला खुद्द बेबीनेंच येऊन दिली! कोण जाणे कसें कळलें तिला तें. पण माझ्या आधींच उठून ती तयार होती.

आतां मात्र प्रश्न बिकट होता. पण बेबीची उत्कट इच्छा पाहून तिला न्यावयाची परवानगी तिच्या आईकडे मागावयाची असें मीं ठरविलें व बेबीला म्हटलें,

" चल, तुझ्या आईला विचारून येऊं."

माझ्यापुढेंच बेबी पळत घरीं गेली व तिनें आईला ओढीतच दारापर्यंत आणली.

तिच्या व तिच्या घराच्या पहिल्याच दर्शनानें मीं ओळखलें कीं—

" खैंपळे म्हणजे भावीण."

पण त्या वेळीं हा विचार करावयाला अवसर नव्हता.

मीं सरळ पुढें होऊन विचारलें,

" बेबी माझ्याबरोबर येते म्हणूं लागली आहे आमच्या गांवीं. नेऊं का तिला चारआठ दिवस ?"

" हो-हो, न्या कीं. कांहीं हरकत नाहीं."

इतक्या अनपेक्षितपणें एकदम होकार मिळेल अशी माझी अपेक्षा नव्हती. त्यामुळें या उत्तरानें मीं चकितच झालो. एकंदरींत लेक तशीच आईहि आहे म्हणावयाची !

" पण पाठवून कुणाबरोबर द्याल परत ?"

" हे पलीकडचे आमचे पाहुणे येणार आहेत तिकडे आठचार दिवसांत. देईन पाठवून त्यांच्याबरोबर."

" बरं बेबी, नीट वाग हं. त्यांना त्रास नाहीं द्यायचा बरं का !"

" नाहीं ग आई. बघ तरी तूं!"

आणि बेबीनें आईला दिलेलें वचन प्रवासांतच काय, पण आमच्या घरीं येऊन राहिल्यावरहि पूर्णपणें पाळले यांत शंका नाहीं. घरीं कोणालाहि, तिचा कसलाहि त्रास नसे. उलट ती सर्वांना हवीहवीशी वाटे. सर्वांशीं ती आर्जवीपणानें व गोडीनें वागे. आपलें ठराविक काम वेळेवर, बिनचूक करी. सकाळीं तोंड धुण्यापासून रात्रीं आपलें अंथरूण आपण घालण्यापर्यंत स्वतःची सारीं कामें बेबी झटपट व लख्ख करी, त्यामुळें आईला व बाबांना बेबी फार प्रिय झाली.

हुबळीप्रमाणेंच आमच्या घरींहि दिवसाचा पुष्कळसा वेळ बेबी माझ्या सहवासांतच घालवी. माझ्याबद्दल तिला काय वाटत होतें कोण जाणे ! पण

हुबळीला मला पहिल्यापासून बेबी जी माझ्याकडे आकर्षित झाली, ती तिची भावना उत्तरोत्तर वाढतच गेली. आणि आमच्या घरांत आल्यापासून तर ती माझीं कांहीं कांहीं कामें न सांगतांच आपण स्वतः होऊन करूं लागली. माझी बसावयाची खोली झाडून स्वच्छ करणें, सामानाची नीट व्यवस्था ठेवणें, माझे कपडे स्वच्छ राहतील अशी निगा राखणें, माझें अंथरूण घालणें, काढणें, सकाळीं बिनचूक दाढीसाठीं ऊन पाणी आणून देणें, चहा आणून देणें, आंघोळीची तयारी करणें वगैरे माझीं बरींचशीं कामें बेबी आपण होऊन व कांहींशा हक्कानें करूं लागली. माझीं असलीं कामें करणें जणूं काय आपलें कर्तव्यच आहे अशी तिची समजूत झाल्याचें तिच्या वर्तनावरून एखाद्याला वाटावयाचें! कारण, माझें कांहीं काम दुसऱ्या कोणी केल्यास तें बेबीला मुळींच पसंत पडत नसे. बेबीच्या या वागणुकीमुळें मीं सहज थट्टेनें बोललेल्या शब्दांनीं मूर्तरूप घेतलें कीं काय अशी शंका केव्हां केव्हां मला येई!

हुबळीहून मी परत आलों, तेव्हां माझ्याबरोबर आलेल्या अनोळखी बेबीला पाहून आईनें विचारलें होतें,

"ही रे कोण आणलीस बरोबर?"

"तुझी सून!" मीं हसत म्हटलें, "का? पसंत पडते का सूनबाई!"

आई फक्त हसली आणि नमस्कार करण्यासाठीं वाकलेल्या बेबीला उद्देशून कांहीं आशीर्वाद पुटपुटली.

तेव्हां मीच पुढें म्हणालों,

"माझं लग्न लवकर व्हावं अशी तुझी इच्छा होती ना? म्हणून तर हुबळीला पाहिलेल्या स्थळांपैकीं पसंत पडलेल्या मुलीशीं लग्न करून घेऊनच आलों परत."

"मग तुला दोन बायकांचा दादला व्हावं लागणार तर!" आईहि थट्टेनें हसत म्हणाली. "कारण तुला पसंत पडलेली ती बापटांची सरला ते आमच्या इथं द्यायला तयार आहेत. बोलणंहि ठरलं त्यांचं न् ह्यांचं."

आणि आईचें हें बोलणें खरें असल्याचें संध्याकाळीं बाबांनीं कचेरींतून आल्यावर मला स्पष्टच सांगितलें. सरला मीं पूर्वी पाहिलीच होती. हुंड्या-पांड्याबाबत थोडा वांधा पडून तें स्थळ जुळणार नाहीं असें वाटत होतें,

म्हणून मी इतर स्थळें पाहत होतों. पण माझ्या गैरहजेरींत बापटांचा व बाबांचा विचार होऊन याद्या करण्यापर्यंतहि मजल गेली होती.

हुबळीहून परत आल्यावर सुमारें तीन आठवड्यांनीं सरला बापट इचा माझ्याबरोबर विवाह झाला. या विवाहसमारंभांत विशेष सांगण्यासारखी गोष्ट म्हणजे बेबीची वर्तणूक. घरांत लग्नाची तयारी सुरू झाल्यापासून बेबी मोठ्या उमेदींत होती. जणूं काय ती तयारी तिच्या स्वतःच्याच लग्नाची होती! अपूर्व उत्साहानें व आगळ्या उल्हासानें ती ते पंधरा दिवस घरांत वावरत होती! आपलें घरदार सोडून आमच्या परक्या घरांत येऊन राहिलेली पोर या दृष्टीनें मी व घरांतील इतर मंडळी बेबीला विशेष सवलतीनें वागवीत असूं. लग्नांत तिला नेसण्यासाठीं रेशमी साड्या व झंपर्सहि आणून दिले होते. एकंदरींत बेबी मोठ्या थाटांत होती आणि ती आनंदांत असल्याचें पाहून मलाहि सुख वाटत होतें.

पण माझी सुखाची भावना संभ्रमित होण्यासारखा एक प्रसंग लग्नाच्या आदल्या रात्रीं घडून आला.

त्या रात्रीं बेबी जी माझ्या खोलींत आली, ती कोपऱ्यांत जाऊन फुरंगटून बसली.

मीं विचारलें,

"काय ग बेबी, काय झालं तुला रुसायला?"

उत्तर नाहीं.

मीं आणखी एकदोन वेळ तो प्रश्न विचारला, पण बेबीनें उत्तराऐवजीं स्फुंदस्फुंदून रडण्यास सुरुवात केली. तेव्हां जवळ जाऊन तिला तिच्या इच्छेविरुद्ध ओढून बैठकीवर आणलें आणि समजुतीच्या स्वरानें म्हणालों,

"बेबी, असं काय करावं वेड्यासारखं बरं? तुला काय झालं, सांग ना?"

"तुम्ही फार वाईट आहांत."

एवढेच शब्द कसेबसे उच्चारून तिनें जोरानें हुंदके देण्यास सुरुवात केली. हा काय प्रकार आहे माझ्या ध्यानींच येईना. म्हणून मी हताशपणें म्हणालों,

"पण बेबी, असं मीं केलं तरी काय तुझं?"

"तुम्ही त्या सरला बापटशीं कां लग्न करतां?"

बेबीनें एकदम सरळ प्रश्न केला.

मी गोंधळून म्हणालों,

"मग काय करूं?"

"तुम्ही माझ्याशीं लग्न करा, मी काय रूपानं वाईट आहे, कीं स्वभावानं चांगली नाहीं?"

बेबीची ही विलक्षण मागणी पाहून मी हतबुद्धच होऊन गेलों! बेबी माझ्याकडे अशा कांहीं दृष्टीनें पाहत—वागत असेल अशी कल्पना मला स्वप्नांतहि कधीं शिवली नाहीं.

बेबीची नाना प्रकारांनीं समजूत घालण्याचा मीं प्रयत्न केला. पण तिनें आपला हेका कांहीं सोडला नाहीं. आमचें लग्न होणें कां अशक्य आहे याचीं व्यावहारिक कारणें तिच्या बालमनास सांगून पटण्यासारखीं नव्हतीं, आणि सामदामानें तिचें मन फिरेना, तेव्हां तिच्या मनाच्या समजुतीपुरतें मीं तिला लग्नाचें आश्वासन दिलें, तेव्हां कुठें तिच्या मनाचें समाधान झालें!

पण माझें शाब्दिक आश्वासन तिनें कल्पनेबाहेर प्रत्यक्षांत आणून दाखविलें. दुसऱ्या दिवसापासून सुरू झालेल्या लग्नसोहळ्यांत अगदीं थेट नियोजित वधूसारखे सारे प्रकार तिनें आपण स्वतः केले व मलाहि करावयास लावले. नवा पोषाक तर तिनें चढविलाच, पण आईकडून कांहीं दागिनेहि मागून घेऊन तिनें आपला देह शृंगारला. सीमांतपूजनापासून मांडवपरतण्यापर्यंतच्या सर्व धार्मिक व व्यावहारिक विधींत बेबी मला सोडून पळभरहि कोठें दूर झाली नाहीं. वस्तूला चिकटलेल्या छायेसारखी ती माझ्याबरोबर होती. आणि सरलेला त्या समारंभांत जे जे विधि करायला सांगितले जात, ते ते तिच्या-नंतर कोणी न सांगतांच बेबी आपणहून न विसरतां बिनचूक करी! लग्नघरीं गेल्यावर सरलेजवळ ती अंतरपटाच्या बाजूस अधोवदन उभी राहिली. होम-हवनाच्या वेळीं माझ्या शेजारीं बसून राहिली. सरलेच्या मागून सप्तपदीं कर-ण्यासहि तिनें कमी केलें नाहीं. रासन्हाण, विड्या तोडणें, सुपारी सोडवणें, घास देणें, नांव घेणें वगैरे लौकिक प्रकार तर सरलेच्या बरोबरीनें बेबीनें केले व आपल्याबरोबर मलाहि करावयाला लावले. तिच्या या चाललीला समजून कोणीहि तिला हरकत केली नाहीं. उलट सर्वजण कौतुक करण्याच्या मिषानें तिला उत्तेजनच देत होते!

या साऱ्या सोहळयांत बेबी फार आनंदांत होती. माझी बायको होण्यास ती स्वखुषीनें तयार होती. आपलें खरेंच लग्न होत आहे अशी तिची दृढ भावना होती. पण तिचें नवरेपण मात्र तिनें माझ्या गळ्यांत सक्तीनें बांधलें होतें. हें काय नसतेंच लचांड बेबीच्या प्रकरणांतून उत्पन्न झालें असें राहून राहून मला वाटत होतें; पण बेबीच्या कोणत्याहि इच्छेला विरोध करणें मला त्या वेळीं शक्य नव्हतें. कारण, तिच्या कलानें नाहीं घेतलें तर ती काय करील याचा नेम नव्हता. बालहट्ट आणि स्त्रीहट्ट तिच्या ठिकाणीं एक झाले होते. त्यामुळें माझी तोंड दाबून बुक्कयांचा मार म्हणतात तशी अवस्था झाली.

एकदां तर तिनें मोठा बेमालूम प्रसंग आणला होता. आमची वरात मोठ्या थाटांत चालली होती मिरवत गांवांतून. वरातीच्या मोटारींत एका बाजूस माझी पत्नी सरला होती व दुसऱ्या बाजूस बेबी होती. वरात सुरू असतांना बेबी एकाएकीं हुंदके देऊं लागली आणि अंगावर घातलेल्या दागिन्यांपैकीं एकेक भराभर काढून माझ्या अंगावर फेकूं लागली. आतां काय करावें या विलक्षण मुलीला! बऱ्या समजुतीनें गप्प नाहीं झाली, तर या मंगलसमयीं पै-पाहुण्यांदेखत भलताच प्रसंग ओढवायचा!

मीं किंचित् घाबरून विचारलें,

"बेबी, काय झालं असं खुळ्यासारखं करायला?"

"मला नकोत तुमचे हे दागिने!" धुसफुसत बेबी उद्गारली.

"आतां कांहीं तुमचं पहिल्यासारखं माझ्यावर प्रेम राहणार नाहीं, मग कशाला हवेत हे दागिने मला तुमचे?"

"पण सांगितलं कुणी तुला, कीं माझं तुझ्यावर प्रेम राहणार नाहीं म्हणून!"

"सांगायला कशाला हवं! आतां या थोरल्या बायकोवर तुमचं प्रेम बसणार, मग मला कोण विचारणार?"

बेबीच्या या विलक्षण त्राग्याचें कारण समजून आल्यावर तशाहि स्थितींत मला हसूं आल्यावांचून राहिलें नाहीं. बेबीच्या पाठीवरून हात फिरवीत मीं हसून म्हटलें,

"हा खुळे! म्हणून का रुसलीस तूं? अग वेडे, दोन बायका असल्या म्हणजे धाकट्या बायकोवरच फार प्रेम असतं. माझं तुझ्यावरच प्रेम राहील."

" खरं हो अगदीं ?"

" अगदीं खरं. विचार हवं त्याला."

आजूबाजूस नजर फिरवून बेबीनें पाहिलें व मोटरबरोबर चालणाऱ्या माझ्या मित्रास—शामरावास—तिनें तो प्रश्न विचारलाहि. शामराव कांहीं तरी थट्टेचें उत्तर देणार होता. पण मीं त्याला खुणाविलें तेव्हां बेबीच्या मनासारखें उत्तर मिळून तिचें समाधान झालें आणि तिनें उतरलेले दागिने फिरून घालून घेतले.

पण दुसऱ्या दिवशीं तिनें याहीपेक्षां बहार केली !

लग्नांतला कांहीं तरी विधि सुरू होता. मी व सरला बसलों होतों. सर्व मंडळीहि जमली होती. इतक्यांत स्वतःच्या कपाळाला मुंडावळ्या बांधलेली बेबी कोठून तरी आली आणि हातांतून आणलेल्या दुसऱ्या मुंडावळ्या तिने मला बांधावयास लावल्या. नंतर जमलेल्या मंडळींना तिनेंच अक्षता वाटल्या आणि एक पंचा आणून व तो अंतरपटासारखा मधें धरून तिनें मंडळींना आम्हां दोघांवर अक्षता टाकावयास लाविलें, तेव्हां कोठें तिच्या जिवाला निश्चिंती वाटली ! !

अशा रीतीनें एकाच लग्नांत दोन बायका मिळविण्याचा मान बेबीनें माझ्या पदरांत बांधला !

लग्नानंतर माझा व सरलेचा फोटो काढण्यांत आला त्यांतहि बेबीची स्वारी हजर ! इतकेंच काय, पण तिनें माझा व आपला एकटीचा असाहि एक फोटो आग्रहानें काढवून घेतलाच !

हाच फोटो माझ्या बसावयाच्या खोलींत शिरतांच समोरच लावलेला असून त्यामुळें माझ्या आयुष्यांतील या विचित्र घटनेची आठवण मला नेहमीं होते.

पण मला सर्वांत अधिक त्रास झाला असेल आणि अतोनात दुःख झालें असेल तर तें बेबीला परत पाठवून देण्याच्या वेळीं.

लग्नाला आलेला हुबळीचा मित्र शामराव परत निघाला तेव्हां, घरची सोबत बघून बेबीला परत लावून देण्याचें मीं ठरविलें. चार दिवसांच्या बोलीनें तिला आणली, त्याला चार आठवडे होऊन गेले. दुसऱ्याची मुलगी किती दिवस अशी ठेवून घ्यायची ?

पण परत हुबळीला जाण्यास बेबी कांहीं केल्या तयार होईना. सर्वांनीं सर्व प्रकारें सांगून पाहिलें. पण तिचा आपला हुकमी एक्का—

"माझं लग्न झालंय् नि मी आतां इथंच नवऱ्याजवळ राहणार!"

अखेरीस त्या प्रेमळ निष्पाप जीवाला फसविण्यासाठीं मला एक घाट घडवून आणावा लागला. मीं सरलेला माहेरीं पाठवून दिली, आणि नंतर बेबीला म्हटलें,

"हें बघ बेबी, लग्न झाल्यावर पहिली मंगळागौर माहेरीं करायची असते. ती सरला बघ गेली माहेरीं मंगळागौर करायला. तूं मंगळागौर पुजणार नाहीं का? पहिली मंगळागौर झाली, कीं मग आणीन तुला परत, हं."

"खचित?"

"खचित."

या युक्तीनें त्या भोळ्या जीवाची हुबळीस रवानगी करतां आली खरी, पण तिच्या मनांतलें हें लग्नाचें वेड कांहीं अद्याप गेलेलें नाहीं. कारण अजूनहि मला तिचीं जीं पत्रें येतात त्यांखालीं सही असते—

**"आपली, सौ. बेबी"**

लेखनकाल—ऑक्टोबर, १९३४.

---

# पृथ्वीप्रदक्षिणा !

घड्याळांत एक, दोन, तीन असे एकामागून एक अकरा ठोके पडलेले भास्करनें पलंगावर पडल्या पडल्या मनांतल्या मनांत मोजले आणि तो स्वतःशींच चमकला ! 'काय, अकरा वाजले !—तरी झोप कशी ती येत नाहीं अजून ? कां तीहि गेली सत्यभामेबरोबर पुण्याला ?' असें कांहीं तरी तो स्वतःशीं पुटपुटला. आणखी कांहीं वेळ त्यानें अंथरुणांत शरीराची बरीचशी चाळवाचाळव करून पाहिली, पण व्यर्थ ! रोज नवाच्या ठोक्याला त्याच्यावर आपला अंमल सुरू करणारी निद्रादेवी आज कांहीं केल्या त्याच्यावर प्रसन्न होण्याचें चिन्ह दिसेना.

अखेर थोडासा वैतागून भास्कर पलंगावरून उठला; व त्यानें टेबलाशीं जाऊन टेबललॅम्प पेटविला. आपल्या दोन्ही हातांचे कोपर टेबलावर टेकवून पंजाच्या कुबडींत तोंड खुपसून बोटांनीं तो आपल्या लांबसर केसांची चाळवाचाळव करूं लागला. त्याचे डोळे कांहींसे तारवटल्यासारखे त्याला समोरच्या आरशांत दिसूं लागले.

टेबलावरील आरशाशेजारींच सत्यभामेचा कार्डसाइज फोटो एका सुंदर चौकटींत बसविलेला होता. तिकडे भास्करची नजर गेली. कांहीं क्षण तो त्या फोटोकडे अनिमिष नेत्रांनीं पाहतच राहिला. जणूं सत्यभामेची छबी तो आज प्रथमच पाहत होता!

पाहतां पाहतां त्याला भास झाला कीं, सत्यभामा आपल्याला हसत आहे. डोळे चोळून त्यानें फोटोकडे पाहिलें तरी तेंच कांहींसें मिस्किल हसूं त्याला फोटोंतील सत्यभामेच्या चेहऱ्यावर दिसत होतें. क्षण दोन क्षण त्या भासाकडे डोळे विस्फारून पाहिल्यावर भास्कर स्वतःच खुदकन् हसला आणि फोटोंतील सत्यभामा समोर प्रत्यक्ष उभीच आहे अशा थाटांत म्हणाला,

" लबाड! समजलों तूं कां हसतेस तें आणि खरं सांगूं तुला? आतां माझं मला सुद्धां हसूं येतं त्या गोष्टीचं. किती मूर्ख होतों मी त्या वेळीं! एरवीं मी तुझ्यासारखं रत्न हातीं लाभलं असतां तें असं दूर का लोटलं असतं? "

असें कांहीं तरी पुटपुटून भास्कर स्निग्ध दृष्टीनें सत्यभामेच्या फोटोकडे टक लावून पाहत राहिला. त्याच्या मनांत राहून राहून विचार येई, कीं जिच्या विरहाची आपल्याला चारपांच वर्षांत पूर्वी कधीं नुसती आठवणहि झाली नव्हती, ती सत्यभामा बाळंतपणासाठीं आपल्या भावाच्या सोबतीनें माहेरीं गेल्याला पुरे चारपांच तासहि अजून झाले नाहींत तों आपणाला झोप सुद्धां येईनाशी व्हावी, हें केवढं आश्चर्य?

आणि कोणालाहि त्या गोष्टीचें आश्चर्य वाटलें असतें असाच बनाव भास्कर आणि सत्यभामा यांच्या संसाराचा होता.

बरोबर आठ वर्षांपूर्वी सत्यभामेनें भास्करची गृहलक्ष्मी म्हणून त्याच्या घरांत मोठ्या समारंभानें आणि केवढ्या आतुर आनंदानें प्रवेश केला होता! भास्कर तेव्हां कॉलेजांत फेलो होता आणि एम्. ए.चा अभ्यास करीत होता. सत्यभामा साधारण मराठी लिहितां-वाचतां येण्याइतकीच 'विद्वान्' होती. रूपानें दहाजणींपेक्षां वेगळी नव्हती. मात्र प्रकृतीनें निकोप असून बाळबोध घराण्यांत वाढलेली म्हणून भास्करच्या आईनें तिला सून म्हणून आनंदानें करून घेतली होती. भास्करच्या इच्छा-आशा कोणी तेव्हां हिशेबांत घेतल्या नव्हत्या. आणि

खरें सांगायचें तर आपल्याला देखणी आणि शिकलेली बायको मिळावी या सर्वसाधारण तरुणांना नेहमींच वाटणाऱ्या भावनेपेक्षां त्या वेळीं तरी भास्करच्या आकांक्षेची उडी फार पल्लेदार नव्हती. सत्यभामेशीं विवाहाला संमति देतांना त्याच्यापुढील आर्थिक अडचणींचा प्रश्न घरांत येणाऱ्या हुंड्याच्या रकमेनें तात्काळ सुटण्यासारखा होता, हाच परिस्थितिप्राप्त विचार भास्करच्या मनांत जोरदार होता. आपल्या पुढल्या शैक्षणिक व नोकरीबाबतच्या आशा पुऱ्या होण्यास लागणारा पैसा सत्यभामेच्या गृहप्रवेशाबरोबर घरीं येत असल्याचें पाहून भास्करनें तिला आपली 'गृहलक्ष्मी' करून घेण्याचें कबूल केलें.

भास्करच्या आईची इच्छा आपल्या डोळ्यांदेखत सून घरांत यावी इतकीच होती. भास्कर झाल्यावर तिच्यावर दुर्दैवाची कुऱ्हाड कोसळली होती. तशा स्थितींत तिनें भास्करचें संगोपन मोठ्या कष्टानें केलें होतें. त्याच्यावर तिच्या साऱ्या आशा-आकांक्षा केंद्रित झाल्या होत्या. भास्कर चांगला अभ्यासू निघाला व एम्. ए.पर्यंत त्यानें मजलहि मारली. आतां त्याला कोठेंहि बऱ्यापैकीं नोकरी मिळेल व त्याचा संसार सुखाचा होईल असें म्हातारीच्या भाबड्या मनाला वाटे. सूनमुख पाहून आपण डोळे मिटावेत एवढीच आतां तिची इच्छा होती.

तिच्या सुदैवानें सत्यभामेच्या घराशीं सोयरिक जमून आली. सत्यभामेचें माहेर खाऊन-पिऊन सुखी होतें. भास्करसारखा भावी वैभवाची आशा दाखविणारा कर्तबगार जांवई मिळतो आहे असें पाहून माहेरच्या माणसांनीं त्यांच्या गरिबीकडे दुर्लक्ष केलें होतें. शिवाय सत्यभामाहि रूपानें दहाजणीं-पेक्षां विशेष चांगली कोठें होती ?

सत्यभामेनें भास्करच्या उपरण्याला गाठ मारली ती या परिस्थितींत. सत्य-भामा बाळबोध घराण्यांतील जुन्या वळणांत वाढलेली आणि आधुनिक शिक्षणाचाहि लाभ फार न झालेली स्त्री होती. परक्या घरांत आल्यानंतर तिला सुरुवातीस कांहीं दिवस अवघडल्यासारखें झालें. परंतु संसारांत चटकन् समरस होऊन जाण्याची जुन्या बायकांची रीत तिच्या घरच्या बाळबोध वळणानें तिच्या अंगीं आली होती; त्यामुळें लवकरच ती भास्करच्या

संसारांत चांगली रुळली आणि भास्करच्या आईला सुनेचा सुग्रणपणा पाहून मनापासून समाधान झालें. ती वारंवार म्हणे,

"भास्कर, नशीब बाबा, तुझं चांगलं. कशी पण लक्ष्मीसारखी बायको मिळाली तुला. तुझा संसार अगदीं सुखाचा होईल बघ. माझा म्हातारीचा आशीर्वाद आहे तुम्हां दोघांना."

भास्करला प्रथम कांहीं दिवस आपल्या आईचे हे बोल ऐकून मनांतल्या मनांत आनंद होत असे. पूर्वी कधीं नव्हत अशा कांहीं मधुर लहरी त्याच्या हृदयांत लग्न झाल्यानंतर उमटूं लागल्या होत्या. स्त्रीविषयीं मनांत पूर्वी फारसे विचार न आणणारा भास्कर लग्नोत्तर बायकांच्या बाबतींत विशेष चोखंदळ झाला होता. ललितवाङ्मयाची गोडीहि त्याला जास्त जास्त वाटूं लागली होती. आईच्या तोंडून बाहेर पडणारी सत्यभामेची स्तुति ऐकून त्याच्या हृदयांत गोड कल्पनातरंग उठत व मनश्चक्षूंसमोर तो अनेक हृदयंगम सुखचित्रें रंगविण्यांत मशगुल होऊं लागला. फेलोशिपच्या वर्षांत त्यानें एम्. ए. च्या अभ्यासापेक्षांहि जास्त लक्ष प्रेमाचा अभ्यास करण्याकडे दिलें!

पण एखाद्या विश्वविद्यालयापेक्षांहि सत्यभामा अरसिक असल्याचा अनुभव भास्करला येऊं लागला. भास्करनें प्रेमासंबंधीं आपल्या नवथर अभ्यासाच्या जोरावर ज्या कल्पना मनाशीं बाळगल्या होत्या त्यांची ओळखहि सत्यभामेला नव्हती आणि ती करून देण्याच्या भास्करानें चालविलेल्या चोरट्या प्रयत्नांना भास्कराच्या मनाप्रमाणें उत्तेजन न देतां ती त्याचा विरसच करूं लागली. भास्करच्या मनांत होते तसले प्रेमाचे चाळे करणें सत्यभामेच्या जुन्या मनोवृत्तीला किळसवाणें वाटे, आणि सारा दिवस ती आपली संसाराच्या रामरगाड्यांत गुरफटून गेलेली राही!

भास्करचा मनोभंग झाला सत्यभामेच्या असल्या अरसिक वृत्तीनें. आपण कॉलेजांतून आलें कीं, हसतमुखानें दाराशीं येऊन सत्यभामेनें आपलें प्रेमळ स्वागत करावें, आपण तिची कांहीं तरी नाजूक थट्टा करतांच तिनें गोड मुरका मारून मधुर लाजावें व तें दृश्य पाहून आपण सुखी व्हावें ही भास्करची अंतरीची इच्छा मूर्त रूपांत कधींच सफल झाली नाहीं. सत्यभामेची मजल

माजघराच्या दाराआडून भास्करकडे क्षणमात्र चोरटी नजर टाकून स्वयंपाक-घरांत धाव घेण्यापलीकडे कधीं गेली नाहीं !

सत्यभामा जसजशी स्वयंपाकघरांतील गृहकृत्यांत अधिकाधिक गुरफटूं लागली तसतसा भास्कर तिच्यापासून देहानें व मनानें दुरावत चालला. झालेल्या निराशेनें मनांत तो खट्टू झाला होता आणि त्याचा परिणाम सत्यभामेविषयीं त्याच्या मनांत तिरस्कार उत्पन्न होण्यांत झाला. या तिरस्काराचें स्वरूप प्रथम प्रथम तरी सूक्ष्म होतें. इतकें कीं, भास्करला देखील त्या वृत्तीचा तेव्हां स्पष्ट बोध झाला नाहीं.

भास्करच्या या वृत्तीला रंगरूप आणण्यास लवकरच एक कारण घडून आलें. कॉलेजमधील पहिल्या वर्गांतील मुलांचे एक्सरसाइज तपासण्याचे काम त्याच्याकडे असे. त्या निमित्तानें प्रीव्हियसमधील एक विद्यार्थिनी एक दिवस त्याच्याकडे कांहीं मुद्द्यांचें शंकासमाधान करून घेण्यासाठीं म्हणून आली. तिचें नांव हंसा. तिच्या हसऱ्या छबीनें भास्करवर दर्शनींच चांगली छाप पाडली. हंसा कांहींशी अल्लड व खेळकर वृत्तीची मनमोकळी मुलगी होती. भास्करशीं ती पहिल्याच भेटींत परिचित मित्राप्रमाणें खुल्या वृत्तीनें बोलली-चालली; इतकेंच नव्हे, तर कॉलेजांतून भास्करबरोबर बोलतच ती बाहेर पडली व दोघांचे घरीं जाण्याचे रस्ते निरनिराळे फुटेपर्यंत ती भास्कर-बरोबर होती.

त्या दिवशीं भास्कर कांहींशा आनंदी वृत्तीनें घरीं आला. घरीं येतांच त्याची वृत्ति पालटली. सत्यभामा आपल्या सासूबरोबर देवदर्शनाला जाण्या-च्या तयारींत होती. भास्करशीं एक अक्षरहि न बोलतां, गाईमागून जाणाऱ्या तिच्या वांसराप्रमाणें, सत्यभामा हातीं कुंकवाचा करंडा घेऊन सासूच्या मागून खालीं मान घालून चालूं लागली.

भास्कर आपल्या खोलींत आला. हातांतील पुस्तकें कशींबशीं टेबलावर टाकून तो खुर्चीवर असहायपणे बसून राहिला. थोड्याच वेळापूर्वीं पाहिलेल्या तरुण स्त्रियांच्या दोन नमुन्यांचा विचार त्याच्या मनांत आल्यावांचून राहिला नाहीं.

हंसा आणि सत्यभामा !

सत्यभामा आणि हंसा !

जवळ जवळ सारख्याच वयाच्या या दोन स्त्रियांच्या स्वभावांत किती फरक हा! हंसा सत्यभामेपेक्षां सर्व दृष्टींनीं सरस आहे असें भास्करचें मन त्याला सांगूं लागलें. रूपानें तर ती सत्यभामेहून सुंदर होतीच, पण केशभूषा व वेषभूषा यांच्या आकर्षक रचनेनें आपल्या सौंदर्यांत मोहकतेची भर घालण्याचें जें कसब हंसाला साधलें होतें, त्याची पुसटती ओळखहि सत्यभामेच्या ठिकाणीं नव्हती!

दोघींच्या स्वभावांत तरी किती अंतर! कोठें आपल्या सनातनी स्वभावानें नवऱ्याच्या उत्साहावर विरजण घालणारी सत्यभामा; आणि कोठें आपल्या आनंदी वृत्तीनें अल्प परिचयाच्या व्यक्तीलाहि भुलविणारी हंसा.

भास्करनें एक दीर्घ उसासा टाकला!

सत्यभामेऐवजीं हंसासारखी रसिक स्त्री आपली बायको झाली असती तर!

राहून राहून भास्करच्या मनांत हा विचार दंगल माजवूं लागला.

सत्यभामेच्या ठिकाणीं मनोमन हंसाची मूर्ति कल्पून आपल्या संसाराचीं आनंदी सुखचित्रें तो मानसपटावर चितारूं लागला. या अवस्थेंत त्यानें किती वेळ काढला कोण जाणे!

दुसऱ्या दिवशीं भास्कर कॉलेजांत गेला तेव्हां हंसाकडे पाहण्याची त्याची दृष्टि अजीबात बदलून गेली होती. कांहीं एक स्निग्धपणाचा भाव त्याच्या नजरेंत होता. तिच्या सहवासाविषयीं त्याच्या मनांत आतुरता उत्पन्न झाली होती. हंसा नजरेसमोर आली कीं, न कळतच तो मनांत सत्यभामेशीं तिची तुलना करी व त्या तुलनेंत सत्यभामा त्याला जास्त जास्त टाकाऊ वाटूं लागली. त्या प्रमाणांत हंसाचें पारडें जड होऊं लागलें.

हंसाहि त्याच्याशीं जास्त जास्त मोकळेपणानें वागूं लागली. प्रथम तरी तिच्या मनांत एका हुषार फेलोची आपल्या अभ्यासांत अनायासें चांगली मदत होते तर ती कां सोडा या भावनेपलीकडे विशेष कांहीं नव्हतें. भास्कर-बद्दल तिच्या मनांत आदर होता व त्याच्या व्यासंगाचा व विद्वत्तेचा जसजसा तिला सहवासानें जास्त जास्त परिचय होऊं लागला, तसतसा तो आदर वाढत गेला.

भास्करच्या व हंसाच्या परिचयाबरोबरच भास्करच्या मानसिक आनंदाची वाढ होत गेली तसा त्याच्या वृत्तींतहि पालट झाल्याचें परिचिताच्या लक्षांत येऊं लागलें. भास्करचा पाय घरीं ठरेनासा झाला. हंसाच्या सुखद सहवासांत घालविलेल्या घटकांच्या आनंदानें भारावलेल्या मनानें भास्कर घरीं आला कीं, सत्यभामेचें दर्शन होतांच गरम गरम मसाल्याच्या दुधांत बर्फाचा भला मोठा खडा पडल्याप्रमाणें भास्करचा एकदम विरस होऊन जाई. सत्यभामेचें दर्शनहि त्याला दिवसेंदिवस अधिकाधिक दुस्सह होऊं लागलें.

सत्यभामेचा शक्य तितका वेळ विसर पडावा म्हणून भास्कर अलीकडे हंसाच्या भोंवतींच पिंगा घाली. हंसालाहि त्याची गंमत वाटे. पुरुषाला आपल्याभोंवतीं रुंजी घालायला लावून त्याच्या त्या अगतिक व आतुर अवस्थेची गंमत पाहत स्वतःच्या जिवाची करमणूक करून घेण्याच्या सुंदर स्त्रियांच्या निर्दय लहरींचें सौख्य हंसा उपभोगीत होती! अभ्यासाच्या मदतनिसाची भास्करची भूमिका कांहीं काळ टिकली, पण पुढें तिचें रूपांतर हंसाच्या विश्रांतीच्या वेळचें एक निरुपद्रवी खेळणें होण्यांत झालें.

बिचाऱ्या भास्करला मात्र या बदलाची जाणीव कधींच झाली नाहीं. हंसाचें आपल्यावर प्रेम असावें असाच तिच्या एकंदर वागणुकीचा त्यानें अर्थ केला. त्याची वृत्ति उत्तेजित होण्यास हें कारण झालें. हंसाच्या प्रत्येक कृतीचा अर्थ तो आपल्याला अनुकूल असा लावी. तिची ही वृत्ति बिघडूं नये म्हणून तो जिवापाड धडपड करी. हंसाची व त्याची इतकी घसट होऊनहि त्यानें तिला आपल्या घरीं कधींहि येऊं दिलें नाहीं तें याचसाठीं. सत्यभामेचें व आपलें नातें हंसाच्या कानीं जायला नको होतें त्याला!

हंसानेंहि कधीं त्याच्या घरीं जाण्याचा हट्ट घेतला नाहीं. कोणत्याहि गोष्टींत खोल शिरण्याचा मुळीं तिचा स्वभावच नव्हता. आपल्या सौंदर्यामुळें भास्कर आपल्या नादीं लागला आहे हें तिला समजत होतें. त्याच्यांत तसा कोणता वाईटपणा तिला कधीं दिसला नाहीं. उलट भास्करच्या बुद्धिमत्तेबद्दल तिला आदर होता व स्वभावांतहि तिला कांहीं अधिकउणेपणा भासला नाहीं. एक निरुपद्रवी भला माणूस म्हणूनच ती त्याच्याकडे पाही व त्याच्या सहवासांत तिला स्वतःच्या सौंदर्यपूजेचा जो आनंद लाभे, तो तिच्या अल्लड मनाला सुखवीत होता!

हंसा आणि भास्कर यांचा सहवास अशा स्वरूपांत वाढत होता खरा; पण त्याचा परिणाम कळन-न-कळत दोघांच्याहि मनांत एकमेकांविषयीं एक प्रकारचें आकर्षण उत्पन्न होण्यांत झाल्यावांचून राहिला नाहीं. भास्करची हंसाकडे विशिष्ट लोभी दृष्टीनें पाहण्याची प्रवृत्ति बळावत होती आणि मौजेसाठीं म्हणून वाढूं दिलेल्या भास्करच्या परिचयांत हंसाचें मन तिला न कळत गुरफटत चाललें होतें.

याचा परिणाम व्हावयाचा तोच झाला. भास्करनें मनाशीं खूप झगडा करून पाहिला; पण हंसाशीं प्रेमबद्ध झाल्यावांचून आपलें जीवन व्यर्थ होणार अशीच त्याची खात्री होत गेली दिवसेदिवस. सत्यभामेचा प्रश्न होता खरा थोडासा अवघड. त्यामुळेंच भास्कर कच खात होता हंसाला मागणी घालायला.

या अनिश्चित स्थितींत भास्करनें कांहीं महिने काढले. त्याच्या मनाला या विचित्र परिस्थितीचा विलक्षण ताण सोसावा लागला होता. आणि त्याचा सारा दोष तो सत्यभामेच्या माथीं मारीत होता. तिनेंच आपल्या जीविताची अशी कुतरओढ चालविली आहे अशी विचित्र समजूत त्यानें आपल्या मनाची करून घेतली व तो तिला जास्तच पाण्यांत पाहूं लागला. आपल्या पायांत ही बेडी नसती, तर हंसाशीं विवाह करून आपण सुखी झालों असतों असें त्याला बालंबाल वाटे आणि आपल्या संसारसुखाची चिता पेटवणारी हडळ म्हणून तो सत्यभामेचा मनांत तीव्र तिरस्कार करूं लागला. ती त्याला समोरहि नकोशी वाटूं लागली. त्यामुळें कांहीं कारणानें तिला माहेरचें बोलावणें येतांच भास्करनें तिची रवानगी केली ती कायमचीच!

आणि त्यानंतर तो मनोल्हादक प्रसंग!

भास्कर सकाळींच हंसाच्या घरीं गेला होता. त्याच्या त्या दिवशीच्या परीटघडीच्या पोषाकावरून हंसा हसत हसत थट्टेनें म्हणाली,

"काय पण, आज एक माणूस असं सजलंय्, कीं कुणाला वाटेल नवरी पाहायला जायचीच तयारी आहे."

भास्करनेंहि चेष्टेनें म्हटलें,

"माणसं पुष्कळदां थट्टेत बोलतात तें खरंच असतं!"

"पण या शृंगारांत एक कमतरता आहे हो. पाहा बाई, नाहीं तर तेवढ्यासाठीं हातची नवरी जाईल निसटून!"

"कोणती कमतरता म्हणतां?"

हंसानें उत्तर दिलें नाहीं. पण पूर्वींपेक्षांहि गोड हसून तिनें आपल्या फुगीर अंबाड्यांतील एक टपोरें गुलाचाचें फूल घेऊन तें भास्करच्या बटन-होलमध्यें खोवलें!

"वा! ठीक जमलं." ती म्हणाली, "आतां कोणतीहि नवरी पसंत करील तुम्हांला."

"खरं? तूं देखील?" भास्कर चटकन् बोलून गेला. नंतर त्यानें जीभ चावली. पण त्याला वाटलें होतें तशी हंसा रागावली नाहीं; उलट लाजली!

भास्करचें चिरवांच्छित अनपेक्षितपणेंच त्याच्या पदरांत पडलें. त्याच्या आईनें आपल्याकडून भास्करची समजूत घालण्याचा प्रयत्न केला; पण त्यानें जिवाचें बरेंवाईट करून घेण्याची तयारी दाखविल्यामुळें "बरं बाबा, कांहीं कर– पण सुखी रहा" असें म्हणून तिनें दुसऱ्या सुनेच्या स्वागतासाठीं मन घट्ट केलें.

हंसाला गृहिणीपदावर चढवितांना भास्करची उमेद केवढी दांडगी होती! सत्यभामेच्या पतिविमुखतेमुळें त्याच्या ज्या लालसा अतृप्त राहिल्या होत्या त्या आपण नव्या संसारांत पूर्ण करून घेऊं असें त्याला वाटे. हंसासारखी सुशिक्षित, सुंदर, रसिक आणि आधुनिक विचाराची स्त्री आपल्याला पत्नी म्हणून लाभली याची त्याला धन्यता वाटूं लागली. त्या धुंदींत त्यानें सत्यभामेची एका अवाक्षरानेंहि विचारपूस केली नाहीं. आपलें पहिलें लग्न झाल्याची आठवणहि तो विसरला!

नव्या संसाराची नवलाई भास्करला सुखवीत होती. त्याच्या दृष्टीवर एक पटल आलें होतें. भास्कर आणि हंसा यापलीकडचें जग त्याला दिसेनासें झालें होतें. कामाचे तास संपले, कीं भास्करचा उरला सारा वेळ, कमलिनीभोंवतीं गुंजारव करणाऱ्या भृंगाप्रमाणें, हंसाच्या सहवासांत जाऊं लागला. थट्टामस्करी, हास्यविनोद, एकत्र फिरणें, नवे सिनेमे एकत्र बसून पाहणें, हंसासाठीं तऱ्हे-तऱ्हेचीं पातळें खरेदी करणें यांतच सारा संसार सामावला आहे अशी त्याची वागणूक होती.

भास्करच्या आईला लेकाचें हें पुरोगामी चरित्र-वाङ्मय आकलन होत नव्हतें. घराच्या चार भिंतींबाहेर तिच्या संसाराची मर्यादा जात नव्हती. रुपेरी पडद्यावरील मनोरम दृश्यापेक्षां रुप्यासारख्या ताटांतील रुचकर पदार्थांतच गृहणीधर्म सामावलेला आहे अशी तिची 'वेडगळ' समजूत होती. त्यामुळें स्वयंपाकघरांत पायहि टाकण्यास राजी नसलेल्या आपल्या नव्या सूनबाईविषयीं तिला मोठी काळजी वाटे. सत्यभामेसारखी संसारदक्ष सुग्रण बायको टाकून भास्करनें हंसासारख्या सुंदर शाडूच्या बाहुलीशीं कशासाठीं लग्न केलें हें तिच्या म्हाताऱ्या बुद्धीला कळेना.

भास्करच्या तरुण मनाला मात्र तें कळत होतें. देवपूजा करणाऱ्या सत्यभामेपेक्षां पतिपूजा करणारी हंसा त्याला स्वाभाविकच जास्त प्रिय वाटत होती. सत्यभामेच्या लाजाळू स्वभावामुळें ती भास्करला घुमी वाटे; तो दोष हंसामध्यें नव्हता. चूल आणि मूल यांतच स्वतःचें जीवितसाफल्य मानणारी सत्यभामा कोठें, आणि या बाबींचा त्रिटाळहि नको असलेली हंसा कोठें! भास्करला हंसा म्हणजे आपल्या जीवनांतील मूर्तिमंत काव्य वाटे; त्याच्या हृदयाच्या तारा छेडणारी ती मूर्तिमति देवी सरस्वती वाटे!

स्वर्गसुख म्हणतात ते याहून वेगळें असेल अशी कल्पनाहि भास्करला तेव्हां येण्याचा संभव नव्हता. हंसाचें भास्करवर मनःपूर्वक प्रेम होतें आणि भास्करची अनुरक्तिहि अंतःकरणापासूनची होती. तारुण्याचा तो उन्माद होता हें त्या वेळीं दोघांपैकीं कोणाच्याच ध्यानीं येण्याचें कारण नव्हतें. एकमेकांच्या सहवासांत आयुष्य शक्य तितकें मजेंत, आनंदांत, सुखांत घालवायचें अशी दोघांची वृत्ति होती. त्यांच्या सुखाच्या कल्पनेतहि काव्याचा भाग बराच होता!

अशा काव्यमय सुखाच्या आस्वादांत दंग असतां काळपक्ष्याच्या भराऱ्या किती वेगानें चालल्या होत्या याची भास्कर किंवा हंसा कोणालाच दाद नव्हती. बिचारी भास्करची आई मात्र स्वयंपाकघराच्या घरट्यांत बसून सारा चित्रपट कष्टी मनानें पाहत होती. आपल्या मुलाला झालें आहे तरी काय याची ती स्वतःशींच विवंचना करी आणि मनाचा भार असह्य झाला कीं सत्यभामेची स्मृति होऊन दोन मूक अश्रु गाळी!

आणि सत्यभामा ? तिला या प्रकाराचा अर्थच कळेना. आपल्या नवऱ्यानें दुसरें लग्न केलें या बातमीवर प्रथम तिचा विश्वास बसेना ! आपण असा काय अपराध केला होता म्हणून नवऱ्यानें आपणाला अशी कठोर शिक्षा करावी ? खूप विचार करूनहि या प्रश्नाचें उत्तर तिला सापडत नव्हतें. आपल्या परीनें मनापासून तिनें नवऱ्याची सेवा करून त्याचा संसार संभाळला होता. तिच्या सासूनें तर तिच्या संसारदक्षतेबद्दल तिची वारंवार वाखाणणी केली होती. नवऱ्याची किंवा सासूची अवज्ञा तिनें जाणून कधीं केली नव्हती. तिच्या वागणुकींत भास्करनें ठपका द्यावा असा कांहीं भाग असेल असें तिला कधींच वाटलें नाहीं. मग भास्करनें आपल्यावर अशी आग कां पाखडावी ?

सत्यभामेनें हंसाला कधीं पाहिलें नव्हतें, किंवा भास्करच्या तोंडून तिचे नांवहि ऐकलें नव्हतें. त्यामुळें भास्करच्या दुसऱ्या लग्नाची बातमी तिच्या कानांवर आली, तेव्हां तिला धक्काच बसला. तिनें किती तरी वेळ एकांतांत रडून काढला. आपल्याच कांहीं तरी अपराधामुळें भास्करनें आपणाला टाकून दिलें असाच समज माहेरच्या मंडळींचा होणार असें तिच्या मनानें घेतलें. नवरा बायकोला टाकतो तेव्हां तिच्याच अपराधाचें तें फळ असतें ही समजूत हाडींमासीं खिळलेली तिच्या परिचयाची होती.

आपल्या पूर्वजन्मीच्या पापाचें प्रायश्चित्त आपल्याला मिळालें असें सत्यभामेला वाटूं लागलें. तिच्या अर्धशिक्षित मनाला आपल्या दुर्भाग्याची याहून वेगळी उपपत्ति लावतां येईना. भास्करच्या संसारांतील आपल्या हक्काचें स्थान मिळविण्यासाठीं कांहीं प्रयत्न करावा असें तिच्या मनांत आलें, तरी त्याचा कांहीं उपयोग नव्हता. तिला आपल्या घराचा दरवाजा कायमचाच बंद असल्याचें भास्करनें तिच्या माहेरच्या माणसांना हडसून खडसून बजावलें होतें. माहेरच्या धर्मार्थ आश्रयाच्या अंधारांत राहून जिवाचें होणारें पाणी डोळ्यांवाटे गुपचूप निचरा करण्यापलीकडे सत्यभामेच्या हातीं अधिक कांहीं नव्हतें.

भास्कराची अहोरात्र आठवण करीत, त्याच्या पायाशीं आपल्याला नेण्याची बुद्धि त्याला देण्याबद्दल ईश्वराची नित्य प्रार्थना करीत सत्यभामा आला दिवस ढकलीत होती.

भास्करला सत्यभामेची आठवण होत नव्हती तेथें तिच्या दुःखाची कल्पना कोठून येणार? त्याचें सारें जग एक हंसा! हंसाखेरीज दुसरा विचार त्याच्या मनांत मूळ धरूं शकत नसे.

हंसाला प्राप्त होणाऱ्या मातृत्वाचीं चिन्हें दिसूं लागल्यावर तर, भास्करला तिला कुठें ठेवूं आणि कुठें नको असें झालें. पहिल्या अपत्यलाभाच्या मधुर मादकतेचा अनुभव तो घेत होता.

पण फिनीशिंग टच्पर्यंत आलेल्या सुंदर चित्राचा कॅनव्हास फाटावा तसाचा भास्करच्या संसारचित्राचा एकाएकीं भंग झाला. पहिलटकरीण हंसा भास्करला पितृपदावर चढविण्याऐवजीं स्वतःच स्वर्गवासी झाली!

भास्करची अवस्था इतकी कांहीं शोचनीय झाली, कीं जवळ जवळ त्याला वेड लागण्यापर्यंत पाळी आली! हंसाची छबी समोर ठेवून तो अश्रु ढाळतांना आईला वारंवार दिसूं लागला. त्या धक्क्यानें भास्करच्या स्वभावांत कमालीचा हळुवारपणा आला होता. त्यामुळेंच तो कांहींसा दैववादी व आस्तिक बनला.

हंसाच्या मृत्यूमुळें विकल झालेल्या भास्करनें दोनचार महिने पिसाटासारखे काढले. पण नंतर त्याची ती वृत्ति हळूहळू मावळूं लागली. अलीकडे अलीकडे तर त्याच्या मनांत एक विचित्र कल्पना डोकावूं लागली होती.

सत्यभामेच्या आयुष्याचें वाळवंट केल्याबद्दल तर ही शिक्षा देवानें दिली नसेल ना आपल्याला?

या कल्पनेचें त्याला एक प्रकारें भय वाटे! तरीहि तीवर विश्वास ठेवावा असें त्याला मनांतल्या मनांत वाटे. मात्र त्यानें आपली ही कल्पना कोणाकडेहि बोलून दाखविली नाहीं.

मनाच्या अशा अवस्थेंत दिवस काढावे लागत असल्यामुळें एके दिवशीं आईनेंच जेव्हां सत्यभामेला परत बोलावण्याची गोष्ट हलकेंच त्याच्याकडे काढली तेव्हां त्यानें फारसे आढेवेढे घेतले नाहींत.

सत्यभामेला परत बोलवावें असें त्याला मनांतून कितीहि वाटत असलें, तरी ती गोष्ट सोपी नव्हती. चारपांच वर्षांत तिची त्यानें कधीं विचारपूसहि केली नव्हती. आतां तूं परत आपल्या घरीं ये, असें तो कोणत्या तोंडानें सत्यभामेला सांगणार होता?

मनाची त्यानें खूप समजूत घालण्याचा यत्न केला. कृतापराधाचें प्रायश्चित्त भोगण्यासहि त्याची तयारी होती. सत्यभामा आपल्याला क्षमा करून आपलें गृहिणीपद पूर्ववत् स्वीकारील तर तिला सर्व परीनें सुखी करण्याचाहि निश्चय त्यानें मनाशीं केला. पण प्रश्न होता सत्यभामा परत येईल का, हा!

सत्यभामा परत आली तर भास्करला हवी होती; किंबहुना तो कांहींसा आतुरहि झाला होता. गृहिणीहीन घराला कांताराची उपमा कां देतात याचा दोन संसारांच्या अनुभवानंतर त्याला अचूक बोध होत होता. त्या कांतारांतील काल्पनिक श्वापदें भास्करच्या मनाचे लचके तोडीत होतीं. त्या यातना केव्हां केव्हां असह्य होत आणि मग सत्यभामेवरील आपल्या नवरे-पणाच्या हक्काची त्याला तीव्रतेनें जाणीव होई!

तरीहि सत्यभामेच्या घरीं जाऊन तिला बोलवावें ही कल्पना त्याला कशी-शीच वाटे. सत्यभामा आपल्या पायांनीं त्याच्याकडे आली तर त्याला हवी होती! त्यांत त्याच्या पुरुषी स्वाभिमानाचा चारचौघांत बोज राहणार होता.

अशा द्विधा मनःस्थितींत त्यानें आणखी कांहीं दिवस काढले. त्याची दिवसेंदिवस होणारी अवस्था त्याच्या आईला पाहवेना. तिनें फिरून फिरून सत्यभामेला परत आणण्याबद्दल भास्करकडे बोलणें काढावें आणि या सतत-च्या माऱ्यामुळें त्याचा मनोदुर्ग अधिकाधिक ढासळत जावा असें होऊं लागलें.

आणि अखेरीस जेव्हां सत्यभामेला परत आणण्याची जिम्मेदारी आईनें स्वतःवर घेतली, तेव्हां भास्करनें नापसंती तर दर्शविली नाहींच, पण त्याचे डोळे आईविषयींच्या कृतज्ञतेच्या आंसवांनीं तुडुंब भरून आलेले आईला दिसले.

नंतरची ती रात्र भास्करला कालच्या रात्रीइतकीच ताजी आठवत होती.

भास्करची आई पुण्याला जाऊन दोन दिवसांतच सत्यभामेसह परत आली होती. इतक्या सहजासहजीं सत्यभामा परत येईल अशी त्याला कल्पनाहि नव्हती. परित्यक्ता स्त्रीच्या आयुष्याची त्याला कोठून कल्पना असणार?

सत्यभामा परत आली— इतक्या सहजासहज परत आली, याचें त्याला नवल वाटलें. आनंदहि झाला. आईबद्दलच्या प्रेमानें तर त्याचा ऊर भरून

येत होता. 'म्हणून म्हणती भले, न ऋण जन्मदेचे फिटे' ही ओळ तो मनांत कितीदां तरी घोळवीत होता त्या दिवशीं.

पण काय असेल तें असो, सत्यभामेच्या समोर जाण्याचें मात्र त्याला आज धैर्य होत नव्हतें. तिच्याशीं बोलण्याचें तर राहोच, पण तिच्याकडे वर मान करून पाहण्याचा देखील हिम्या त्याला करवेना. अपराध्याप्रमाणें तो आपले तोंड तिच्यापासून लपवीत होता. आपली खोली सोडून तो क्वचितच घरांत गेला असेल. जेवणाच्या वेळीं मुकाट्यानें खालीं मान घालून वाघ पाठीला लागल्याप्रमाणें तो जेवला आणि लागलीच आपल्या खोलीच्या आश्रयाला धावला.

खोलींत टेबलावर हातात हात अडकवून त्यांत मान खुपसून तो किती तरी वेळ बसला होता. हृदयाची धडधड त्याला स्पष्ट ऐकूं येत होती. खोलींत पावलांचा आवाज ऐकूं आला तेव्हां ती धडधड जोरानें ऐकूं येऊं लागली. पलंगाशेजारच्या स्टुलावर पाण्याचा तांब्या ठेवल्याचा आवाज त्याच्या कानीं पडला, तेव्हां क्षणमात्र आपल्या हृदयाची धडधड एकदम बंद पडल्याचा त्याला भास झाला. खोलीचा दरवाजा लावून घेण्यांत आल्याचें त्याला समजलें, तेव्हां गळ्याभोंवतीं फास अडकविलेल्या गुन्हेगाराप्रमाणें तो असहाय्य शून्यमनस्क स्थितींत स्तब्ध राहिला. क्षणकाल त्यानें श्वासोच्छ्वासहि रोखून धरला.

कांहीं काळ सर्वत्र गाढ शांतता होती. भास्करला तो कालखंड केवढा तरी प्रदीर्घ वाटला.

नंतर एक जोराचा हुंदका भास्करच्या कानीं आला. आपल्या पायाला कोणाचा तरी कोमल स्पर्श झाल्याची त्याला जाणीव झाली आणि अश्रूंच्या पाण्यानें आपलीं पावलें भिजत आहेत असें भास्करला वाटलें.

काय करावें हें भास्करला समजेना. अशा प्रसंगाची त्यानें अपेक्षा केली नव्हती. सत्यभामा रागावून आपली निर्भर्त्सना करील अशी त्याची कल्पना होती. त्यामुळें या अनपेक्षित प्रकारानें तो चांगलाच गोंधळून गेला.

एकदम त्यानें सत्यभामेच्या केसांवरून हळुवार हात फिरवला व अर्धस्फुट आवाजांत म्हटलें,

"मला क्षमा कर. पुन्हा मी अशी चूक कधीं करणार नाहीं."

सत्यभामेनें अश्रुभरित दृष्टीनें त्याच्याकडे पाहिलें व म्हटलें,

" असं नका बोलूं. माझंच प्राक्तन तसं होतं. पण झालं-गेलं तें गंगेला मिळालं. मी कशी वेडीखुळी असलें, तरी संभाळून घ्या; आणि पुन्हा हें घर सोडून जायची पाळी माझ्यावर येणार नाहीं असं करा."

" अशी चूक पुन्हा मी करीन असं वाटतं तुला?" भास्कर रुद्ध कंठानें म्हणाला, " एकदां केलेल्या चुकीचं पुरं प्रायश्चित्त देवानं मला दिलं; आतां मी तुला कध्धीं कध्धीं अंतर देणार नाहीं."

" खरं ? अगदीं शपथ ?"

" शपथ. खरं—तुझ्याच गळ्याची शपथ, झालं ?"

असें म्हणून भास्करनें तिच्या गळ्यावर हात ठेवला. सत्यभामेला किती आनंद झाला ! तिनें तो हात आपल्या हातीं घेऊन घट्ट दाबला. एकाएकीं भास्करला काय वाटलें कोण जाणे ! त्यानें सत्यभामेला हृदयाशीं घट्ट कवटाळून धरली !

त्यानंतर दोन वर्षांनीं आज भास्करला सत्यभामेचा विरह सोसावा लागला होता. बाळंतपणासाठीं सत्यभामा आजच माहेरीं गेली होती आणि भास्कर निद्रेला प्रसन्न करून घेण्याचा इकडे व्यर्थ खटाटोप करीत होता.

टेबलावरील सत्यभामेची छबी पाहून त्याला हा सारा इतिहास आठवला. गेल्या दोन वर्षांत सत्यभामेच्या अंतःकरणाच्या माधुरीचा जो अनुभव भास्करला आला होता, त्यामुळें तिला टाकण्याच्या वेळीं आपण किती मूर्ख, किती अविचारी होतों, याची त्याला आतां पुरेपूर जाणीव झाली होती. सत्यभामेच्या विरहाचे पांच ताससुद्धां त्याला पांच वर्षांप्रमाणें दीर्घ—तापदायक वाटत होते ते यामुळेंच.

सत्यभामेचें हें पहिलेंच बाळंतपण होतें म्हणून तर भास्कर जास्तच अस्वस्थ झाला होता. हंसाच्या बाळंतपणाचा फटका त्याच्या मनांत नाना शंका-कुशंकांचें काहूर माजवीत होता. सत्यभामेच्या विरहांत या यातनेची भर पडून भास्कर तळमळत रात्रीच्या भीषण शांततेंत पडणारे घड्याळाचे ठोके सकंप अंतःकरणानें मोजीत होता !

लेखनकाल—फेब्रुवारी, १९४०.

---

# खाण तशी माती

रोजच्याप्रमाणें फाटकाशीं उभ्या असलेल्या नाना शिपायाशीं दोन-चार औपचारिक प्रश्नहि न करतांच आज म्युनिसिपल शाळेच्या हेडमास्तरीण-बाई श्रीमती पार्वतीबाई देशपांडे, आपल्याच विचारांत दंग होत्सात्या शाळेच्या आवारांतून बाहेर पडून घरच्या रस्त्यास लागल्या. आज जणूं सारें जग त्यांच्यापुरतें तरी निदान अस्तित्वास मुकलें होतें, असेंच अनुमान आजच्या त्यांच्या एकंदर आविर्भावावरून आणि हालचालीवरून कोणीहि परिचित माणसानें काढलें असतें.

मुंबईचे रावसाहेब देशमुख आपल्या सौभाग्यवती यशोदाबाई व एकुलते एक चिरंजीव वसंतराव यांच्यासह वधूसंशोधनार्थ आजच गांवीं येऊन थडकल्याची वार्ता आज दुपारीं शाळेंत असिस्टंट् बाईच्या तोंडून कळली, आणि तेव्हांपासून वसंतऋतु येतांच सृष्टीचा नूर बदलतो तद्वत् पार्वतीबाईचा नूर अजीबात बदलून गेला. त्यानंतर त्यांचें कामांत कीं कशांत म्हटल्या कशांतहि लक्ष लागेना. सूर्याभोंवतीं फिरणाऱ्या पृथ्वीप्रमाणें मग त्यांचें मन त्याच एका बातमीभोंवतीं भटकत राहिलें.

त्यांनीं विचार ठरविला—

‘हवं तें करून आतां येत्या रविवारींच यशोदाबाईंची गाठ घेतली पाहिजे. त्यांचं स्थळ आपल्या मालणला मिळालं तर सोन्याहून पिवळं होईल. चांगलं श्रीमंत स्थळ आहे, हजार दीड हजार रुपये उत्पन्नाचं. शिवाय मुलगाहि कांहीं शिकतोय म्हणे. यशोदाबाई आहेच आपल्या ओळखीची. तेव्हां आपला बाण कांहीं अगदींच नाहीं फुकट जायचा. शिवाय माझी मालण आहे चांगली शंभरजणींत देखणी. पडेलच त्यांना पसंत पाहतांक्षणींच. हो—हो, अस्संच करावं. जातांना तिला बरोबरच घेऊन जावी म्हणजे ती अनायासेंच त्यांच्या डोळ्यांत भरेल. पोर कशी नक्षत्रासारखी आहे. तिला असंच घरंदाज स्थळ पाहिलें पाहिजे......’

आणि या विचाराच्या तीव्रतेनें, केव्हां एकदां आपण घरीं पोंचून ही शुभ-वार्ता मालणला समजावून सांगूं अशी उत्कंठा पार्वतीबाईंच्या स्नेहपूर्ण मातृ-हृदयास लागून रहावी हें स्वाभाविकच होतें. या विचारांची ओढ लागल्या-मुळें त्यांचीं पावलेंहि नेहमींपेक्षां जलद पडत होतीं.

पण माणूस ठरवितो तशाच सर्व गोष्टी होत जातील तर संसार रंग उडून गेलेल्या पुसट चित्रासारखा नीरस व दुःसह होऊन जाईल. हा नियम मानव आपल्या तात्पुरत्या सुखांधतेमुळें विसरत असला तरी संसारचित्राचा चित्रकार जो विधि, त्याला या स्वारस्यपूर्ण नियमाची विस्मृति कधींच होऊं शकत नाहीं. म्हणून तो मानवी बेतांच्या राजमार्गांत विपरीत घटनांचे खांचखळगे निर्माण करून ठेवतो.

याचा अनुभव आज पार्वतीबाईंना आला तसा यापूर्वी कधींच आला नसेल! आणि त्याबद्दल त्या विधिघटनेवर चिडून गेल्या—संतापल्याहि!

किती धावपळ करून, केवढ्या उत्सुकतेनें पार्वतीबाई मालणची गाठ घेण्यासाठीं आज तिच्या फिरायला जायच्यापूर्वीच घरीं येऊन थडकल्या होत्या! त्यांनीं दारांतूनच मोठ्यानें हाका मारण्यास सुरुवात केली—

“मालण, मालण, अग ऽ मालू...”

पण रोजच्याप्रमाणें आज हाकेसरशी त्यांची आज्ञाधारक लाडकी मुलगी लडिवाळपणें आईच्या पुढें येऊन उभी राहिली नाहीं.

पण एवढयानें पार्वतीबाई निराश झाल्या नाहींत. त्यांच्या आशावादी मनानें स्वतःची समजूत करून घेतली, कीं पोरीला आपली हाक ऐकायलाच गेली नसेल. असेल कांहीं तरी लिहीत किंवा वाचीत, म्हणून नसेल ऐकली तिनें आपली हाक. नाहीं तरी आहेच ती अशी नादी. एकदां पुस्तक वाचूं लागली, कीं कानाशीं कोणी ओरडलें तरी नाहीं यायचें ऐकूं तिला !

अशी स्वतःची समजूत घालीत पार्वतीबाई जिना चढून वर गेल्या. पण समजून उमजून वाळूची इमारत बांधण्याचा केलेला प्रयत्न कितीसा यशस्वी होणार ?

मालणच्या खोलीचें लावलेलें दार पाहून मात्र पार्वतीबाईंचा राग अनावर झाला. आणि कोंडून ठेविलेलें मूल जसें दारालाच धक्के देतें तद्वत् पार्वतीबाईंनींहि आपला राग त्या निर्जीव दारावर काढला. त्यांनीं लाथेनेंच दार उघडून खोलींत प्रवेश केला. खोली पूर्णपणें निर्मक्षिक होती.

" ही गेली तरी कुठं या वेळेला ? "

असा कांहींसा त्रासिक उद्‌गार स्वतःशींच काढून पार्वतीबाई सहजींच कांहींशा पुढें सरकल्या. त्यांची नजर मालणच्या अभ्यासाच्या टेबलावर जातांच त्या थोड्याशा चमकल्या. त्यांचे डोळे किंचित् विस्फारले गेले. भक्ष्यावर झडप घालणाऱ्या घारीप्रमाणें वेगानें त्यांनीं टेबल गाठलें, आणि रस्त्यांत पडलेल्या दीनवदन फुलाप्रमाणें टेबलावर पडलेलें एक पत्र त्यांनीं हस्तगत केलें.

त्यांच्या डोळ्यांनीं अधीर उत्सुकतेनें पत्रावरील पत्ता वाचला—

" कु. मालण देशपांडे,
पुणें."

कांहीं क्षण त्या त्या पत्राकडे अचल नजर रोखून पाहत राहिल्या. जणूं काय पत्र न फोडतांच आंतील मजकूर वाचण्याचा त्या यत्न करीत होत्या !

नंतर कांहीं एक दुष्ट विचार मनांत येऊन त्यांचें अंग शहारलें. तें पत्र फोडून पाहण्याची त्यांना जबरदस्त इच्छा झाली. आजपर्यंत त्यांनीं आपल्या मुलीचीं पत्रें कधींच फोडून पाहिलीं नव्हतीं. त्यामुळें हें पत्र पाहण्याचा विचार मनांत येतांच प्रथमतःच चोरी करावयास गेलेल्या चोराप्रमाणें त्यांचे हात कांपूं लागले.

पण आज पार्वतीबाईच्या अंगांत कली संचरला होता असें दिसतें.

त्यांनीं मनाचा पक्का निश्चय केला; आणि तें पत्र घेऊन त्या स्वैंपाकघरांत गेल्या. त्यांनीं दार नीट लावून चूल पेटविली. पाण्याला आधण आणून त्या वाफेवर धरून त्यांनीं तें पाकीट अखेरीस उघडलें.

पुणें, ता.—

" प्रिय मालण,

मायन्यांत व्यक्त झालेल्या प्रेमभावनेबद्दल मला तूं एकवार क्षमा करशील अशी आशा बाळगूनच हें पत्र लिहिण्याचें मी धाडस करीत आहे. हा त्रास मी तुला फक्त एकदांच देणार आहे तेवढा सहन करण्याचें औदार्य तुझ्यांत खात्रीनें आहे अशी माझी मनोदेवता मला सांगत आहे. गेलीं चार वर्षे मी त्या एका रहस्याचें माझ्या हृदयाच्या गाभाऱ्यांत अत्यंत दक्षतेनें संगोपन केलें, तें तुझ्या जवळ प्रगट केल्यावांचून मला येथून जाववणार नाहीं म्हणूनच हें पत्र मी तुला लिहीत आहे.

मालण, आतां मी काय लिहिणार आहे हें तुझ्यासारख्या चतुरिकेला स्पष्ट करून सांगायला हवें काय? तुझा माझा प्रथम परिचय झाल्या दिवसापासून मीं तुझ्या मूर्तीचें पूजन एकनिष्ठेनें केलें आहे. त्या पूजेचा प्रसाद मागण्याचा हक्क भक्ताला नाहीं असें तूं खास म्हणणार नाहींस.

मी उद्यां ग्वाल्हेरीस जाणार आहे आणि उद्योगधंद्याच्या निमित्तानें मी तिकडेच स्थायिक होणार आहे. पण पुणें कायमचें सोडण्यापूर्वी एकवार तुझें मनोगत कळेल तर माझ्या एका हृदयव्यथेचा काय तो निकाल तरी लागेल. तुझ्याकडून मी फक्त एकाच शब्दाची अपेक्षा करीत आहे. तुझें उत्तर होकारार्थी असेल तर आज संध्याकाळीं तूं ती. काकांच्या घरीं येऊन आपलें मनोगत व्यक्त कर. मी तुझी आज वाट पाहत राहीन.

तूं न येशील तर तुझें नास्तिपक्षीं उत्तर समजून मी तुला पुन्हा त्रास देणार नाहीं.

तुझा आशांकित,
विश्वनाथ."

आधण-पाण्यांतून रसरशीत वाफांचे फवारे बाहेर पडावेत तद्वत् आश्चर्यानें विस्फारलेल्या पार्वतीबाईच्या नेत्रांतून क्रोधकटाक्ष बाहेर पडत होते. जणूं आपल्या नुसत्या दृष्टिक्षेपानेंच त्या तें पत्र जाळून भस्म करूं पाहत होत्या !

'विश्वनाथ--! हंः, हें भिकारडं पोर माझ्या मालणची आशा धरून बसलं ? म्हणावं माझी मालण म्हणजे कांहीं रस्त्यावर पडलेल्या किडक्या जोंधळ्याचा दाणा नव्हे—कीं हवं त्या कोंबड्यानं यावं न् उचलून तो तोंडांत टाकावा ! विश्वनाथ काल-परवां बी. एजी. झालेला पोरगा. उनाडटप्पू मेला. ना नोकरी ना धंदा. आतां कायसासा म्हणे ग्वाल्हेरीला जाऊन नांगर धरणार आहे हातांत. अशा नांगऱ्याला का माझी मालण वरणार ? हंः, वेडा कुठला—!'

विश्वनाथासारख्या गरीब मुलानें आपल्या मुलीची आशा धरावी ही कल्पनाच पार्वतीबाईना असह्य वाटली. आपण मालणला तळहातावरच्या फोडासारखें वागविलें. आपणास शक्य होतें तितक्या तिच्या सुखसोयी व चैनी चालविण्यास आपण कधीं कां-कूं केलें नाहीं. आणि अशी सुखसोयींत वाढलेली मुलगी म्हणे नांगऱ्याची बायको होणार !

विश्वनाथाच्या उद्धट अपेक्षेचें तें पत्र पार्वतीबाईनीं फाडून, चिंध्या करून चुलींत फेकून दिलें.

तें पत्र मालणच्या हातीं जाणें त्यांना इष्ट वाटलें नाहीं. देशमुखांच्या स्थळावर डोळा ठेवणाऱ्या पार्वतीबाईना विश्वनाथाचें हें पत्र डोळ्यांत खड्यासारखें सलावें यांत नवल नाहीं. वसंतराव देशमुखांशीं लग्न झाल्यावर आपली मालण कशी सौख्य-शिखरावर विराजमान होईल व तें मनोहर दृश्य पाहून आपणास कसें सुख व समाधान वाटेल याचीं काल्पनिक चित्रें पार्वतीबाईच्या मनश्चक्षूंपुढें दिसत होतीं.

इतक्यांत एक चिरपरिचित हाक पार्वतीबाईच्या कानांवर आली.

"आईऽऽ ए आईऽ अऽऽऽ—"

कृष्णाच्या पुराणप्रसिद्ध मंजुळ मुरलीपेक्षांहि ती लाडिक, प्रेमळ, मधुर हांक पार्वतीबाईना अधिक गोड वाटली. पाडसाच्या स्पर्शाबरोबर पान्हवणाऱ्या

धेनूप्रमाणें ती हाक ऐकतांच पार्वतीबाईंचें मातृहृदय वत्सलरसानें भरून आलें. त्यांचा राग क्षणांत मावळला. शक्य तितका मृदु आवाज करून त्या म्हणाल्या,

" ये ग बाळ, ही मी स्वैंपाकघरांत आहे बघ."

असें म्हणून त्या उठल्या व मालणला दार उघडण्यास पुढें झाल्या. चंद्र-किरणस्पर्शानें प्रफुल्लित झालेल्या कमळासारखा मालणचा चेहरा आज कांहीं अननुभूत आनंदानें उत्फुल्ल झालेला आहे, हें एकाच दृष्टिक्षेपांत त्यांच्या अनुभविक दृष्टीला कळून चुकलें. 'ही विश्वनाथाला भेटून तर आली नसेल?' एक सूक्ष्म शंका पार्वतीबाईंच्या मनास चाटून गेली. पण नको तेंच कदाचित् ऐकावें लागेल या भीतीनें त्यांनीं ती शंका आपल्या मुलीपुढें प्रगट केली नाहीं.

परंतु जी अप्रिय गोष्ट पार्वतीबाई टाळूं पाहत होत्या तीच नेमकी त्यांना अधिकाधिक चिकटूं पाहत होती. कारण मालणनेच मोठ्या उत्साहानें सांगण्यास सुरुवात केली--

" आई-आई, आज काय गम्मत झाली बघ! मी आज सहज म्हणूनं संध्याकाळीं शाळेंतून येतां येतां काकांच्या घरीं गेलें होतें. तेव्हां समजलं, कीं विश्वनाथ ग्वाल्हेरीस जाणार आहे शेतकी करायला उद्यां-परवां. म्हणून त्याच्या-साठीं काकी फराळाचं सामान करीत होत्या. मीहि त्यांना थोडा हातभार लावूं लागलें. इतक्यांत काका न् विश्वनाथ बाजारांतील कांहीं खरेदी संपवून आले. मग काका, विश्वनाथ व मी खूप खूप खेळलों, किती किती गप्पागोष्टी केल्या विश्वनाथ जाणार म्हणून. अगदीं खूप खूप मजा झाली बघ. विश्वनाथ मला आग्रह करीत होता राहा म्हणून. पण म्हटलं, तूं घरीं वाट पाहत बस-शील--रागावशील, म्हणून आल्यें तशीच त्या साऱ्यांचा आग्रह मोडून न् विरस करून. आई, विश्वनाथाबरोबर बोलायला लागलं, कीं बघ माणूस त्यांत रंगून जातं न् मग वेळेचं म्हणून भानच राहत नाहीं!......"

एक संशयपूर्ण दृष्टिक्षेप मालणकडे टाकून पार्वतीबाई कांहींशा कठोर स्वरांत उद्गारल्या,

" विश्वनाथबरोबर तूं एकटीच बोलत बसली होतीस?"

परंतु मालण आज अत्यंत आनंदांत असल्यामुळें आईच्या या प्रश्नाची

खोंच तिच्या नीटशी ध्यानींच आली नाही. ती आपल्या पूर्वीच्याच उल्हासित स्वरांत म्हणाली,

" छे ग, काका होते ना आमच्याबरोबर. त्यांच्याचमुळं तर आज—"

परंतु मालणनें पायांत लुगड्याचा सोगा अडकल्याचें निमित्त करून तें वाक्य अपुरेंच सोडून दिलें. आणि आपल्या चेहऱ्यावर उमटलेली आरक्त लज्जा आईच्या दृष्टींतून चुकविण्यासाठीं ती चटकन् खालीं वाकली.

मालण व विश्वनाथ यांना प्रेमाची भाषा बोलण्यास एकान्त मिळाला नाहीं हें ऐकून पार्वतीबाईनीं सुटकेचा एक निःश्वास सोडला. विश्वनाथाचें पुढचें पुराण ऐकण्याची त्यांची इच्छा नसल्यामुळें त्यांनीं एकदम मुख्य विषयाकडेच मोर्चा वळविला.

" काय ग मालण, येत्या रविवारीं दुपारीं तुला कुठं जायचंबियचं नाहीं ना ग ? "

" नाहीं बाई, कां ग ? "

किंचित् विस्मयदर्शक भ्रुकुटिभंग करून मालणनें विचारलें.

" नाहीं म्हटलं, त्या यशोदाबाई देशमुख मुंबईहून आल्या आहेत आपल्या मुलाचं लग्न ठरवण्यासाठीं इथं. तेव्हां म्हटलं, सहज आपण भेटून येऊं त्यांना. त्या आहेत माझ्या बालपणापासूनच्या मैत्रीण. येशील माझ्याबरोबर तूं ? "

" हो जी ! "

मालणनें मान वेळावून लाडिक उत्तर केलें.

" पण मालण, येशील त्या वेळेस चांगला नीटनेटका पोषाक करून, चार-दोन ठळक दागिने घालून चल बाई. नेहमींसारखा हा लंकेच्या पार्वतीचा तुझा अवतार नको."

पार्वतीबाईच्या या उद्‌गारांत कन्येबद्दलचें प्रेमळ वात्सल्य व कौतुकयुक्त राग या संमिश्र भावना व्यक्त होत होत्या. आईच्या या उभयविध भावनेची गंमत वाटून मालण मिस्किल हसत खोडसाळपणें म्हणाली,

" कां ? मला दाखवायला नेणार आहेस वाटतं तिथं ? पण संभाळ हं आई—"

" चल चहाटळ कुठली ! "

“ओ हो! यावं काकासाहेब! आज बरी आठवण झाली आपल्याला आपल्या गरीब भावजयीची न् पुतणीची?”

मालणनें आपल्या काकांचें—श्रीधरपंतांचें हसत हसत स्वागत केलें.

“मालण, खूप केलीस हं तूं आतां!” काकाहि मिस्किलपणें हसत उद्गारले, “तुला आतां गरीब कोण म्हणणार? आतां कांहीं तूं पूर्वीची एका शाळा-मास्तरणीची मुलगी नाहींस. आतां तूं त्या रावसाहेब का रावबहादुर कोण ते, त्यांची सून होणार ना? आतां तुला गरीब कोण म्हणणार?”

मालणनें पुढें केलेल्या खुर्चीवर बसत बसत शेवटचें वाक्य बोलतांना काकांनीं पार्वतीबाईंच्याकडे एक साभिप्राय दृष्टिक्षेप केला. काकांच्या या भाषणानें पार्वतीबाई खुषींत आल्याशा दिसल्या. त्यांच्या सुरकुतलेल्या चेहऱ्यावर पसरलेली अभिमानाची छटा शिळ्या फुलांना पाणी मारून आणलेल्या ताजेपणासारखी मलूल दिसत होती. आवाज शक्य तितका नाजूक करून त्या म्हणाल्या,

“कळली का ती सारी हकीकत तुम्हांला, भावजी?”

“वा! न कळायला काय झालं?” काका मालणकडे खोडसाळपणें टक लावून म्हणाले. “बिनतारायंत्राची डिस्पॉचिंग् व रिसीव्हिंग् अशीं दोन्हीं यंत्रं मालणच्या आणि तिच्या काकीच्या रूपानं माझ्या घरीं एकत्र जमल्यावर बातम्या कळायला हो किती उशीर? तुम्ही गेल्या रविवारीं देशमुखांकडे कशा गेलां होतां, तिथं त्यांच्या मुलाच्या लग्नाच्या गोष्टी कशा निघाल्या होत्या, तुम्हीं मालणचं नांव त्यांना कसं खुबीनं सांगितलं, मालण वसंतरावांच्या नजरेस पडेल अशी योजना कशी घडवून आणलीत, आणि नजरेस पडतांच त्या पोरानंहि आपलं भावी अर्धांग कसं ताबडतोब पसंत करून टाकलं, वगैरे साऱ्या कांहीं गोष्टी मला सविस्तर कळल्या आहेत. आपल्या भावी वैभवाच्या पताका फडकवल्याखेरीज एका माणसाला चैन कुठं पडतंय्? म्हणून तर आज मुद्दाम आलों तुमचं अभिनंदन करायला.”

“इश्श, चला—”

मालणनें कृत्रिम कोपानें बाजूस मान वळविण्याच्या मिषानें आपल्या चेहऱ्या-वर उमटणारें खोडसाळ हसूं आईला दिसूं नये म्हणून आपला चेहरा तिच्या

दृष्टीआड केला. आईकडे पाठ करून काकांना 'छान रंगवलंत नाटक!' अशा अर्थाची शाबासकी नेत्रद्वारा देण्यास मात्र ती तेवढ्यांतल्या तेवढ्यांतसुद्धां विसरली नाहीं!

काकाहि तिच्या त्या दृष्टीचा अर्थ उमगले असें त्यांच्या चेहऱ्याकडे सूक्ष्मपणें पाहणाऱ्याच्या ध्यानीं आलें असतें. पण पार्वतीबाई होत्या आत्मगौरवांत गुंग. त्यांना आपल्या लेकीचे व दिराचे नेत्रपल्लवी चाळे पाहण्यास सवडच कुठें होती? आत्मविजयाचें पाणी तरंगत असलेल्या डोळ्यांनीं मालणच्या टुसक्या पाठमोऱ्या मोहक बांध्याकडे पाहत पार्वतीबाई म्हणाल्या,

"मग माझी निवड झाली म्हणायची पास एकदांची मालणला? मला तीच मोठी काळजी होती. हो, मीं पुष्कळ चांगलं श्रीमंत स्थळ पाहिलं माझ्या परीनं, पण पोरीनं भलताच हट्ट घेतला तर! हो—आजकालच्या पोरी या—"

पुन्हा एकवार चुलता व पुतणीमध्यें नेत्रसंदेश रवाना झाले.

"पण आतां लाडू केव्हां घालणार आहांत आम्हांला! शुभस्य शीघ्रम्! जवळचा मुहूर्त धराल तितकं बरं म्हणतों मी."

"तें बरंचसं देशमुखांच्यावर अवलंबून आहे." पार्वतीबाईंनीं खुलासा केला. "तसं अद्याप त्यांचं नक्की उत्तर यायचं आहे संबंध ठरल्याबद्दल. पण तें जवळ जवळ ठरल्यासारखंच आहे. त्यांचं उत्तर आलं, कीं मुहूर्त वगैरे सारं तुम्हींच ठरवलं पाहिजे. मी बायकोमाणूस काय करणार?"

"तुम्ही म्हणतां तें खरं आहे." काका चेहऱ्यावर उसनें गांभीर्य आणण्याचा प्रयत्न करीत म्हणाले. "पण मला तशी सवड होईलसं दिसत नाहीं."

"कां बरं? असं काय झालं एकदम?" पार्वतीबाईंनीं घाबऱ्या स्वरांत विचारलें. मालणनेंहि चिंतातुर चेहरा करून काकांच्याकडे 'ते आतां काय सांगतात' अशा काळजीनें पाहण्यास सुरुवात केली.

"ती एक भानगडच झाली आहे." तोच गंभीर चेहरा कायम ठेवून काका शांत स्वरांत सांगूं लागले. "मला सुद्धां तिची नीटशी कल्पना नाहीं. झालंय् काय, कीं आमचा विश्वनाथ आहेच तुम्हांला माहीत—"

विश्वनाथचें नांव निघतांच पार्वतीबाईंनीं कपाळाला घातलेल्या आठ्या

काकांच्या व मालणच्या दृष्टींतून निसटल्या नाहींत. पण तिकडे आपण पाहिलेंच नाहीं, अशा आविर्भावानें काकांनीं आपलें आख्यान पुढें चालू केलें.

" आमचा म्हणजे तसा कांहीं तो मला जवळचा नाहीं; आमच्या हिचा तो मावसभाऊ. पण शिक्षणाच्या निमित्तानं गेलीं चार-पांच वर्षं तो राहत होता आमच्या घरीं, त्यामुळं सहवासानं आपलेपणा वाटतो इतकंच. तो परवां गेला ना ग्वाल्हेरीस ? तिकडे त्याच्या मामानं चार-पांच हजारांचं शेत खरेदी केलं आहे. त्याच्यावर देखरेख करण्यासाठीं म्हणून त्यानं आपल्या भाच्याला नेलं तिकडे बोलावून; पण भाचा पडला पायगुणाचा ! तिकडे जाऊन आठ-दहा दिवस झाले नाहींत, तोंच त्याचा मामा चार दिवसांपूर्वी हार्ट-डिसीजनं वारला—"

" काय विश्वनाथाचे मामा वारले ! " मालणनें आश्चर्यानें विचारलें.

" होय. तेंच तर तुला मीं सांगितलं आत्तां."

" मग आतां विश्वनाथाचं काय होणार ? "

" तेंच पाहायचं आहे. त्या मामाला मूलबाळ नाहीं, कांहीं नाहीं. विश्वनाथ हाच त्याचा जवळचा आप्तसंबंधी. तेव्हां मामाची सारी इस्टेट आतां त्यालाच मिळणार. याच प्रकरणाची काय ती नीट जुळणी लावून देण्यासाठीं त्यानं मला आग्रहानं बोलावलं आहे पत्रानं. आणि एकदां तिकडे गेल्यावर किती दिवस तिकडे मोडतील कुणी सांगावं ? म्हणून म्हणत होतों, आपलं मालणचं लग्न झालं चार दिवसांत तर लाडू बडवूनच जावं ग्वाल्हेरीला... ! "

थोडा वेळ खोलींत पूर्ण शांतता नांदत होती. पार्वतीबाई, काका व मालण या तिघांच्याहि डोक्यांत वेगवेगळे विचार घोळत असावेत असें दिसत होतें. काका व मालण पार्वतीबाईच्या चेहऱ्यावर होणाऱ्या चलबिचलीकडे तीक्ष्ण दृष्टीनें पाहून त्यांच्या अंतःकरणाचा ठाव घेण्याचा यत्न करीत असावेत असें दिसत होतें. पार्वतीबाईच्या डोक्यांत मात्र विचारांचें काहूर माजून राहिलें होतें. संमिश्र विरोधी विचारांच्या लाटा त्यांच्या मनःसागरांत क्षणोक्षणीं उचंबळत होत्या.

वसंतराव देशमुख कीं विश्वनाथ!

हाच एक प्रश्न त्यांच्या मनाला आतां जाचत होता. जो विश्वनाथ कालपरवांपर्यंत त्यांना एक यःकश्चित् नांगऱ्या वाटत होता तो आज वसंतराव देशमुखांपेक्षां दुपटीनें तिपटीनें तरी श्रीमान झाला होता! ही विधिघटना त्यांना असह्य वाटत होती. विश्वनाथाचें स्थळ आपल्या पायाशीं लोळत आलें होतें तेव्हां सत्तांध अधिकाऱ्याच्या तोऱ्यानें आपण तें लाथाडून लावलें, याचा त्यांना आज पश्चात्ताप होत होता; तर दुसरीकडे देशमुखांकडचें अद्याप नक्की ठरलें नाहीं याबद्दल त्यांच्या आशाळभूत मनाला एक तऱ्हेचें समाधानहि वाटत होतें. या संशयित स्थितीचा फायदा घेऊन आपण विश्वनाथाबद्दल भावजीकडे गळ घालावी काय? त्यांनीं मनावर घेतलं तर हें सहज शक्य होईल, पण मालणला आतां देशमुखांचं स्थळ पसंत होऊन चुकलें आहे—पण जाऊं द्या. पोरीची समजूत घालतां येईल कशी तरी; पण हातचं श्रमित स्थळ कां गमवावं—?

मग विचारावंच एकदां मनाचा धडा करून.

पण मालणच्या देखत—?

छे, तें नाहीं कामाचं.

आणि या विचारानें पार्वतीबाई मालणकडे वळून म्हणाल्या,

"बाळ मालण, उगीच दुसऱ्याचं दुःख तूं नको मनाला लावून घेत बसूंस. देवाची करणी त्याला कोण काय करणार! तूं खालीं जाऊन काकांच्यासाठीं फक्कडसा चहा तयार कर जा पाहूं."

या चहाचा 'रागरंग' मालण तेव्हांच समजून चुकली. काकांनींहि त्या पातळ आवरणामागचें गुह्य तात्काळ ताडलें. चुलता व पुतणी यांमध्ये 'जिंकली' असा नेत्रसंकेत झाला. आणि आपल्याला कोसळूं पाहणारें हसें आईच्या दृष्टीआड करण्यासाठींच ती आज्ञाधारक मुलगी खालीं स्वैंपाकघरांत पळाली!

मालण गेल्यावर पार्वतीबाईनीं हलकेच विचारलें—

"विश्वनाथाला किती इष्टेट मिळेल असा अंदाज आहे तुमचा, भावजी?"

"तसं मला नक्की नाहीं सांगतां येणार." काका विचार करीत म्हणाले, "पण बघा, तें चार-पांच हजाराचं शेत आणि एक राहतं घर. शिवाय मामांचा

वरकड पैसाहि चार पांच हजारांपर्यंत भरेल असा माझा अंदाज आहे. बऱ्यापैकीं असामी होते ते तिकडे. म्हणून तर मला तिकडे बरेच दिवस राहावं लागेल अशी भीति वाटते. शिवाय जमल्यास—"

आगामी चित्रपटाचा ट्रेलर दाखवून कांहीं थिएटरवाले तो चित्रपट पाहण्याची प्रेक्षकांची पिपासा जागृत करण्याचा यत्न करतात तद्वत् आपलें वाक्य मुद्दाम अर्धवट सोडून काकांनीं पार्वतीबाईंच्या जिज्ञासेला डिवचून जागें केले. त्यांनीं उत्सुकतेनें विचारलें,

"शिवाय आणखी काय म्हणालांत तुम्ही, भावजी ?"

"नाहीं म्हटलं जमलं तर—" काका खाकरत-खोकरत आजूबाजूस संशोधक नजर टाकीत म्हणाले, "त्याचं लग्नहि उरकून टाकावं असा माझा विचार आहे. आणि त्यासाठींहि आणखी कांहीं दिवस मला तिथं राहावंच लागेल."

पार्वतीबाईंच्या उत्सुकतेचें भांडें तोंडोतोंड वाफारलें होतें. आतां त्यावर मौनाचें झाकण टिकून राहणे शक्यच नव्हतें. त्यांनीं एकदम विचारलें,

"एखादी मुलगीबिलगी पाहून ठेवली आहे वाटतं ?"

एक उसासा टाकून काका उद्गारले,

"पाहून ठेवली होती—पण आतां ती गेल्यासारखीच आहे. तिचं दुसरीकडे जमलंय्सुद्धां."

"कोण ती ? आणि दुसरीकडे कुठं जमलंय् तिचं ?"

काकांच्या बोलण्यानें पार्वतीबाईंना वाटलेला असंतोष त्यांच्या स्वरांत स्पष्ट उमटला होता.

"अहो, दुसरी कोण ? आपली मालणच. मालण-विश्वनाथचा जोडा कसा नामी दिसतो असं आमची ही नेहमीं म्हणत असे; म्हणून मीहि त्याच आशेवर होतों. पण तुम्ही मला कांहीं न कळवतां-सवरतां देशमुखांकडे शब्दहि देऊन बसलांत—"

त्यांना पुढें न बोलूं देतांच पार्वतीबाई एकदम म्हणाल्या,

"नाहीं हो नाहीं, भावजी. असें रागावूं नका. मी अजून कांहींसुद्धां नक्की ठरवलं नाहीं. आणि तुम्हांला विचारल्याशिवाय ठरवीन तरी कसं मी बायको माणूस ? देशमुखांच्या त्या यशोदाबाई माझ्या ओळखीच्या; म्हणून उगीच खडा

टाकून पाहृला झालं. बाकी तुम्हांला जर विश्वनाथाचं स्थळ अधिक पसंत असलं देशमुखांपेक्षां, तर तेंच कायम करा! मी का तुमच्या बाहेर आहे?"

"आतां तुम्हीच बघा वहिनी, विश्वनाथ तसा हुशार आहे; शिवाय आतां त्याच्या नशिबानं लक्ष्मीहि त्याच्या पायाशीं चालत आली आहे. शिवाय या दोघांचे स्वभावहि जुळते आहेत. तेव्हां हाच संबंध परिणामीं खरा सुखावह होईल. तुम्हांला नाहीं असं वाटत?"

"होय हो होय, भावजी. मला किनई तुमचं म्हणणं अक्षरशः पटतं." पार्वतीबाई कृत्रिम लाडिकपणानें म्हणाल्या, "पण मला भीति वाटते, कीं मालण आतां काय म्हणेल?—"

"तिला काय पोरीला समजतंय् यांत?" काका खेकसले. "हीं कांहीं पोरासोरांचीं कामं नव्हत. जन्माच्या गाठी या. दूरवर विचार करूनच काय तें ठरवलं पाहिजे. तुम्हांला आहे ना विश्वनाथाचं स्थळ पसंत?"

"हो,—अगदीं मनापासून."

"मग झालं तर." काका मनापासून म्हणाले. "आतां असं करूं या आपण. मी आतां उद्यांच ग्वाल्हेरीस जाऊन आठ-दहा दिवसांत तिकडील साधारण स्थिरस्थावर करून विश्वनाथाला घेऊनच इकडे येतों. आणि मग उडवून टाकूं या बार पहिल्याच मुहूर्तावर. आतां मालण थोडी रागावेल, पण तिची काकी घालील तिची समजूत. का, पसंत आहे तुम्हांला माझी ही योजना?

"अगदीं सोळा आणे!"

पार्वतीबाईंचें हें वाक्य संपतें न संपतें तोंच मालण चहाचा ट्रे घेऊन आली. पेल्यांतून चहा ओतीत असतां तिनें आईच्या व काकांच्या चेहऱ्याचें आळीपाळीनें निरीक्षण केलें. काकांची व तिची नजरानजर होतांच काका हसले आणि तें पाहून मालण लाजून खालीं पाहूं लागली!

त्यानंतर पंधरा-वीस दिवसांनीं नवपरिणीत वधूवरांस 'शुभास्ते पंथानः सन्तु' असा आशीर्वाद देण्यासाठीं काका पुणें स्टेशनवर आले होते. एका डब्याच्या खिडकींतून विश्वनाथबरोबर जाणारी मालण आपल्या प्रेमळ काकां-बरोबर शेवटचे दोन शब्द बोलून त्यांचा निरोप घेण्याच्या तयारींत दिसत होती.

लाडक्या पुतणीच्या वियोगामुळें डोळ्यांतून वाहूं पाहणाऱ्या पाण्याचा प्रवाह शक्यतों रोखून धरण्याचा यत्न करीत काका वरकरणीं हसत हसत म्हणाले,

"हं, मालण, म्हटलं गरीब काकाची आठवण राहील ना ग्वाल्हेरीस गेल्यावर? नाहीं तर त्या पांच हजारी उत्पन्नाच्या डौलांत गरीब काका-काकींस जाशील विसरून."

"काका, तें कधींच शक्य नाहीं बरं!" मालण रुद्ध कंठानें म्हणाली, "तुम्हीं मनावर घेतलंत व सारं नाटक यथासांग पार पाडलंत म्हणून तर शेवटीं नायक-नायिकेचा विवाह लागला. मग मी तुम्हांला कशी विसरेन बरं? जन्मोजन्म मला तुमच्यासारखा काका मिळावा म्हणून मी देवाची रोज प्रार्थना करीन."

गळा दाटून आल्यामुळें मालणला पुढें बोलणें अशक्य झालें. पोलक्याच्या खिशांतून हातरुमाल काढून तिनें आपले अश्रु टिपण्यास सुरुवात केली.

मालणचा हात आपल्या हातीं घेऊन व तो प्रेमानें हलके हलके दाबीत काका म्हणाले,

"तूं म्हणतेस तसं आपलं हें नाटकच झालं म्हणायचं छोटंसं; पण त्याचं श्रेय मात्र सारं तुला आहे. अग, मी काय नुसता नक्कल पाठ करणारा नट. पण या साऱ्या कपटनाटकाची कर्ती तूंच ना? तूं नाटक रचलंस तें मीं फक्त वठवून दाखवलं इतकंच! तुझ्या आईनं असंच एक कपटनाटक योजिलं होतं तुझं त्या वसंतरावाशीं लग्न व्हावं म्हणून. पण तूं कसली वस्ताद! कांट्यानं कांटा काढावा तद्वत् तिच्या नाटकावर आपलं नाटक रचून तूं अखेर आईवर मात केलीस! खाण तशी माती, हेंच खरं एकूण!"

मालणनें एक लाजवट मुरका मारून काकांकडे एक स्निग्ध दृष्टिक्षेप केला. आणि त्याच क्षणीं गाडीनें विजेचा भोंगा वाजवून स्टेशन सोडलें.

लेखनकाल— मार्च, १९३२.

---

# संस्कार

राष्ट्रीय आंदोलनांत भाग घेतल्याबद्दल झालेली षण्मासिक सजा भोगण्यासाठीं प्रथमतःच मीं तुरुंगाच्या आवारांत पाऊल टाकलें, तेव्हां तुरुंगांत काय काय पाहण्याचें व भोगण्याचें आपल्या नशिबीं येईल याची किंचितहि कल्पना मला नव्हती. यापूर्वी तुरुंगाच्या बाहेरील अजस्र दगडी भिंती व अवजड लाकडी दरवाजा आणि खांद्यांवर बंदुका टाकून दाराशीं येरझारा करणारे खाकी पोषाकाचे कारागृहरक्षक यांच्याखेरीज तुरुंगापैकीं मला दुसरे कांहींच पाहण्यास मिळण्याचा योग आलेला नव्हता. तुरुंगाचा दरवाजा नेहमींच बंद असल्यामुळें आंत काय चाललें आहे हें बाहेरून जाणाऱ्या-येणाऱ्यास कळण्यास कांहींच मार्ग नसतो. आणि खरें सांगावयाचें म्हणजे तुरुंगांतील बंदिवान रहिवाशांच्या जीवनाबद्दल माहिती करून घेण्याची कोणालाहि कधीं आवश्यकता वाटत नसते. मग मला तरी या प्रश्नाचें एवढें प्रेम कां असावें? माझा उद्योगधंद्याचा पसारा एवढा मोठा होता, कीं असल्या रिकामटेकड्या गोष्टींकडे लक्ष देण्यास मला क्वचित्च फुरसद मिळत असे. दिवसाचा बहुतेक वेळ अशीलांच्या हकीकती ऐकून घेण्यांत व त्या कायद्याच्या रंग-

सफेतीसह कोर्टापुढें मांडण्यांत जाई. उरला सुरला फुरसतीचा वेळ सभा, व्याख्यानें वगैरे सार्वजनिक कार्यांत खर्च होई. त्यामुळें तुरुंगांतील कैद्यांच्या जीवनाविषयीं माझ्या मनांत कधींच विचार आला नसला तर तें स्वाभाविकच नव्हे काय?

'तुरुंग' म्हटला कीं जी कल्पना आपल्या मनश्चक्षूंसमोर उभी राहते ती कांहीं सुखकर नसते खास! सर्व हालअपेष्टांचें आगर, इतकेंच काय पण या मृत्युलोकावरील नरक म्हणजे तुरुंग अशीच बहुधा तुरुंगाशीं संबंध नसलेल्या बहुजनसमाजाची ठाम समजूत असते व तशीच ती माझीहि होती. तुमच्या हयातींत तुम्हीं जीं पापें केलीं असतील त्यांच्याबद्दल प्रायश्चित्त म्हणून मरणोत्तर तुम्हांला नरकवास भोगावा लागतो, तर तुमच्या हयातींत तुम्हीं जे गुन्हे केले असतील त्यांच्याबद्दल प्रायश्चित्त म्हणून या जन्मींच तुमच्या कपाळीं तुरुंगवास येतो. या दृष्टीनें तुरुंगाला नरकाची उपमा देतात ती यथार्थ वाटते. शिवाय, यमपुरींतील छळांचीं काल्पनिक वर्णनें आपण ऐकतों तसलींच नव्हे तरी, त्याच जातीच्या छळांचा अनुभव तुरुंगांत येतो असें म्हणतात. अशा अनेक खऱ्या-खोट्या समजुतींमुळें तुरुंगाच्याबद्दल माझी मनोभावना प्रतिकूल असणें मनुष्यस्वभावाला धरूनच आहे. तुरुंगवास म्हटला कीं, माझ्या अंगावर भयानें शहारे उभे राहत आणि तुरुंगांतील लोकांचें जीवन किती दुःखी, किती कष्टमय, किती असह्य असेल असें वाटून मला त्या बंदिवानांबद्दल अधिकच अनुकंपा वाटूं लागे.

तुरुंगांत गेलेले कैदी अत्यंत दुर्दैवी लोक होत असें मला वाटे. आप्तेष्टांच्या सहानुभूतिपूर्वक प्रेमळ शब्दांऐवजीं दंडुकेबहाद्दर वॉर्डरांचे कर्णकटु अपशब्द मात्र हरघडी कानांवर आदळून मनोवेदना होतात. आपल्या 'समानशील' कैद्यांबरोबर सुखदुःखाच्या दोन गोष्टी बोलून हृदय हलकें करण्यालाहि तेथें मोकळीक नाहीं! इकडे पाहायचें नाहीं, तिकडे जायचें नाहीं, हसायचें नाहीं, बोलायचें नाहीं—थोडक्यांत इतकेंच, कीं मानवी अन्तःकरणाचे कोणतेहि व्यवहार करण्यास तुरुंग म्हणजे कायमचा बंद दरवाजा!

अशी ज्या तुरुंगाविषयीं माझी मनोभावना होती, त्या तुरुंगांत जाण्याची माझ्या आयुष्यांत मजवर कधीं काळीं पाळी येणार असल्याचें जर कोणी एखाद्यानें यापूर्वी भविष्य वर्तविलें असतें तर त्या भविष्यवेत्त्याला मीं वेड्यांत

काढलें असतें खास! पण मनुष्याच्या तार्किक बुद्धीला ज्याची कल्पनाहि होत नाहीं तें पुष्कळदां त्याच्या आयुष्यांत घडून आल्याचें दिसून येतें.

'नच संभव ज्या कांहीं। होत अकारण तेंहि' हें कविवचन माझ्या प्रत्यक्ष प्रत्ययास आलें. मातृभूमीच्या दास्यविमोचनासाठीं सत्याग्रहाची चळवळ सुरू होतांच, जोमांत चाललेल्या वकिलीवर लाथ मारून मीं जाणूनबुजून त्या खाईत उडी टाकली. त्याचा व्हावयाचा तोच परिणाम झाला. मॅजिस्ट्रेट-साहेबांनीं 'कायद्यानें प्रस्थापित झालेल्या सरकार'नें प्रस्थापित केलेले कायदे मोडल्याबद्दल मला सहा महिने शिक्षा दिली. आजपर्यंत माझ्या वकिली-कौशल्याच्या जोरावर याच मॅजिस्ट्रेटच्या तावडींतून मीं अनेकांना सहीसलामत सोडविलें होतें! माझ्या 'केस'मध्यें वकिली-कौशल्याचा मला कांहीं उपयोग झाला नसला, तरी त्या कौशल्यामुळें मला होणाऱ्या अर्थप्राप्तीचा अंदाज मॅजिस्ट्रेटसाहेबांना असल्यानें त्यांनीं मला 'अ' वर्ग दिला.

तुरुंगांतील जीवन अनुभविण्याचा प्रसंग मजवर आला तो या निमित्तानें. एरवीं तुरुंगाचें दुरूनहि दर्शन घेण्याची माझी इच्छा नव्हती. तुरुंग हें बदमाष गुन्हेगारांचें घर असेंच मी मानी. कुटुंबसुख, संपत्ति व सामाजिक मानमान्यता या सर्व बाजूंनीं मला कांहींहि कमी नसल्यामुळें वाटमारी करून तुरुंगांत घुसण्याचें मला कांहींच कारण नव्हतें. आणि आज मी जो तुरुंगांत आलों तोहि या कारणांसाठीं नव्हे. बदमाष गुन्हेगारांत व माझ्यांत कायदेभंगाचा 'गुन्हा' हा समान 'गुण' असला तरी त्या 'गुन्ह्या'च्या बुडाशीं जे हेतु होते ते परस्परविरुद्ध होते. त्यामुळें नैतिकदृष्ट्या इतर गुन्हेगारांत व माझ्यांत तफावत आहे हा अभिमान मला होताच.

पण असें असूनहि तुरुंगांत पहिलें पाऊल टाकतांना मला कसेंसेंच वाटलें, हें मी प्रांजलपणें कबूल करतों. तुरुंगांत 'ॲडमिट्' करून घेतांना जी 'विवस्त्र' विटंबना करण्यांत येते ती 'संभावितां'ना शल्याप्रमाणें टोचल्यावांचून कशी राहील? तुरुंगावरील अधिकाऱ्यांचा निगरगट्ट बेपर्वाईपणा, वॉर्डर-हवालदारांची 'सशब्द' दंडुकेशाही, सजीव पुतळ्यांची यांत्रिक निमूट हालचाल, ती शिस्त, तें गंभीर वातावरण, त्या भयानक भिंती—एक ना दोन गोष्टी! या सर्व परिस्थितीला मी पूर्णपणें नवखा असल्यानें मला प्रथमतः तुरुंगांत गेल्याबरोबर

बावरल्यासारखें झालें यांत नवल नाहीं. इतक्या दिवसांचे संस्कार मनावर ताबा चालविल्यावांचून कसे राहतील ?

पूर्व-संस्कारांमुळें तुरुंगांत मला जो मानसिक त्रास सोसावा लागला तेवढाच. बाकी बहुतेक गोष्टी तुरुंगाच्या मानानें ठीकच होत्या असें म्हटलें पाहिजे. 'अ' वर्गाचा कैदी म्हणून घरचे कपडे व अन्न मिळत असे. वाचायला ठराविक वृत्तपत्रें व कांहीं पुस्तकेंहि मिळत; शिवाय दुसऱ्या कांहीं 'अ' वर्गीय राजबंदीं-बरोबर बुद्धिबळें खेळण्यासहि मिळत. आणि बुद्धिबळें खेळण्याचा मला इतका नाद, कीं त्यांत मी सुटीचे दिवस घालवी. चार भिंतींच्या पलीकडे जायचें नाहीं एवढा निर्बंध सोडला तर सामान्यतः तुरुंगाचा फारसा वाईट अनुभव मला आला नाहीं. तरी पण त्या चार भिंतींच्या बंधनाची मानसिक जाणीव शारीरिक त्रासापेक्षांहि जाचक वाटे हेंहि त्याबरोबर सांगितलें पाहिजे.

"सलाम, साहेब—"

"सलाम, कांहीं विशेष बातमी ?"

"कुछ नही."

"काम झालं का ?"

"हां. हो गया, आतां सुटी आहे."

"हो का ? मग बैस खालीं. थोडा वेळ बोलत बसूं." ती व्यक्ति माझ्या-पासून थोड्या अंतरावर आदरानें बसली. मी पुन्हा पूर्ववत् चरख्यावर सूत काढूं लागलों. दुपारीं दोन तास नेमानें सूत काढण्याचा परिपाठ मीं ठेविला होता. कारण तुरुंगांत असतांना वेळ कसा घालवायचा हा प्रश्न असे. चरख्या-वर सूत काढण्याच्या नेमामुळें तो प्रश्न सुटण्यास तेवढीच मदत होत असे.

आजहि मी असाच सूत काढीत बसलों असतां वर दिलेल्या संभाषणास सुरुवात करणारी व्यक्ति तेथें आली. ती व्यक्ति आतां माझ्या बऱ्याच परि-चयाची झाली होती. जेलरसाहेबांनीं कृपाळु होऊन त्या व्यक्तीला आमच्यावर वॉर्डर म्हणून नेमलें होतें. त्याला आम्ही 'बाबा' या नांवानें बोलवीत असूं. वॉर्डर म्हणजे हृदयहीन माणूस अशी जी माझी समजूत होती ती थोड-थोडी बदलण्यास बाबाचें वर्तन कांहीं अंशीं कारण झालें यांत शंका नाहीं.

इतर कैद्यांशीं त्याची वागणूक कशी होत असेल तें कळण्यास मला कांहीं मार्ग नसे. कारण आम्हां 'अ'वर्गीय राजबंदींना तुरुंगाच्या एका स्वतंत्र विभागांत ठेविलेलें होतें. तें तसें जरी असलें तरी पहिल्यापासून बाबा आमच्याशीं फार चांगल्या प्रकारें वागे एवढें खास. व त्यामुळें त्याच्याविषयीं एकंदरीनें माझें मत बरेंचसें चांगलें झालें होतें.

रोजचें ठराविक सूत काढून झालेंच होतें म्हणून चरख्याचा पसारा मी आवरून ठेवूं लागलों.

थोड्या वेळानें बाबानेंच बोलण्यास सुरुवात केली,

"झालं का सूत कांतून?"

"हो. रोज थोडंथोडं काढतों. तुरुंगांत आल्यापासूनच मीं चरखा हातांत धरला; त्यामुळें अजून यावं तितकं बारीक व पीळदार सूत निघत नाहीं." मीं उत्तर केलें.

"तुम्हांला तुरुंगांत येऊन तीन महिने होत आले, नाहीं?" बाबानें प्रश्न केला.

"होय."

"अजून किती दिवस आहेत तुमच्या शिक्षेचे?"

"अजून तीन महिने आहेत. पण सूट वगैरे धरून मी बहुधा आणखीं अडीच महिन्यांनीं या नरकांतून सुटेन असं वाटतं." मी खुलासा केला.

"बस्स्? फक्त अडीच महिनेच?" बाबाच्या या उद्गारांत आश्चर्यमिश्रित उपहासाचा ध्वनि होता. "ही का शिक्षा का थट्टा? मला तेरा वेळ शिक्षा झाली— पण एकदांहि हा बहाद्दर वर्षाच्या आंत सुटला नाहीं. अन् साहेब, तुम्ही तर सारे लोक सहा महिन्यांच्या आंतच येथून निघून जातां? ही काय धर्मशाळा आहे काय— कीं चारदोन दिवस मुक्काम करून परत आपल्या गांवीं जावं? मग येतां तरी कशाला तुरुंग घाण करायला?"

"बाबा, तुला काय सांगायचं आम्ही इथं कशाला येतों तें?" बाबाच्या टीकेमुळें मी किंचित् नरमाईनें म्हटलें, "तुरुंगांत आल्यापासून आठ दिवसांत आमच्यासारख्यांचे प्राण डोळ्यांत येतात, अन् तूं म्हणतोस आम्ही तुरुंग घाण करायला येतों! तुमच्याप्रमाणें आम्हांला सहा महिन्यांऐवजीं सहा-सहा

वर्षांच्या शिक्षा होऊं लागल्या तर तुरुंगांतून जिवंत बाहेर पडण्याची आशा नको."

"तुम्हांला जेलचं इतकं भय वाटतं तर तुम्ही आलांत तरी कां तुरुंगांत? तुम्हीं काय मारामारी केली कीं चोरी केली?"

"छे-छे! चोरी, मारामारी, खून करणारीं का आम्ही माणसं? आम्ही समुद्रांतलं मीठ पळवलं म्हणून जेलमधें आलों."

"मीठ पळवलं? बस् एवढंच? खून नाहीं, मारामारी नाहीं, चोरीसुद्धां नाहीं आणि तुम्ही जेलांत येतां? खरं सांगतों साहेब, तुम्हां शिकलेल्या लोकांचीं कोडीं आम्हां अडाण्यांना कांहीं सुटत नाहींत. मी कैकदां तुरुंगांत आलों, पण प्रत्येक वेळेला मारामारी, दरोडा, निदान चोरी तरी केल्याशिवाय आलों नाहीं! तुमची सगळी न्यारी तऱ्हा!"

"बरं तें जाऊं दे; पण काय रे, तुझी या तुरुंगांतून कधीं सुटका होणार आहे?"

"माझी सुटका? काय की बा! कोण लेकाचा चौकशी करतो कधीं सुटका होणार त्याची? तरी पण अजून वर्ष-सव्वावर्ष तरी हवं माझ्या सुटकेला असं मला वाटतं."

"तुला या नरकवासांतून सुटून जाण्याची इच्छा नाहीं? या लाजीरवाण्या जिण्याचा तुला कंटाळा नाहीं का येत?"

"कंटाळा येऊन काय करायचा? तुरुंग हेंच आमचं घर झालं आहे. आज जवळ जवळ तीस वर्षं मीं तुरुंगांतच काढलीं आहेत."

"काय! तीस वर्षं तूं तुरुंगांत काढलीस?" मी किंचित् मोठ्या आवाजांत विचारलें, "काय, म्हणतोस तरी काय तूं हें!"

"खरंच सांगतों साहेब, माझ्या आयुष्याचीं तीस वर्षं या जेलखान्यानं खाल्लीं. मी पहिल्यांदा तुरुंगांत आलों तेव्हां वीस-बावीस वर्षांचा होतों. आतां माझं पंचावन वर्षांचं वय आहे. एकदां सुटल्यापासून पुन्हा तुरुंगांत येईपर्यंतचा मध्यंतरीचा काळ सोडून एवढी सगळी उमर मीं कोणत्या ना कोणत्या तरी तुरुंगांत काढली आहे. ऐन उमेदीचा काळ असा तुरुंगवासांत गेल्यावर आतां या उतारवयांत सुटकेची आशा कशाला? अन् सुटून गेल्यावर करायचं तरी काय? एवढ्या काळांत घरादाराची वाट लागली. अन्

आतां सुटायचं तरी कुणासाठीं? अन् सुटून तरी पोट कसं भरायचं? तुरुंगांत गेलेल्या माणसाला कुणी जवळसुद्धां उभं करीत नाहीं. तुम्हांला येईलच आतां हा अनुभव तेव्हां समजेल आम्हां कैद्यांना तुरुंगांतून सुटण्याची कां इच्छा नसते तें."

बाबाचें हें बोलणें मीं लक्षपूर्वक ऐकलें. मला त्याच्या स्थितीबद्दल अनुकंपा वाटली. ऐन उमेदीचीं तीस वर्षें ज्याचीं तुरुंगांत गेलीं त्याच्या आयुष्याची राखरांगोळी झाल्यास काय आश्चर्य? सर्व आयुष्याची झालेली घोर व भयाण निराशा बाबाच्या बोलण्यांत स्पष्टपणें दिसून येत होती. त्याच्या उद्गारांत विषण्णता होती. त्याच्या आवाजांत कंप होता. त्यामुळें त्याच्या हृदयव्यथेची तीव्रता मला कळून चुकली. त्यामुळें त्याची कहाणी ऐकण्याची मला तीव्र इच्छा झाली म्हणून मीं त्याला म्हटलें,

"पण सारा जन्म तुरुंगांत जाण्यासारखं तूं केलंस तरी काय?"

"साहेब, ती एक कथाच आहे. आपली ऐकायची तयारी असल्यास मी आपणाला ती सांगावी म्हणतों. मग आपणच माझा योग्य निवाडा करा."

मीं त्याच्याबद्दल जी सहानुभूति दाखविली त्यामुळें माझ्याबद्दल त्याच्या मनांत विश्वास उत्पन्न झाला असावा. अशा प्रकारच्या शाब्दिक सहानुभूतीचा ओलावाहि बिचाऱ्याला कधीं अनुभवावयास मिळालेला नसल्यामुळें तसा प्रसंग येतांच आजपर्यंत हृदयांत साठवून ठेविलेलें अंतरीचें दुःख उसळीनें बाहेर पडलें.

"वा, तूं सांगत असलास तर तुझी कहाणी ऐकण्याची माझीहि इच्छा आहे. सांग पाहूं सारी हकीकत झटकन्, संध्याकाळ होत आली. आमच्या कोठड्या बंद होण्याची वेळ होईल इतक्यांत."

"मी थोडक्यांत संपवतों सगळं पुराण. ऐका—"

असें म्हणून बाबानें ऐसपैस मांडी ठोकली. कांहीं वेळ तो आत्मगत विचारांत असल्यासारखा दिसला. त्या वेळच्या त्याच्या हावभावावरून व चेहऱ्यावरील विकारदर्शनावरून मीं ओळखलें, कीं स्वारी आपल्याशींच एकंदर हकीकत संगतवार जुळवून आठवीत असावी. कांहीं वेळ यांत घालविल्यावर घसा साफ करून बाबानें आपल्या जीवन-चरित्राचा इतिहास सांगण्यास सुरुवात केली. मीहि ती हकीकत मन लावून ऐकूं लागलों.

“ तुम्हांला कदाचित् आश्चर्य वाटेल, पण खरंच सांगतों, मला अगदीं पहिल्यांदा तुरुंगांत घालण्यास माझी बायकोच कारण झाली. माझ्या वडलांनीं आमच्या गांवच्या पद्धतीप्रमाणं माझं लहानपणींच लग्न लावून टाकलं होतं. आमच्या गांवापासून दहा कोसांवर दुसरं एक खेडं आहे, तिथल्या पाटलाची मुलगी मला केली होती. लग्नाच्या वेळीं मी सारा दहा वर्षांचा होतों आणि बायकोचं वय सहा वर्षांचं होतं. लग्न म्हणजे काय हें त्या वेळीं मला जितकं कळत होतं तितकंच त्या अल्लड पोरीलाहि कळत होतं. तिचे तर बाहुलीशीं खेळण्याचे दिवसहि संपलेले नव्हते. पण त्या वेळीं आपलं लग्न झालं याचीच आम्हांला गम्मत वाटली इतकं मात्र खरं.

“ असेच कांहीं दिवस गेल्यावर माझ्या वडलांचं पिकलं पान गळून गेलं! त्यांनीं आमच्यासाठीं माया अशी कांहींच राखून ठेवली नव्हती. त्यामुळं अल्पवयांतच मला पोटासाठीं रोजंदारी करणं भाग पडलं. घरीं म्हातारी, लग्नाच्या दोन लहान बहिणी व माझी बायको, इतकी खाणारी मंडळी. इतक्यांच्या पोटाला पुरवण्याची जबाबदारी चौदा वर्षांचा असतांनांच मजवर पडली. गांवांतल्या लोकांचीं गुरं चारून आणणं, कुठं इमारतीचं बांधकाम सुरू असल्यास सुतार-गवंड्यांच्या हाताखालीं राबणं, असलीं कामं करूं लागलों. खेडेगांवांत असलीं कामं फारशीं निघत नाहींतच. जो तो शहराकडे धाव घेऊं लागला असल्यामुळं खेडींपाडीं ओस पडत आहेत, म्हणून माझ्या-सारख्या हरकाम्यांनाहि खेड्यांत पुरा रोजभुरा मिळण्याची मारामार पडते. आधींच माझं वय लहान व त्यांतून खेड्यांची अशी स्थिति त्यामुळं माझ्या आईला संसाराला हातभार लावण्यासाठीं काम पाहणं भाग झालं. गांवांत चार-दोन ब्राह्मणांचीं घरं होतीं तिकडे आईनं भांडीं घासण्याचं काम पतकरलं; व अशा रीतीनं आम्ही आपला उदरनिर्वाह करीत होतों.

“ अशींच आणखी चार-पांच वर्षं गेलीं. म्हातारी वयोमानानं व प्रकृतिमानानं दिवसेंदिवस थकत चालली. पूर्वीप्रमाणं अलीकडे अलीकडे तिला काम रेटीतनासं होऊं लागलं. पण मिळालेलं काम सोडून देणंहि ठीक नव्हतं. कारण मग खायचं काय हा प्रश्न होता. आईच्या हातून जेव्हां अगदींच काम होईना तेव्हां आम्ही आपापसांत ठरवलं, कीं आईच्या कामाची वांटणी करावी. दळणकांडणाचं काम माझ्या बहिणींनीं करावं व भांडीं घासणं, धुणीं धुणं हीं

कामं माझ्या बायकोनं करावींत. याप्रमाणं ठरून माझी बायको बाहेर, लोकांच्या घरीं कामाला जाऊं लागली.

" या वेळीं माझ्या बायकोनं यौवनांत नुकताच प्रवेश केला होता. ती हाडा-पेराची मजबूत असल्यामुळं तिच्या खऱ्या वयापेक्षां ती प्रौढ दिसे. दहा-जणींत ती उठून दिसण्याइतपत नीटनेटकी होती. शिवाय तिच्या सशक्त अंगपिंडामुळं व उंच देहयष्टीमुळं तिच्या चेहऱ्यांत एक प्रकारचा आकर्षकपणा दिसून येई व वाढत्या वयाबरोबर त्याला उन्मादक पाणी येत चाललं होतं. तिला पूर्वीपासूनच नटण्यामुरडण्याची हाव होती. इतर बायकांप्रमाणं आपणहि चार डाग लेवून शरीर शृंगारावं, चांगलीं चांगलीं वस्त्रं नेसून देह भूषवावा, असं तिला मनापासून वाटे. आपल्या रूपाची स्तुति ऐकून तिला साभिमान प्रौढी वाटे. आपल्या अंतःकरणांतल्या विलासी हौशी आपल्या पतीकडून भागवल्या जाव्यात अशी तिची नेहमींची अपेक्षा असे. पण माझ्या दुर्दैवानं अशा गोष्टी करणं मला माझ्या परिस्थितीच्या दृष्टीनं शक्य नव्हतं. माझी ही असमर्थता वाढत्या वयाबरोबर माझ्या बायकोच्या अधिकाधिक ध्यानीं येत चालली, तसतशी माझ्याविषयीं व आमच्या घराविषयीं तिच्या मनांत एक प्रकारची अढी उत्पन्न झाली व तिच्या वर्तनांत ती मला केव्हां केव्हां दिसूंहि लागली. आईच्या अशक्तपणामुळं चार घरीं जाऊन भांडीं घासण्याचं काम जेव्हांपासून माझ्या बायकोला करणं भाग पडलं तेव्हां-पासून तर ती आपला तिरस्कार उघड उघड व्यक्त करूं लागली. घरांत नेहमीं धुसफूस सुरू झाली. घालून-पाडून बोलणीं ऐकूं येऊं लागलीं. म्हातारी व माझ्या बहिणी याहि केव्हां केव्हां तोंड सोडीत व अशा प्रकारें उभयपक्षाच्या तक्रारी व भांडणं माझ्या कानांवर वारंवार येऊं लागलीं. आमच्या गरीबीच्या संसारांत जें सुखसमाधान होतं तें माझ्या बायकोच्या असंतुष्ट स्वभावामुळं नाहींसं झालं. या कारणांनीं बायकोबद्दल माझ्या मनांत द्वेष उत्पन्न झाला.

" अशाहि स्थितींत आणखी कांहीं दिवस गेले. बाह्यात्कारीं आमचे सर्व व्यवहार नेहमींप्रमाणंच चालू असले, तरी अंतरंगांत आमचीं घरगुती भांडणं विकोपास जात चाललीं होतीं. पाया पोखरलेल्या सुंदर इमारतीप्रमाणं आमच्या संसाराचा गाडा चालला होता. माझ्या मनाची खिन्नता असे

प्रकार पाहून वाढत होती व वैतागानं मीं बायकोशीं बोलणंसुद्धां बंद केलं; पण त्याचा तिच्यावर कांहींच परिणाम झालेला दिसून आला नाहीं.

" एके दिवशीं संध्याकाळीं मी कामावरून येऊन घराबाहेरील सारवलेल्या अंगणांत एक तरट टाकून त्यावर दोन्ही हात डोक्याखालीं घेऊन स्वस्थ पडलों होतों.

" इतक्यांत माझी एक बहीण माझ्या अगदीं जवळ येऊन माझ्या कानांत कुजबुजली, 'भाऊ, आज वहिनीनं एक कोरं लुगडं आणलं बघ कुठून तरी. अगदीं आम्हांला कुण्णाला दाखवलं सुद्धां नाहीं. पण वाकळ शिवण्यासाठीं जुनेरीं गोळा करीत असतां सहज खुंटीवरचं एक गांठोडं सोडून पाहिलं, तर त्यांत तें लुगडं दिसलं. आहे आपला सुताडाच ! पण तो तरी वहिनीनं कुठून आणला, हें कळायला नको का? आईनं व मीं तिला पुष्कळ विचारून बघितलं, पण ती उलट आम्हांलाच दटावूं लागली. तूं तरी पहा बाबा विचारून !'

" मी तसाच उठलों न् बायकोला याचा जाब विचारला. तिनं स्वच्छ सांगितलं, कीं 'माझ्या कामावर खूष होऊन राजगुरु सावकारांच्या बायकोनं तो सुताडा मला बक्षीस दिला आहे.'

" या तिच्या उत्तरानं आम्ही सर्वजण स्तंभितच झालों. राजगुरु सावकार श्रीमंत खरे, पण एक पै कुणाला देतील ही आशाच नको. तेव्हां त्यांच्या घरांतून हिला सुताडा कसा मिळाला ? हा प्रश्न तिला करावासा मला वाटलं, पण मघांच्या प्रश्नाचं उत्तर देतांना तिनं जो आविर्भाव केला व आवाज चढवला तो पाहून तिला आणखी प्रश्न विचारणं म्हणजे आगीला वारा देण्यासारखंच आहे असं वाटून मी गप्प राहिलों.

" सुताड्याचं गौप्य प्रगट झाल्यानं तो आतां चोरून ठेवण्याचं कांहींच कारण उरलं नाहीं, अशा समजुतीनंच बायकोनं तो दुसऱ्याच दिवशीं नेसण्यासहि काढला. एक चोरी पचली, कीं आणखी चोऱ्या कराव्याशा वाटूं लागतात. तसंच माझ्या बायकोचंहि झालं. तिला अलीकडे सुताडे, चोळ्या, बांगड्या, नथणी, असल्या 'देणग्या' मिळालेल्या आमच्या दृष्टीस पडूं लागल्या. माझ्या म्हातारीनं त्याच घरीं कामं केलीं, पण तिला कामाच्या मोबदल्याखेरीज

सुतळीचा तोडाहि कुणी कधीं दिला नव्हता, आणि माझ्या बायकोवर मात्र देणग्यांचा वर्षाव व्हावा याचं कारण कांहीं केल्या मला ओळखेना.

"असेच आणखी कांहीं दिवस गेले. माझ्या बायकोला मिळणाऱ्या 'देणग्यां'ची संख्या वाढतच होती. तिच्या या ऐश्वर्याकडे पाहून गांवांत भलभलती टीका होऊं लागली व त्यामुळं मात्र मला एक विशिष्ट संशय येऊं लागला. गांवसावकार राजगुरु यांचा थोरला मुलगा माझ्या बायकोवर फिदा असून तोच तिच्या शरीरसुखाच्या मोबदल्यांत तिला असल्या देणग्या पुरवतो, अशी टीका लोक माझ्या व म्हातारीच्या तोंडावर करूं लागले. कामावरून परत घरीं येण्याला अलीकडे बायकोला बरीच रात्र होऊं लागलेली पाहून माझा संशय वाढला. मी तिच्यावर बारीक नजर ठेवूं लागलों. दुर्दैवानं ही दुष्ट लोकवार्ता खरी असल्याचं मला समक्षच पाहण्यास मिळालं. एके दिवशीं संध्याकाळच्या सुमारास सावकारपुत्र व माझी बायको गांवाबाहेरील सावकारांच्या बंगल्यांत मला अचानकपणें दृष्टीस पडलीं. संशयनिवृत्ति झाली, पण सगळा देह संतापानं नखशिखान्त जळूं लागला. त्या आवेशांत बंगल्यांत मीं घुसून हातांतील कोयत्यानं सावकारपुत्राला ठार करण्याचा प्रयत्न केला. पण वार करतांना कोयता एकाएकीं हातांतून निसटल्यामुळं माझा बेत फसला; तरी मीं त्या नीचाचा गळा दाबण्याचा यत्न केला. पण बायकोच्या आरडाओरडीनं संध्याकाळच्या वेळीं शेतकामावरून परत गांवीं जाणारे चार शेतकरी तिथं जमा झाले व मी पकडला गेलों.

"सावकारानं खूप पैसे खर्च केल्यामुळं माझ्यावर गुन्हा शाबीत झाला, व मला दहा वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा झाली. माझं तुरुंगांत पहिलं पाऊल पडलं तें या कारणानं. त्या वेळीं मीं वीस-बावीस वर्षांचा होतों. तुरुंगांत आल्याबद्दल प्रथमतः मला अतोनात दुःख झालं. पण लवकरच तिथल्या इतर सहकाऱ्यांच्या संगतीनं मी तुरुंगाच्या राहणीला निर्ढावून गेलों.

"तुरुंगांत माझी पांच-सहा दरोडेखोरांबरोबर गट्टी जमली व आम्हीं एके रात्रीं तुरुंगांतून पोबारा केला. मी गांवीं जाऊन पाहिलं. म्हातारी माझ्या दुःखानं मेली होती. बायको सावकारपुत्राची राख होऊन राजरोस राहिली होती. बहिणींचीं लग्नं शेजार-पाजारच्या लोकांनीं लावून टाकलीं होतीं. त्या कुठें होत्या तें मात्र मला समजलं नाहीं. मी फरारी असल्यामुळं

मला उघड प्रगट होणं किंवा कुणाला भेटणं शक्य नव्हतं. शिवाय माझ्या संसाराची अशी धूळधाण झाली होती त्यामुळं मला जीवनाबद्दल कसलीच आशा उरली नाहीं; म्हणून मी तुरुंगांतील दरोडेखोर दोस्तांच्या टोळींत सामील झालों, व त्यांच्याबरोबर चोऱ्या, वाटमाऱ्या, दरोडे हे धंदे मीं सुरू केले. कधींकाळीं पोलिसांच्या हातीं लागल्यास होईल ती शिक्षा भोगावी, व पुन्हा सुटका होतांच पोटासाठीं चोऱ्या कराव्यात असा माझा क्रम झाला. मला पोट भरण्याला चोरीशिवाय दुसरं साधन नाहीं, आणि चोरी केली, कीं तुरुंग हटकून येतोच! या प्रकारामुळं मीं तीस वर्षांवर दिवस तुरुंगांत काढले. त्यामुळं तुरुंग मला घरच्यासारखा वाटत आहे. तुरुंगांत निदान पोटापाण्याला तरी मिळतं. बाहेर चोरी केल्याशिवाय पोट भरणार कसं? म्हणून तुरुंगाचा मला कंटाळा येत नाहीं."

बाबाची ही हकीकत ऐकून मला फार वाईट वाटलें. त्याचें सर्व आयुष्य तुरुंगांत गेलें त्यामुळें त्याच्या बुद्धीला तसें वळण लागलें हें साहजिक आहे; पण मूळचा कांहीं तो दरोडेखोर नव्हे. त्याला पोटाला मिळेना म्हणून त्यानें हा हीन मार्ग स्वीकारला. जर त्याच्या पोटापाण्याची योग्य ती सोय केली तर तो चोरी-दरोडे असले धंदे सोडून देईल असें मला वाटलें. म्हणून मीं त्याला विचारलें, "तुला पोटाला दिलं तर तूं चोऱ्या करण्याचं सोडून देशील? बोल, आहे कबूल?"

"वा साहेब, मग तर देवच पावला म्हणायचा! पोटाला मिळाल्यावर चोरी हो कशापायीं करायची? पण आमच्यासारख्यांना देतो कोण पोटाला? आमची सगळी हयात आतां तुरुंगांतच जायची!" हें शेवटचें वाक्य उच्चारीत असतां त्याच्या आवाजांत निराशेची छटा स्पष्टपणें दिसत होती. त्याच्या स्थितीची मला कींव आली.

मीं त्याला धीर देण्याच्या उद्देशानें म्हटलें, "बाबा, असा निराश होऊं नको. मी तुझ्या पोटाची व्यवस्था करतों. मात्र माझी अट ही, कीं माझ्याजवळ राहून मी सांगेन तें काम केलं पाहिजे. असं कबूल असेल तर सांग, म्हणजे पुढची सर्व व्यवस्था मी करीन."

"कबूल, कबूल, सपशेल कबूल. तुम्ही सांगाल तें काम करीन. पण या

तुरुंगांतून तुम्ही माझी सुटका कराल, तर मी तुमचे उपकार जन्मभर विसरणार नाहीं."

"मग चोरी वगैरे करतां कामा नये —"

"छे-छे साहेब! मग चोरीचं नांव नाहीं घ्यायचा. आपल्याच पायाची आण." माझ्या पायावर हात मारून बाबा म्हणाला.

"ठीक आहे तर. आतां मी पुढं काय करायचं तें ठरवतों. तूं जा. माझी आणखी दोन अडीच महिन्यांनीं इथून सुटका होईल तेव्हां मी तुलाहि बरोबर घेऊन जाईन. जा आतां तूं."

"साहेब, आपण अगदीं देव भेटलांत मला." असें म्हणून बाबानें माझ्या पायांवर लोटांगण घेतलें. त्याच्या डोळ्यांत पाणी चमकलेलेंहि मला दिसलें!

दुसरे दिवशीं बाबाच्या मजबरोबर होणाऱ्या वागणुकींत स्पष्टपणें फरक झालेला मला दिसून आला. पूर्वीपेक्षां तो आतां अधिक आर्जवी, विनम्र व तत्पर झालेला होता. निदान माझ्या कामांत तरी तो मनापासून लक्ष घालीत असल्याचें मला अनुभवास आलें. मीं आनंदांत असल्याचा प्रसंग पाहून मला माझ्या त्या दिवशीच्या आश्वासनाची आठवण करून देण्यास मात्र तो कधीं विसरत नसे. त्याच्या स्वभावांत झालेलें हें परिवर्तन पाहून मला समाधान वाटलें व प्रयत्न केल्यास त्याला प्रामाणिक माणूस बनविणें कठीण नाहीं असें मला वाटूं लागलें.

माझ्या सुटकेचा दिवस जवळ येऊं लागला तेव्हां बाबाबद्दल काय करावें हें मीं आपल्या मनाशीं पक्कें ठरवलें. त्याच्या सुटकेला अद्याप बराच अवकाश होता; पण तोंपर्यंत थांबणें इष्ट नव्हतें. कारण बाबाची सध्यांची इच्छा तोंपर्यंत कायम राहीलच याचा काय नेम? शिवाय दृष्टीआड तो सृष्टीआड या न्यायानें मी तुरुंगांतून सुटून गेलों, कीं तो आमचा तोंडी करार कदाचित् विसरूनहि जायचा एखाद वेळ! हो, त्याचा काय नेम? भोंवतालच्या संगतीचा मनुष्यावर परिणाम झाल्याखेरीज कसा राहील? म्हणून माझ्या मनानें घेतलें, कीं बाबाला आपल्याबरोबर तुरुंगांतून बाहेर काढला पाहिजे.

त्याच्या उरलेल्या शिक्षेची माफी देऊन त्याला माझ्याबरोबरच मोकळा करण्याबद्दल विनंति करण्यासाठीं मीं जेलरसाहेबांची समक्ष भेट घेण्याचें ठरविलें व त्याप्रमाणें एके दिवशीं योग जुळूनहि आला.

सुदैवानें आमचे जेलरसाहेब सुस्वभावी होते. त्यामुळें बाबाबद्दल त्यांच्याजवळ शब्द टाकण्याचे धाडस मला करतां आलें. त्यांना बाबाची हकीकत थोडक्यांत सांगून मीं म्हटलें,

"—तर हें पहा जेलरसाहेब, हें असं आहे. बाबा मूळचा कांहीं स्वभावानं वाईट नाहीं. त्याला त्याची परिस्थिति व नंतर संगत बाधलेली आहे हें त्याच्या या हकीगतीवरून दिसतं. त्याला जर योग्य मार्ग दाखविणारा भेटेल तर तो अजूनहि सुधारण्याची आशा आहे. तीस वर्षं त्यानं तुरुंगांत काढलींच आहेत. आतां तुम्ही त्याच्यावर थोडीशी दया दाखवून त्याला उरलेल्या शिक्षेची माफी करीत असाल तर पहा. म्हातारपणचे दिवस तरी बिचाऱ्याचे सुखासमाधानांत जातील!"

माझी ही विनंति ऐकून जेलरसाहेब खो खो करून मोठ्यांदा हसले. त्यांच्या मतें माझी ही सूचना अत्यंत विक्षिप्त होती. हशाचा आवेग ओसरल्या-नंतर जेलर मला म्हणाले,

"हें पहा मिस्टर, जेलखात्याचा अनुभव मला उणापुरा दोन तपांचा आहे. तुमच्यापेक्षां तुरुंग व कैदी यांच्याबद्दल मला पुष्कळच जास्त माहिती आहे. बाबासारखे जे कैदी आहेत ते तुरुंगांतच मरायचे. तुरुंगाबाहेर ते एक महिनाभर नीट राहायचे नाहींत. अहो, बोलूनचालून कुत्र्याचं शेपूट तें! त्याला तुम्ही कसं सरळ करणार? बाबाचंच उदाहरण घ्या! तुम्हीं म्हणतां तसं गृहीत धरूं, कीं तो मूळचा गुन्हेगार नव्हे. पण गेलीं तीस वर्षं त्याच्या मनावर गुन्हेगारीचेच संस्कार ठसले आहेत; आणि माणसाचे जसे संस्कार तसाच त्याचा संसार होतो. बाबाच्या मनावरील इतक्या दिवसांच्या संस्कारांकडे दुर्लक्ष करून तुम्ही त्याला सुधारूं म्हणतां हें आश्चर्य आहे!"

जेलरसाहेबांचें हें म्हणणें मला पटलें नाहीं. मीं उत्तर केलें, "हें तुमचं बोलणं जेलच्या अधिकाऱ्याला शोभण्यासारखंच आहे! जेलमध्यें येणाऱ्या कैद्यांची गुन्हेगारीकडे प्रवृत्ति होणार नाहीं असं शिक्षणच त्यांना इथं दिलं जात नाहीं. त्यामुळं तर गुन्हेगारांना आजन्म गुन्हेगारच राहावं लागतं. पण मी म्हणतों, हा वाद हवा कशाला? मी बाबाच्या मनावरचे गुन्हेगारीचे संस्कार

घालवून त्याला प्रामाणिक नागरिक बनवून दाखविण्याची हिंमत बाळगतों. तुम्ही त्याला उरलेली शिक्षा माफ करतां का? सांगा."

"हें पहा, तो अधिकार 'आयू. जी.'चा आहे." जेलर थोड्या नरमाईनें म्हणाले, "तथापि तुम्ही म्हणतांच तर मी तसं करण्याबद्दल वरती शिफारस करीन. पण माझं हें वचन आपलं तुम्ही लक्षांत ठेवा, कीं तुरुंगांतून सुटल्यापासून महिन्याच्या आंत बाबा फिरून तुरुंगांत येईल. अहो, संस्काराची मनावरील पकड कशी नाहींशी होईल?"

"तें पाहूं म्हणा." मीं अविश्वासदर्शक स्वरांत म्हटलें.

"ठीक आहे. अनुभवानंच शहाणे व्हा. पण काय हो, या बाबाचा तुम्हीं काय उपयोग करण्याचं ठरवलं आहे? आपली माहिती म्हणून विचारतों हं राग नका मानूं."

"छे-छे, राग कसला त्यांत? बाबा इतके दिवस तुरुंगांत राहून विणकाम वगैरे चांगलं शिकला आहे. या त्याच्या गुणाचा उपयोग करून घेण्याचं मीं ठरवलं आहे. त्याच्या देखरेखीखालीं हातसुती व हातमागी खादीची पैदास करण्याचा मी कारखाना काढणार आहे. या कामीं बाबाची फार चांगली मदत होईल असं मला वाटतं."

"खरं आहे. बाबाला आणि इतरहि सर्व कैद्यांना तुरुंगांत धंदे-शिक्षण देण्याची व्यवस्था केली आहे. हेतु हा, कीं तुरुंगांतून सुटल्यावर या शिक्षणाचा उपयोग करून त्यांना आपलं पोट भरतां यावं. पण हा राजमार्ग सोडून बाबासारखे लोक चोरी-दरोड्याचा आडमार्गच पतकरतात असा अनुभव आहे. कारण त्यांचे मानसिक संस्कार तशाच प्रकारचे असतात. आतां तुम्ही काढणार आहांत त्या कारखान्यांत तरी बाबा किती दिवस टिकतो पाहूं. नाहीं तर एके दिवशीं कारखान्यावरच हात मारून स्वारी परत यायची तुरुंगांत!" असें म्हणून जेलरसाहेब हसूं लागले. मीहि त्यांच्या हसण्याला अल्पसें साहाय्य केलें.

याच विषयासंबंधीं आणखी थोडा वेळ जेलरबरोबर बोलणें होऊन 'आयू. जी.'कडे बाबाच्या शिक्षेच्या माफीबद्दल अर्ज करण्याचें ठरलें. निरोप घेण्यासाठीं मी उठलों तेव्हां जेलरसाहेब माझ्या किंचित् जवळ येऊन स्नेहपूर्वक म्हणाले, "केवळ तुमच्यासाठीं म्हणूनच मी या खटपटींत पडत आहे. एरवीं माझा

कांहीं या तुमच्या कल्पनेवर विश्वास नाहीं. आतां तुम्ही प्रयोग करून पाहणारच आहांत तर पहा बापडे! पण एक मात्र काळजी घ्या, कीं बाबावर एकदम फारसा विश्वास टाकूं नका; किंवा त्याच्यावर जडजोखीम कांहीं सोपवूं नका. कोणत्या वेळीं त्याचे पूर्व संस्कार जागे होतील व त्यांजकरवीं पापकृत्य करवतील याचा नेम नाहीं, म्हणून आपली सूचना देतों इतकंच."

अखेर माझ्याबरोबर बाबाचीहि तुरुंगांतून सुटका झाली. त्याला स्वतःचें घर-दार असें कांहींच उरलेलें नसल्यामुळें मीं त्याची माझ्याच घरीं राहण्याची प्रथमतः कांहीं दिवसांकरितां म्हणून सोय केली. सुटल्यानंतरचे सात-आठ दिवस अभिनंदनें, मान-सन्मान, पान-सुपाऱ्या, उपाहार वगैरेंचा आस्वाद घेण्यांत गेले. ही औपचारिक वावटळ शमल्यावर हातसुती व हात-मागी खादीच्या पैदाशीचा कारखाना काढण्याच्या उद्योगास मीं लागलों. या कामीं बाबानें मला बऱ्याचशा उपयुक्त अशा सूचना केल्या. तो माझ्या घरीं आल्यापासून इतका चांगला वागत होता, कीं चोऱ्या वगैरे करून ह्या गृहस्थानें तीस वर्षें तुरुंगांत घालवलीं असें कोणास सांगूनहि खरें वाटेना. त्याच्या स्वभावांत झालेल्या या पालटानें मला आनंद झाला. मीं योजिलेल्या कार्यास हा शुभशकुनच वाटला; म्हणून मींहि दुप्पट उमेदीनें कारखान्याच्या योजनेंत लक्ष घालूं लागलों.

या कामासाठीं लागणारें कांहीं सामान जातीनें खरेदी करावें म्हणून मीं चार दिवसांसाठीं मुंबईस गेलों. जातांना बाबावर करडी नजर ठेवण्यास मीं घरच्या मंडळींस व नोकर-चाकरांस बजावून ठेविलें. चार दिवसांनीं इष्ट वस्तु विकत घेऊन मी गांवीं आलों. घरांत पाऊल टाकतांच तें सामान दाखविण्याच्या हेतूनें बाबाची चौकशी केली तेव्हां मला समजलें, कीं दागिन्यांच्या पेटीवर डल्ला मारून बाबानें आदल्या रात्रींच पोबारा केला. हाय रे कर्मा!

जेलरसाहेबांचे शब्द माझ्या कानांत घुमूं लागले—

" संस्कार तसा संसार!"

लेखनकाल —मार्च, १९३१.

---

# अण्णांची पहिली तार !

सबंध दिवस नेहमींच्या शिरस्त्याप्रमाणें मुंबईत निरनिराळ्या दैनंदिन कामांत घालवून, अण्णा एका खांद्यावर आपली छत्री धरून, हातांत तांबड्या व पिवळ्या पट्ट्यांची कापडी पिशवी घेऊन, संध्याकाळीं सातच्या सुमारास दादरच्या शिवाजी पार्कसमोरच्या धोंडोबा-सदनांतील आपल्या खोलीवर येऊन दाखल झाले. धोंडोबासदनाच्या पिछाडीस तळमजल्यावरच त्यांचें 'बिऱ्हाड' होतें. त्यांच्या बिऱ्हाडांत दोन खोल्या होत्या व राहणारीं माणसेंहि दोनच; एक अण्णा स्वतः व दुसरा त्यांचा एकुलता एक पुत्र भाऊ. आज अण्णा बिऱ्हाडीं आले तेव्हां भाऊहि त्यांचें स्वागत करण्यास घरीं नव्हता. दोन-चार दिवसांपूर्वींच कांहीं कामासाठीं तो आपल्या मामाच्या गांवीं गेला होता. व आणखी दोन-चार दिवस तरी तो येण्याचा संभव नव्हता.

बिऱ्हाडाचें पितळी कुलूप काढून अण्णांनीं दरवाजा उघडला व आंत प्रवेश केला. हातांतील छत्री व पिशवी खुंटीला टांगून अण्णांनीं डोकीचा जरीचा पांढरा रुमाल काढला व खुंटाळ्यावर ठेवला. कोपऱ्यांतील बिजली-

बत्तीचें बटन दाबून अंगावरचें उपरणें, काळा लांब कोट व जाकीट हींहि वस्त्रभूषणें अण्णांनीं अंगावेगळीं केलीं व 'हुश्श्' करीत डोकीवरील पिकल्या केसांवरून हलुवारपणें हात फिरवीत, शेंडी झटकून खिडकीशेजारच्या आराम-खुर्चीवर अंग लोटून दिले !

थोडा वेळ विश्रांति घेऊन मग स्वयंपाकाच्या तयारीला लागण्याचा अण्णांचा विचार होता. अण्णांच्या बिऱ्हाडांत बायकोमाणूस असें कोणीच नसल्यामुळें पाकसिद्धिहि त्यांनाच करावी लागे. विधुरावस्थेचीं गेलीं वीस वर्षें अण्णांनीं चुलीची आराधना करण्यांत घालविलेलीं असल्यामुळें त्यांना त्यांत मोठेसे श्रम वाटत असत असे नव्हे; उलट खानावळींतील बेचव व बाजारी अन्नापेक्षां स्वहस्तें शिजविलेलें शुचिर्भूत व सात्त्विक अन्नच अण्णांसारख्या भाविक वृत्तीच्या माणसाला जास्त रुचकर वाटत असल्यानें अण्णा पाकसिद्धीचें कार्य हौसेनें करीत असत.

पण अलीकडे वयोमानानें अण्णांना त्याची थोडी जिकीर वाटणें साहजिकच होतें. त्यांचा मुलगा भाऊ हें मनोमन जाणून अण्णांचा भार पुष्कळसा स्वतःवर घेऊन अण्णांना विश्रांति देत असे हें खरें. आज भाऊ घरीं नसल्यानें शेगडी फुलविण्यापासून सारा खटाटोप अण्णांनाच करणें भाग होतें. ब्रह्मचारी आणि विधुर पोटपूजेच्या बाबतींत असे समदुःखीच !

अण्णा आरामखुर्चीवर पडून चार-दोन क्षण होतात न होतात तोंच दाराच्या उंबरठ्याजवळ एका बाजूला कांहीं तरी लिफाफा पडला असल्याचें त्यांच्या दृष्टीला पडलें. कोणाकडून तरी पत्र आलें असावें असें समजून अण्णांनीं उठून तो हातीं घेतला व कोटाच्या खिशांतून चामडी घरांतून चष्मा काढून त्यांनीं तो वाचण्यास सुरुवात केली.

प्रथम अण्णांना अर्थबोधच होईना ! कारण तो लिफाफा म्हणजे कोणाचें पत्रबित्र नसून माटुंगा पोस्ट ऑफिसच्या नांवाचा एक छापील फार्म होता. त्याच्या एका बाजूला लिहिलें होतें कीं, "तुमच्या नांवची तार आली आहे; बिऱ्हाडीं कोणीच न भेटल्यामुळें ती पोस्टांत ठेवण्यांत आली आहे. चोवीस तासांच्या आंत पोस्टांत येऊन ती घेऊन जाण्याची व्यवस्था करावी. तसें न झाल्यास तार परत पाठविली जाईल."

अण्णांनीं हा मजकूर दोन वेळ वाचला, पण त्यांच्या कांहींच ध्यानीं येईना. दुसऱ्या कोणाचा तरी लिफाफा चुकून आपल्या बिऱ्हाडीं पडला नसेल ना, या आशंकेने अण्णांनीं लिफाफ्यावरील पत्ता वाचून पाहिला. तो बरोबर अण्णांचाच होता.

पण आपणांस तार कोठून व कोणी केली असावी याची अण्णांना कांहींच कल्पना येईना. अण्णा हे मराठी भाषेतील एक नामवंत लेखक व वक्ते होते; त्यामुळे त्यांचा पत्रव्यवहार जरी बऱ्यापैकीं होता तरी त्यांना उभ्या आयुष्यांत कोणीहि व केव्हांहि तार पाठविली नव्हती. त्यामुळे अण्णांना आलेल्या या पहिल्याच तारेच्या उगमाविषयीं अण्णांचा कांहींच तर्क चालेना.

तेव्हां निष्फल विचारांत वेळ न घालवितां प्रत्यक्ष माटुंग्याला पोस्ट ऑफिसांत जाऊन यावें असा अण्णांनीं विचार केला व पुन्हा रुमाल-उपरण्यापर्यंत कपडे चढविले. खोलीला कुलूप ठोकून अण्णा रस्त्यावर आले तेव्हां स्वतःशींच ते थोडे चिडल्यासारखे दिसत होते. मुंबईला दिवसभर केलेल्या पायपिटीनें अण्णा श्रमित होऊनच बिऱ्हाडीं आले होते. त्यामुळें ताबडतोब पुन्हा घराबाहेर पडून भ्रमंति करण्याची पाळी आल्यानें त्यांच्या वृद्ध देहाला वाटलेला शीण त्यांच्या संतापांतच रूपांतर पावला. त्यांतच तार कोणाकडून आली असेल, तींत काय मजकूर असेल या कोड्याचा उलगडा होत नसल्यामुळें ते मनांतल्या मनांत थोडे चरफडत होते.

मनाच्या तशा त्रस्थ अवस्थेंत अण्णांनीं शिवाजी पार्कपासून माटुंगा पोस्ट ऑफिसपर्यंतचा प्रवास लेफ्ट्-राइट् करीत कसाबसा संपवला व पोस्टांत प्रवेश केला. तों काय ?—

पोस्ट ऑफिस केव्हांच बंद झालें असल्याचें त्यांच्या दृष्टीला पडलें ! अण्णांना निराशेमुळें इतका संताप आला, कीं ते पोस्टाच्या बंद दरवाजाकडे व त्याला लागलेल्या कुलपाकडे अनिमिष पाहतच राहिले.

जर त्यांच्या डोळ्यांत सामर्थ्य असतें, तर अण्णांनीं तें कुलूप व तो दरवाजा जाळून भस्म केला असता ! पण जुन्या काळच्या संतांनीं केलेल्या अनेक चमत्कारिक चमत्कारांवर अण्णांचा श्रद्धायुक्त विश्वास असला तरी, तसला कांहीं चमत्कार करण्याचें सामर्थ्य मात्र त्यांच्या ठिकाणीं नव्हतें !

अण्णांचा संताप थोडा शमल्यावर त्यांच्या डोक्यांत 'आतां पुढें काय?' हा षडाक्षरी मंत्र घोळूं लागला. पोस्ट उद्यां सकाळीं उघडणार; तोंपर्यंत ती तार कांहीं आपल्या हातीं लागण्याची शक्यता नाहीं हें तर त्यांनीं जाणलेंच. आणि तार हातीं मिळण्याची शक्यता दुरावल्याचें जसजसें त्यांच्या ध्यानीं येत गेलें तसतशी तिच्यांतील मजकूर समजून घेण्याची त्यांची तळमळ वाढत गेली.

अण्णांच्या मनाची मोठी विचित्र कांचणी सुरू झाली. 'मन चिंती तें वैरी न चिंती' म्हणतात, त्याचा अनुभव अण्णांना चांगलाच येऊं लागला. नाना शंकाकुशंकांच्या सुसरी अण्णांच्या निःशंक मानससरोवरांत उमटून अधिकाधिक भेसूर ध्वनि काढूं लागल्यानें अण्णांच्या हृदयांत भीतीनें कालवाकालव सुरू झाली.

साठ वर्षांच्या हयातींत अण्णांना कधीं कोणाकडूनहि तार आली नव्हती. त्यामुळेंच तर या पहिल्याच अनपेक्षित तारेबाबत झालेल्या घोटाळ्यानें अण्णांच्या पोटांत भीतीचे गोळे उठूं लागले. त्यांतच भुकेचे कावळेहि ओरडूं लागल्यामुळें अण्णांना एकदम फार थकल्यासारखें वाटूं लागलें.

कांहीं क्षण अण्णा विचारांच्या अशा सुन्न अवस्थेंत उभे राहिले. इतक्यांत त्यांच्या मनांत एक विचित्र शंका एकाएकीं उद्भवली व त्यासरशीं त्यांच्या चेहऱ्यावर एकदम चिंतेची काळी विषाद छटा पसरली.

भाऊ!— आपला भाऊ— त्याची तर नसेल तार?

या कांहींशा तुटक विचारानें अण्णांच्या पायांतील सारी शक्तीच एकदम नाहींशी झाल्याचा त्यांना भास झाला. किती विचित्र विचार हा! आणि किती भयसूचक!

अण्णांनीं एकवार शरीर थरारल्यासारखें केलें. जणूं काय त्या विचाराचें कुसळ ते झटकून टाकूं पाहत होते.

पण तें कुसळ झटकून न जातां अण्णांच्या मनाला जास्तच खोल बोचूं लागलें. आणि त्याच्या तीक्ष्ण वेदना अण्णांना स्पष्ट जाणवूं लागल्या.

अण्णांचें मन म्हणालें, " भाऊचीच असावी ती तार; एरवीं आपणांला कोण कशाला करायला बसलंय् तार न् बीर? खास भाऊकडून आली असणार तार. ...पण...पण...तींत मजकूर काय असेल? ...भाऊचा मुक्काम

वाढला असेल तिकडचा ?...पण तेवढ्यासाठीं तार कशाला करील तो ? पत्र पाठवून नसतं कळवतां आलं ? मऽग काय ? भाऊ आजा—"

अण्णा हा विचार दडपून टाकूं पाहत होते, पण तो तितक्याच जोरानें अण्णांच्या मनांत उसळत होता; अशी दोघांची रस्सीखेच सुरू होती.

अण्णांचें मन पुन्हा म्हणालें, " खास. भाऊचीच तार ती. शंकाच नको; नाहीं तर कुणाकडून येणार तार आपल्याला ? भाऊ आजारी असावा; तिकडे जातांनाच तो थोडासा 'सिक्' होता; तिथल्या अपरिचित हवापाण्यामुळें त्याचा आजार वाढला असावा. होय, असंच असणार. म्हणूनच आपल्याला तार केली असेल त्या मंडळींनीं."

कांहीं केल्या अण्णांचें मन या विचारापासून परावृत्त होईना. किती तऱ्हांनीं, हा विचार खुळा असल्याची आपली समजूत करून घेण्याचा त्यांनीं प्रयत्न करून पाहिला; पण व्यर्थ ! मिठाईच्या ताटावरील माशीप्रमाणें किती हाकला, तरी फिरफिरून अण्णांचें मन त्याच एका विवक्षित विदारक विचारावर घोंघावत राही !

कांहीं वेळानें तर अण्णांना या विचारानें पुरेंच ग्रासलें. भाऊकडूनच ती तार आली व तो आजारी असल्याचाच तीत मजकूर आहे याविषयीं उत्तरोत्तर त्यांचें मन निःशंक होत चाललें.

आणि या निःशंकतेबरोबर त्यांच्या काळजीचें प्रमाण मात्र वाढूं लागलें. त्या खेडेगांवीं रेल्वेपासून दूर असलेल्या त्या भिकार अर्नाळा गांवांत आपल्या भाऊच्या आजाराची व्यवस्था व औषधापाण्याची सोय कशी काय होईल, त्याची शुश्रूषा कोण करील याचीच विवंचना अण्णांच्या मनाला छळूं लागली आतां.

या विचारांत गर्क असतांच अण्णा माटुंगा पोस्ट ऑफिसांतून बाहेर पडून परत आपल्या घरच्या रस्त्याला लागले होते. दादरच्या बी. बी. अँड सी. आय. च्या रेल्वेस्टेशनपाशीं येतांच अण्णांना एकाएकीं काय स्फूर्ति झाली कोण जाणे; त्यांनीं भाऊच्या भेटीला जायचें मनाशीं ठरविलें व लेडी जमशेटजी रोडवरील आपल्या बिऱ्हाडाकडे वळलेलीं पावलें परत फिरवून उलट बाज़ूला गोखले रोडच्या दिशेनें चालण्यास सुरुवात केली.

गोखले रोडवरील पिलोबानिवासांत अण्णांचा चुलतपुतण्या राहत होता. त्याला बरोबर घेऊन अर्नाळा गांवीं जावें असा अण्णांनीं विचार केला व त्यासाठींच त्यांनीं आपल्या चालीची दिशा बदलली होती.

पण माटुंग्याच्या पोस्ट ऑफिसांत अण्णांना आडव्या गेलेल्या दुर्दैवानें पिलोबानिवासांतहि त्यांचा पाठलाग करण्याचें ठरविलें असावें. एरवीं अण्णा बिऱ्हाडीं गेले तेव्हां, त्यांचा पुतण्या बाहेर गेलेला असावा याचा अर्थ काय? अण्णा मनाशीं चरफडले, पण उपयोग काय?

अण्णांनीं सदानंदाच्या— आपल्या पुतण्याच्या— बिऱ्हाडीं झालेली हकीकत थोडक्यांत सांगून निरोप ठेवला, कीं आपण अर्नाळा गांवीं जायचें ठरवलें आहे, तरी आपल्याबरोबर चलण्याच्या तयारींत राहा. आपण बिऱ्हाडीं जाऊन येतों.

निरोप ठेवून निघाल्यावर अण्णांच्या मनाला थोडें हलकेंसें वाटलें. ते बिऱ्हाडीं आले. पोटांत भूक कडकडत होती. पण त्या स्थितींत स्वयंपाक-पाणी सुचणें शक्यच नव्हतें. शिवाय शक्य तों लवकरची लोकल गाठून जाणें अण्णांना भाग होतें. कारण दादरहून प्रथम सव्वीस मैल वसई स्टेशनवर जायचें व तेथून चार-पांच मैल मोटारनें अर्नाळा गांवीं जायचें, तेव्हां कोठें अण्णांना भाऊचें दर्शन होणार होतें. एवढा प्रवास करून गांवीं लवकर पोंचायचें तर शक्यतों लवकरची लोकल गाठणें भाग होतें. परक्या गांवीं जायचें तर अपरात्रीं जाणें अण्णांना बरें वाटत नव्हतें; आणि आतांच तर रात्रीचे आठ वाजून गेले होते. आतां यापुढें स्वयंपाक करून जेवून जायचें म्हणजे भलताच वेळ होणार. शिवाय अण्णांची मनःस्थितीहि तितकी स्वस्थ नव्हती. तेव्हां थंड्या फराळावरच अण्णांनीं प्रवासाला निघायचें ठरवलें.

अण्णांनीं कसेबसे चार जरूरीचे कपडे व दोन-चार आवश्यक जिनसा आपल्या कापडी हातपिशवींत कोंबल्या. बिऱ्हाडाचीं सर्व दारें-खिडक्या बंदोबस्तानें बंद केल्या व माठांतील पाण्याचे दोन ग्लास पोटांत रिचवून स्वारी बाहेर पडली. बिऱ्हाडाला कुलूप ठोकून अण्णांनीं लेडी जमशेटजी रोडवरून सरळ गोखले रोडवरील पिलोबानिवासकडे मोर्चा वळविला.

अण्णांना शारीरिक श्रम बरेच झाले होते; पण तिकडे आतां त्यांनीं डोळेझाक केली होती. त्यांच्या मनश्चक्षूंपुढें अर्नाळा गांव आणि अंथरुणावर

असहाय पडलेला व आपल्या वाटेकडे डोळे लावून असलेला एकुलता एक मुलगा भाऊच तेवढा दिसत होता काय तो. भाऊच्या भेटीशिवाय त्यांच्या डोक्यांत दुसऱ्या कोठल्याच विचाराला स्थान मिळण्यासारखें नव्हतें. त्यामुळेंच थकल्याभागलेल्या वद्ध पायांना अण्णा आतां तसेच जोमाने दामटीत सदानंदाच्या बिऱ्हाडीं येऊन दाखल झाले.

अण्णांनीं दारांतूनच हाक मारली,

" सदानंद—"

" कोण अण्णा ? " आंतून आश्चर्ययुक्त स्वरांत सदानंदाच्या पत्नीनें उत्तर दिलें, " अय्या, हे तर तुमच्या घरींच गेले आहेत तुमचा निरोप ऐकल्याबरोबर. भेटले नाहींत तर तुम्हांला ? "

" नाहीं ! " अण्णांच्या मुखांतून कसेंबसें हताश उत्तर बाहेर पडलें.

" म्हणजे अशी कशी चुकामूक झाली ? "

बिचारे अण्णा ! काय उत्तर देणार या प्रश्नाचें ते तरी ! सदानंद घरीं न भेटल्यामुळें त्यांची मुळीं कंबरच खचून गेली होती !

" बरं, मी बिऱ्हाडीं जाऊन त्याला गाठतो." असें सांगून अण्णा त्याच पावलीं पुनः शिवाजी पार्कसमोरील धोंडोबासदनांतील आपल्या बिऱ्हाडीं जाण्यास निघाले. अण्णांचे म्हातारे पाय कुरकुर करीत होते, पण तिकडे लक्ष देण्याची ती वेळ नव्हती.

धोंडोबानिवासांत अण्णा येऊन पाहतात तों सदानंदाऐवजीं त्यांच्या बिऱ्हाडाच्या कुलपांत अडकवून ठेवलेल्या एका लहानशा चिठोऱ्यानेंच त्यांचें स्वागत केलें.

" तुमच्या बिऱ्हाडीं येऊन गेलों. कुलूप पाहून परत घरीं जात आहे.

सदानंद."

एवढाच मजकूर पेन्सिलीनें त्या चिठोऱ्यांत खरडलेला होता.

आतां मात्र अण्णांचा संताप आधणाच्या पाण्याप्रमाणें त्यांच्या निमगोऱ्या तरतरीत चेहऱ्यावर उकळून फुटूं लागला. आज सकाळीं कोणाचें तोंड त्यांनीं पाहिलें होतें कोण जाणे; पण कोठून तरी अचानक आलेल्या त्या अज्ञात तारेमुळें अण्णा विलक्षण परिस्थितींत व विचित्र मनःस्थितींत संध्याकाळपासून चकरा खात होते खरे.

चर्च गेट ते विरार आणि परत विरार ते चर्च गेट अशा फेऱ्या दिवसभर करणाऱ्या बी. बी. सी. आय.च्या लोकल गाडीप्रमाणें अण्णा धोंडोबासदन ते पिलोबानिवास आणि पिलोबानिवासपासून धोंडोबासदन अशा चक्रांत सापडले होते!

संतापानें त्या चिठीचे तुकडे तुकडे करून अण्णांनीं फिरून शिवाजी पार्कहून गोखले रोडच्या वारीला सुरुवात केली! अर्नाळयाला पोंचण्यास या मधल्या भानगडीमुळें भलताच उशीर होणार याची अण्णांना खंत वाटत होती व त्या प्रमाणांत त्यांची भाऊबद्दलची विवंचनाहि वाढत होती, त्यामुळेंच तर अण्णा आपल्या तक्रारखोर पायांकडे लक्षहि न देतां झपाझप वाटचाल करीत होते.

पण अण्णांच्या दुर्दैवानें त्यांच्याहि पेक्षां झपाट्यानें चालून त्यांना सामोरें येण्याचा निश्चय केल्याचें दिसत होतें. कारण अण्णा पिलोबानिवासांत सदानंदाच्या घरीं येऊन पाहतात तों ते येऊन पुन्हा चिऱ्हाडीं गेल्याचें कळल्यावरून सदानंद फिरून धोंडोबासदनाकडे गेल्याचें त्यांना कळलें!

पुन्हा चुकामूक!!

अण्णांचा संताप आतां अगदीं 'उसळत, पसरत, तुडवित तनुला' चालला होता. क्षण-दोन क्षण त्यांच्या तोंडून शब्दहि बाहेर फुटेना. गोखले रोड ते शिवाजी पार्कचा दीर्घ प्रवास पुन्हा करण्याचें एकसष्टी उलटलेल्या अण्णांच्या पायांत त्राण आतां उरलें नव्हतें.

थोडा वेळ विचार करून अण्णांनीं सदानंदाच्या 'घरांत' निरोप ठेवला—

"आतां मी परस्पर दादर स्टेशनवरच जातों. सदानंद आलाच इतक्यांत परत, तर वसईला जायच्या तयारीनं त्याला स्टेशनवरच यायला सांगा. मी प्लॅटफॉर्मवर त्याची वाट पाहत बसतों."

अण्णा दादरच्या बी. बी. सी. आय.च्या लोकलच्या प्लॅटफॉर्मवर येऊन गाडीची वाट पाहत एका बाकावर टेकले, तेव्हां त्यांच्या अंगातील खमीस घामानें चिंब भिजून गेलें असल्याचें त्यांच्या ध्यानीं आलें. कपाळावरहि टपोरे घर्मबिंदु विलसत होते. अण्णांनीं खांद्यावरील उपरण्यानें तो 'निढळाचा घाम' पुसून हुश्श् असा उद्गार तोंडावाटे बाहेर जाऊं दिला.

नऊ वाजून गेले होते. लोकल गाड्यांची वर्दळ कांहींशी कमी झाली असून मध्यें वेळेचें अंतर बरेंच सुटत होतें. अण्णांच्या समोरून जाणाऱ्या सर्वच गाड्या त्यांच्या सोईच्या नव्हत्या. शिवाय सदानंद येईपर्यंत प्लॅटफॉर्मवर वाट पाहत राहणें त्यांना भाग होतें.

स्टेशनवरील मोठमोठीं घड्याळें चालतच नसावींत असें अण्णांना वाटत होतें. किती वेळ गेला तरी घड्याळाचे कांटे पुढेंच सरकत नाहींत असा त्यांना भास झाला! मोठ्या घड्याळाची चाल छोट्या घड्याळाइतकी जलद नसावी अशा समजुतीनें त्यांनीं आपल्या खिशांतील घड्याळ काढून पाहिलें. पण छोटें असो कीं मोठें असो, घड्याळांची जात एकच असल्याचा अण्णांना अनुभव आला! त्यांनीं थोड्या घुश्शानेंच घड्याळ खिशांत कोंबलें.

घड्याळ जलद जलद पुढें सरकत नव्हतें आणि सदानंदहि लवकर लवकर येत नव्हता. अण्णांचें अस्वस्थ मन तर अनौळयाच्या वाटेनें भरधाव सुटलें होतें. एक्स्प्रेस व मेलगाड्यांचा वेग देखील त्यापुढें गोगलगाईच्या गतीचा वाटत होता अण्णांना.

अण्णांना हवी होती ती गाडी स्टेशनांतून निघून जायला आणि सदानंदाची मूर्ति प्लॅटफॉर्मवर प्रवेश करायला एकच गाठ पडली अखेर. सोईची गाडी चुकल्याबद्दल अण्णांना आलेला राग त्यांच्या तोंडून बाहेर पडला,

"काय रे शहाण्या! काय घोटाळा केलास सारा?"

"मीं काय केलं अण्णा?" सदानंद म्हणाला, "तुमचा निरोप कळतांच मी तुमच्या बिऱ्हाडीं गेलों, तों घराला कुलूप! म्हणून चिठी ठेवून परत घरीं गेलों, तिथं तुम्ही माझ्या शोधार्थ धोंडोबानिवासाकडे गेल्याचं कळलं, म्हणून पुन्हा तसाच धावत गेलों. तरीहि तुमच्या बिऱ्हाडाला कुलूप! तेव्हां मला वाटलं, तुम्ही हिंदु कॉलनींत माझ्या मावसभावाकडे—रमाकांताकडे—गेला असाल, म्हणून मी तिकडे गेलों. तिथं रमाकांताला सर्व हकीकत सांगितली. तुम्ही तिकडे गेलां नसल्याचं कळतांच मी व तो मिळून फिरून तुमच्या बिऱ्हाडीं गेलों. तरी तुमच्या दाराला आपलं कुलूपच पाहून मी व रमाकांत आमच्या घरीं गेलों; तिथं स्टेशनवर येण्याबद्दलचा तुमचा निरोप कळला. तेव्हां रमाकांताला घरीं सोबतीला राहण्यास सांगून मी तडक इकडे निघून आलों."

"अरे, पण तुझी माझी रस्त्यांत कशी नाहीं भेट झाली?" अण्णांनीं धुश्शांतच विचारलें.

"तें मला काय माहीत? मी तर रस्त्यानं सारखा तुम्हांला पाहतच जात होतों."

"मी तर सरळ रस्त्यानं गेलों नि आलों; पण तूं कुठंच कसा दिसला नाहींस?"

अण्णांनीं थोड्या सौम्यपणानें विचारलें.

"हां, तरीच अण्णा!" सदानंद कोडें सुटल्याच्या आविर्भावानें म्हणाला, "मी गेलों मधल्या वाटेनं नि तुम्ही गेलांत सरळ रस्त्यानं नेहमींप्रमाणंच. त्यामुळंच आपली चुकामूक झाली, बरं का."

"पण त्यामुळं केवढा घोटाळा झाला बघ. ही नऊ वीसची गाडी गेली; आतां दहापर्यंत गाडी नाहीं आपल्या सोईची. आणि ती पोंचणार केव्हां वसईला? खास अर्नाळ्याला पोंचायला मध्यरात्र होणार असं दिसतंय्." अण्णा स्वतःशींच पुटपुटल्यासारखे बोलत होते, "अपरात्रीं वाहन तरी मिळतंय् कसं तिकडे जायला कोण जाणे! केव्हां एकदां भाऊला भेटेन असं झालं आहे मला..."

अण्णांची ही विवंचना कांहीं खोटी नव्हती. अखेर एकदांची त्यांना हवी होती ती गाडी आली व तींत सदानंदासह अण्णांनीं आसन ठोकलें. रात्रीचे दहा वाजून गेले असल्यामुळें लोकल गाड्यांत तुरळक प्रवासी होते. बाहेर साधारण काळोखच होता, आणि लोकलसमधील दिव्यांना फासलेल्या निळ्या रंगामुळें गाडींतहि उजेड मंदच होता. अण्णांच्या मानसिक विषण्णतेंत या उदास वातावरणानें भरच टाकली.

तास-सव्वा तासाच्या त्या कंटाळवाण्या प्रवासांत अण्णा किंवा सदानंद कोणीच कांहीं बोलत नव्हते. अण्णांना तर एक शब्द बोलण्याची इच्छा व शक्तीहि उरली नव्हती. गेले दोन-तीन तास त्यांना झालेल्या मानसिक व शारीरिक त्रासाची प्रतिक्रिया आतां होऊं लागली होती. त्यांचे पाय जोरानें ठणकत होते, कपाळाच्या शिरा तडतडत होत्या आणि उपाशी पोटांत गोळे

उठत होते. पण गंमत ही, कीं कांहीं खावें अशी वासनाच अण्णांना उरली नव्हती. त्यांच्या मनांत एकच ध्यास होता — भाऊची भेट सत्वर व्हावी !

त्यामुळें साडेअकराच्या सुमारास वसई स्टेशनवर अण्णा उतरले तेव्हां स्टेशनच्या बाहेर असलेल्या दोन-तीन मोटरलॉरी पाहतांच त्यांना फार आनंद झाला. इतकी यातायात करून आल्यासारखें आतां अर्नाळ्याला जातां तरी येईल या विचारानेंच त्यांना समाधान वाटलें.

थोडीफार हाकाहाक केल्यावर एक ड्रायव्हर निद्रादेवीच्या सुखद बाहूंतून स्वतःची सुटका करून घेऊन डोळे चोळीत अण्णांच्या सामने आला. फक्त दोघांच 'पॅसेंजर'साठीं अर्नाळ्याला इतक्या अपरात्रीं गाडी नेण्यास तो तयार होईना प्रथम; पण सबंध गाडीचे अठरा पॅसेंजरांचे पांच रुपये देण्याचें अण्णांनीं कबूल केल्यावर त्यानें स्टिअरिंग् व्हील्वर हस्तकौशल्य दाखविण्यास सुरुवात केली.

मध्यरात्रीच्या काळोखांत अण्णांची 'स्पेशल' मोटर अर्नाळा या कुग्रामीं येऊन दाखल झाली. रस्त्याच्या कडेला उभे राहून चित्रविचित्र सूर, ताना व आलाप काढून बेसूर आवाजांत केकाटणाऱ्या कुत्र्यांखेरीज अर्नाळा गांवांत जागृतीचें कोठें कांहींच चिन्ह दिसून येईना. रस्त्यावर दिवा नसल्यानें अण्णांनीं आपल्या खिशांतली काड्यांची पेटी काढून आपल्या पाहुण्यांचें घर त्या इवल्याशा प्रकाशांत शोधून काढण्याचा प्रयत्न आरंभला.

अण्णांना फार काड्या खर्च कराव्या लागल्या नाहींत. मोटारीचा आवाज ऐकून घराच्या अंगणांतच झोपेची प्रतीक्षा करीत पडलेल्या कोणा खेडवळानें कुतूहलानें विचारलें,

"कोण रे ?"

अण्णांनीं आवाजाच्या दिशेनें काडी ओढून पाहिली, तों ते अण्णांचे मेहुणेच होते.

अण्णा जरा चमकलेच मनांत.

कारण घरांत सारी सामसूम होती. जणूं काय कांहींच झालें नव्हतें.

आणि मग ती तार कशाला पाठविली या लोकांनीं ?

अण्णा बुचकळ्यांत पडले. त्याहिपेक्षां त्यांचे मेहुणे जास्त बुचकळ्यांत पडले.

पूर्वी कांहीं काडीमात्र सूचना नसतां एवढ्या अपरात्रीं स्पेशल मोटर काढून अण्णा आले... आहे तरी काय घोटाळा हा ?

क्षण दोन क्षण दोघे एकमेकांच्या तोंडाकडे पाहत राहिले.

शेवटीं अण्णांनींच विचारलें,

" भाऊचं कसं आहे आतां ? "

" अँ ? " एवढाच आश्चर्याचा हुंकार देऊन मेहुण्यांनीं खाकरा टाकला पचकन् अंगणांतच. " काय, म्हणतां काय ? त्याला काय झालंय् ? वर झोपलाय् स्वस्थ भाऊ तुमचा ! "

असें म्हणून त्यांनीं भाऊला दोन हाका मारतांच तो माडीवरून उठून खालीं आला.

तो होता तसाच सुदृढ स्थितींत होता !

अण्णांना थोडें चमत्कारिक वाटलें, पण भाऊला विस्मयाचा हलकासा धक्काच बसला.

इतक्या अपरात्रीं– अण्णा, आणि इथं !

पण अण्णांनीं भाऊला व त्याच्या मामाला फार वेळ बुचकळ्यांत ठेवलें नाहीं. त्यांनीं झालेली सर्व हकीकत सविस्तर सांगून त्यांचें शंकानिरसन केलें व भाऊला पाहून स्वतःचेंहि करून घेतलें.

मामांनीं दिलेली कॉफी घेऊन घराच्या ओट्यावरच अण्णा व सदानंद यांच्यासाठीं घातलेल्या पथाऱ्यांवर त्यांनीं हातपाय पसरले. झालेल्या परिश्रमांनीं अण्णांना एरवीं अंथरुणाला पाठ लागतांच झोप आली असती. पण निद्रादेवीऐवजीं मत्कुणराजांनींच अण्णांना आपल्या पकडींत तात्काळ घेतल्यामुळें अण्णांची चळवळ–तळमळ सुरू झाली. त्यामुळें झोप नाहीं व संकोचामुळें संध्याकाळपासून उपाशी असल्याची गोष्ट त्यांनीं जाणूनच मेहुण्यापासून लपवून ठेविली होती, त्याचे परिणाम आतां त्यांना भोगावे लागत होते. बिचारे अण्णा ! एका विवंचनेच्या आगींतून सुखरूप सुटले, तों दुसऱ्या चिंतेच्या फुपाट्यांत आपसुखच सापडले.

भाऊच्या आजाराची संशयनिवृत्ति झाल्यावर अण्णांच्या मनांत पुन्हा प्रश्न उपस्थित झाला—'तर मग ती तार कोणी व कशाबद्दल पाठविली?'

खूप विचार करूनहि अण्णांना या प्रश्नाचें उत्तर सुचेना. आयुष्यांत त्यांना आलेली ती पहिली तार! पण ती कोणाकडून व कां आली असावी याचा त्यांना तर्कच होईना. अखेर उजाडतांच मिळेल त्या गाडीनें परत जाऊन माटुंगा पोस्ट ऑफिस गाठायचें असा त्यांनीं मनाशीं निश्चय केला; आणि मेहुण्यांच्या राहण्याबद्दलच्या आग्रहाला न जुमानतां अण्णा सूर्योदया-बरोबर सदानंदासह परत यावयास निघाले. वाटेंत त्यांना मोटारहि मिळाली वसई स्टेशनकडे जाणारी. वसईला लोकलमध्यें चढून सकाळीं आठ-साडेआठला अण्णांनीं एकदांचें माटुंगा पोस्ट ऑफिस गाठलें व पोस्टमास्तराकडे कालचा तो पोस्टाचा लिफाफा देऊन आपल्या तारेची मागणी केली.

पोस्टमास्तरानें ती पोस्टल नोटीस एकदां पाहिली, तारबुकावरून एकदां नजर फिरविली आणि अण्णांकडे अशा कांहीं विचित्र नजरेनें पाहिलें, कीं त्या नजरेंत अट्टल सोद्याकडे पाहण्याची साशंक सावधगिरी होती, कीं अर्धवट वेड्याकडे बघण्याची सानुकंप सहानुभूति होती हें सांगणें कठीण आहे!

"द्या ना मास्तर माझी तार?" अण्णा म्हणाले. तारेपायीं झालेल्या त्रासामुळें अण्णा कावले होते.

"मिस्टर," मास्तर गंभीरपणें म्हणाले, "ही तार तिच्या मालकानं नेली आहे."

"नेली आहे?" अण्णा उसळून म्हणाले. नेणार कोण? मीच त्या तारेचा मालक आहे. पोस्टाची तार आल्याबद्दलची ही नोटीस मलाच मिळाली आहे; आणि तार तुम्हीं दुसऱ्याच कुणाला दिलीत याचा अर्थ काय? तुमच्या विरुद्ध वरती 'कंप्लेन' करतों. पोस्टखात्यांत असली अंदाधुंदी काय कामाची?..."

काल संध्याकाळपासून अण्णांना भोगाव्या लागणाऱ्या यातनांचा हा उद्रेक होता. तो जितका जोराचा होता, तितकाच तो स्वाभाविकहि होता. ज्या तारेपायीं अण्णांनीं आतांपर्यंतचा सारा भोग साहिला होता, ती तारच ऐनार्जनसी नाहींशी झाल्याचें ऐकून, क्षणभर अमेरिकन गँग्स्टरांच्या विलक्षण गोष्टी देखील अण्णांना फिक्या वाटूं लागल्या असल्यास नवल नाहीं.

रात्रीच्या जाग्रणानें आरक्त झालेल्या अण्णांच्या डोळ्यांत रागाचा लाल रंग मिसळला. पूर्वदिवशीं संध्याकाळीं बंद असलेलें पोस्टाचें दारच जाळून भस्म करण्याचें त्यांच्या मनांत आलें असेल, तर आतां सबंध पोस्ट ऑफिसच डोळ्यांतील ज्वालांच्या भक्ष्यस्थानीं टाकून, त्यांत त्या बुरणूसबुद्धीच्या टकल्या पोस्टमास्तराला बळी द्यावा असा विचार अण्णांच्या मनांत खेळूं लागला.

पण इतक्यांतच बळी जाण्याची पोस्टमास्तरची तयारी नसल्यामुळें म्हणा, किंवा अण्णांच्या आवेशामुळें व विशेषतः वरती 'कंप्लेन करण्या'च्या त्यांच्या धमकीमुळें कंप सुटल्यामुळें म्हणा, पोस्टमास्तरांनीं कांहींशा आर्जस्वी स्वरांत अण्णांची समजूत घालण्याचा प्रयत्न आरंभला.

"हें पहा मिस्टर, थोडं धीरानं घ्या. सकाळीं कुणी तरी येऊन तुमचं नांव व पत्ता बरोबर सांगून ती तार घेऊन गेलं खरं! तार नेणारे गृहस्थ चांगले सभ्य दिसत असल्यामुळं व त्यांनीं तुमचं नांव व पत्ता बिनचूक सांगितल्यामुळं, आम्हांला कांहीं शंका घेण्याचं कारण नव्हतं. ही पाहा तारबुकांत त्यांनीं सही सुद्धां केली आहे."

पोस्टमास्तरनें दाखविलेल्या सहीचें अक्षर सदानंदानें तत्काळ ओळखलें. तो अण्णांना हळूच म्हणाला,

"अण्णा, रमाकांतानंच तुमची सही करून तार घेतली खास. घरीं गेल्यावर ती आपणांला मिळेल. कशाला मास्तरबरोबर तंटा करतां?"

पोस्टमास्तरला कांहीं तरी सांगून अण्णा पोस्टांतून बाहेर पडले. पोस्टमास्तरनें त्यांची पाठ वळतांच केलेला चमत्कारिक चेहरा त्यांच्या दृष्टीला पडला नाहीं म्हणून बरें.

गोखले रोडवरील पिलोबानिवासांतील सदानंदाच्या बिऱ्हाडीं दारांत रमाकांत त्यांना भेटला. अण्णा अर्नाळ्याहून इतक्या लौकर परत येतील असा संभव वाटत नसल्यानें व घरच्या बायकांना व स्वतः त्यालाहि तार कोणाची, काय, कोठून आली, हें जाणण्याची उत्सुकता लागून राहिल्यामुळें सकाळीं उठतांच पोस्टांत जाऊन अण्णांच्यासारखी सही करून आपण तार आणल्याचा त्यानें खुलासा केला.

"पण तार कुठं आहे ती?" अण्णांनीं सरळ प्रश्न केला.

रमाकांतानें किंचित् स्मितहास्य करीत कोटाच्या खिशांतून ती तार काढून अण्णांच्या हातीं दिली.

खिशांतील चामडी घरांतून चष्मा काढून, डोळयाला लावून, अण्णांनीं तार वाचली—

सार्वजनिक गणेशोत्सवांत व्याख्यानाला येण्याबद्दल चाळीसगांवच्या लोकांनीं अण्णांना तारेनें दिलेलें तें आमंत्रण होतें ! !

चाळीसगांवकरांनीं दोन पत्रें पाठवून अण्णांना व्याख्यानाबद्दल विचारलें होतें. पण इतक्या म्हातारपणीं इतक्या लांब जाऊन व्याख्यान देण्याची अण्णांची इच्छा नसल्यामुळें, त्यांनीं त्या पत्रांना उत्तरें पाठविण्याची देखील तसदी घेतली नव्हती.

अण्णांच्या या चुकीचें प्रायश्चित्त त्यांना तार करून चाळीसगांवकरांनीं पुरेपूर दिलें खरें !

लेखनकाल—ऑक्टोबर, १९२९.

# रुपेरी पडद्याआड

जिन्यावरून होणारा परिचित पद्रव ऐकूं येतांच, भाकरी करण्यासाठीं मळावयास घेतलेलें पीठ परातींत तसेंच ठेवून, मालिनी आपल्या हृदयेश्वराच्या स्वागतासाठीं स्मितमुखानें खोलीच्या दाराशीं आली. ढग वगैरे कांहींच पूर्वचिन्ह नसतां आकाशांत एकाएकीं इंद्रधनुष्य उमटलेलें पाहून वाटतें तसें कौतुकमिश्र आश्चर्य तिला नरहरीच्या चेहऱ्याकडे पाहून वाटलें. नेहमीं ज्या चेहऱ्यावर उदासीन, निराश ग्लानि पाहण्याची तिला सवय झालेली होती, त्या चेहऱ्यावर, आधींचें कांहींच कारण नसतां, आज होत असलेला आनंद-लहरींचा मनोहर नाच पाहून, तिचा आपल्या डोळयांवर क्षणभर विश्वास बसेना! येणारा प्राणी नरहरीच आहे—का दुसरा कोणी आहे, अशीहि एक शंका क्षणभर तिच्या मनांत येऊन गेली. रोज जिन्याची एकेक पायरी सावकाश-पणें जड पावलांनीं चढणारा नरहरी, आज मधली एकेक पायरी सोडून स्वारी-प्रमाणें जवळजवळ उड्या मारीतच वर चढून येत होता.

गेल्या कित्येक दिवसांत नरहरीच्या चेहऱ्यावर हास्याची रेखा उमटलेली तिनें पाहिली नव्हती. सावट पडलेल्या रोपट्याप्रमाणें त्याचा चेहरा नेहमीं

उदास दिसत असे. नरहरीच्या या स्थितीचें कारण ठाऊक असूनहि त्याच्या दुर्मुखलेल्या चेहऱ्याकडे पाहिलें, कीं मालिनी कष्टी होत असे. तिचें लग्न झालें तेव्हांच्या नरहरीच्या आनंदी स्वभावाचें चित्र तिच्या मनश्चक्षूंसमोर उभें राही; व हल्लींच्या त्याच्या उदासीन खिन्नतेचें विरोधी चित्र पाहून तिला अधिकच दुःख होई. तेव्हांचा नरहरीचा आनंदी, खेळकर व उमदा स्वभाव गेल्या वर्ष-दीडवर्षांत पार बदलून, तो दुःखी, उदासीन व कुढा बनला होता. वसंत ऋतूंतील बागेचें मनोहर सौंदर्य पाहिलेल्या व्यक्तीस शिशिर ऋतूंतील तिची उदास अवकळा पाहून अधिकच दुःख व्हावें, तसें नरहरीच्या स्वभावपरिवर्तनाचीं दोन्ही टोकें नजरेखालून गेल्यामुळे, मालिनीस होत असे. त्याचा पहिला आनंदी व उमदा स्वभाव पूर्ववत् कायम राहावा, त्यानें आपल्याशीं पहिल्यासारख्या प्रेमचेष्टा कराव्यात, आपल्या उभयतांच्या संसारसुखास त्याच्या मानसिक चिंतेमुळें लागलेलें ग्रहण सुटावें, निदान त्याची छाया थोडीफार कमी व्हावी म्हणून मालिनीनें आपल्या बुद्धीप्रमाणें व शक्त्यनुसार आजवर अनेक प्रयत्न करून पाहिले, पण ते सारे फुकट गेले होते. त्यामुळें आज अकल्पितपणें नरहरीला आनंदानें उड्या मारीत येतांना पाहून तिला आश्चर्य तर वाटलेंच; पण त्यांत आनंदाचाहि बराच भाग होता.

आपल्याला समजलेली एखादी महत्त्वाची बातमी आपल्या इतर सुहृद्-जनांना केव्हां एकदां सांगून टाकीन अशी उत्सुकता लागलेल्या लहान मुलाच्या अधीरतेनें नरहरी जिन्याच्या पायऱ्या चढत होता. मुंबईतील मध्यम स्थितींतील लोकांसाठीं बांधलेल्या चाळींपैकींच एका चाळीचा तो जिना होता. तो जितका अरुंद तितकाच उंच व निमुळता होता. तशांत ती वेळ रात्रीच्या सुमाराची असल्यामुळें जिन्यावर अंधार पडला होता. जिन्याच्या वरच्या टोकाशीं एक कंदील मिणमिण जळत असला तरी, त्याचा उपयोग म्युनिसिपालिटीच्या कंदिलाप्रमाणें अंधाराला भयानकताच आणण्याकडे होत होता! पण, जिन्याच्या या गैरसोईबद्दल चाळीच्या 'भाडेउकळू' मालकाला रोज मनांतल्या मनांत शिव्या देणाऱ्या नरहरीनें आज तिकडे लक्षहि दिलें नाहीं. आपल्याला झालेल्या आनंदाची वार्ता मालिनीला सांगण्याची अधीर घाई एकीकडे त्याच्या पायांना वेग देत होती, तर जिन्याच्या टोकाशीं असलेल्या त्याच्या गाळ्याच्या दाराशीं त्याच्या स्वागतार्थ उभी असलेली त्याची हृदय-

देवता दुसरीकडून त्याला आकर्षित होती. या दोन आकर्षक शक्तींच्या घट्ट पकडीमुळें नरहरीचें लक्ष आज जिन्याच्या गैरसोईकडे गेलेंच नाहीं.

एखाद्या कुशल शिल्पकाराच्या सुंदर कलाकृतीवर प्रेक्षकाची नजर स्थिर व्हावी, तद्वत् गाळ्याच्या दाराशीं उभ्या असलेल्या मालिनीच्या मोहक मूर्तीवर नरहरीचे डोळे लागून राहिले होते. दाराच्या चौकटीच्या दोन बाजूंवर दोन हात ठेवून, डावा पाय गुडघ्यांत किंचित् मोडून व कमरेला कांहींसा बाक आणून मालिनी जिन्याकडे तोंड करून उभी होती. खोलींत जळणाऱ्या दिव्याचा उजेड मागच्या बाजूनें मालिनीच्या आकृतीवर पडला होता; त्यामुळें तिच्या पुढील भागावर कांहींसा अंधार पडला होता. त्यामुळें पुढून पाहणाऱ्या नरहरीला तिच्या आकृतिरेखांवर मागून पडणाऱ्या प्रकाशकिरणांमुळें तिची मूर्ति एखाद्या शिल्हौटी चित्राप्रमाणें रम्य दिसत होती. त्या सुंदर चित्राचा भंग करूं नये असें क्षणमात्र त्याला वाटलें. जिन्याच्या शेवटच्या पायरीवर पाय पडतांच, पुष्कळ दिवसांनीं भेटलेल्या सुहृदाला मिठी मारावी त्याप्रमाणें नरहरीनें मालिनीला आवेगानें आपल्या बाहूंत घट्ट कवटाळलें व तिच्या लज्जारक्त सुंदर वदनकमलावर चुंबनांचा वर्षाव करण्यास सुरुवात केली!

आषाढ-श्रावणांतील दीर्घकालीन मेघाच्छादित आकाशानंतर येणाऱ्या शरद् ऋतूंतील चांदण्याची शोभा कांहीं वेगळी असते! तसल्या अपूर्व आनंदाचा लाभ नरहरीच्या या आवेशयुक्त प्रेमकृतीनें आज मालिनीला झाला होता. नरहरीच्या तिच्यावरील प्रेमाचा मध्यंतरीं लुप्त झाल्यासारखा झालेला ठेवा आज फिरून पूर्वीपेक्षांहि अधिक संपन्न स्थितींत तिच्या हातीं लागला, असेंच तिच्या प्रेमपिपासू हृदयास वाटलें व याचा तिला आनंदहि झाला. लग्नानंतर पाहिले कांहीं दिवस तिनें या आनंदाचा अनुभव घेतला होता. पण अलीकडे कित्येक महिने नरहरीच्या मानसिक अस्वस्थतेमुळें ती या सुखास आंचवली होती. नरहरीचें तिच्यावरील प्रेम कमी झालें होतें असें नव्हे, पण त्याच्या मानसिक चिंतेच्या बांधामुळें त्याच्या प्रेमाच्या प्रवाहास पायबंद पडला होता. मालिनीला दुःख होऊं नये म्हणून तो तिच्याशीं मधून मधून शृंगारचेष्टा करी, नाहीं असें नाहीं; परंतु, त्यांत कोठें तरी यांत्रिक निर्जीवपणा आहे असें तिला वाटल्यावांचून राहत नसे.

मालिनी हसली कीं नरहरी हसत असे. ती लाडानें जवळ आली, कीं तो तिचे दोन्ही हात एकत्र करून ते आपल्या दोन्ही हातांनीं घट्ट दाबी. तिनें त्याच्या छातीवर मान टेकली, कीं तो तिच्या रेशमासारख्या मृदु व काळ्याभोर केसांवरून हळुवारपणें हात फिरवी; पण या सर्व क्रिया तो एखाद्या कळसूत्री बाहुलीप्रमाणें करीत असे. त्यांत जिव्हाळा असल्याचें तिच्या अनुभवास येत नसे. असल्या बाबतींत त्यानें होऊन पुढारीपण घ्यावें ही तिच्या मनाची इच्छा अलीकडे कित्येक दिवस अतृप्तच राहिली होती. ती आपण होऊन जवळ आली तर तिचा विरस होऊं नये म्हणूनच केवळ तो कांहीं प्रेमाचे चाळे करी हें खरें; पण ती लटक्या रुसव्यानें दूर होऊं लागली तर तिला थोपवून धरण्याचा बिलकूल प्रयत्न करीत नसे. गेल्या कैक दिवसांच्या या उदास अनुभवाच्या अमावस्येनंतर आज उगवलेल्या या प्रेमचंद्रानें मालिनीच्या मानसाकाशास किती अपूर्व आनंद प्राप्त करून दिला असेल हें वेगळें सांगणें नकोच.

फार दिवसांनीं आलेल्या या पर्वणीचा फायदा न घेण्याइतकी मालिनी खास अरसिक नव्हती! पण तरीहि मुंबईंतील चाळीसारख्या ठिकाणीं बिऱ्हाडां-तील दारांत असल्या प्रेमाचें प्रदर्शन करण्याइतकी ती विनयशून्य नव्हती. ती विद्युत् वेगानें दरवाजांतून बाजूला झाली व तिनें आपल्या पायांनींच दार ढकलून बंद केलें. नरहरीच्या आजच्या या 'अविचारी' कृत्यानें तिला मेल्या-परीस मेल्यासारखें होऊन गेलें. आपल्याला या स्थितींत चाळींतील इतर कोणा रहिवाशानें पाहिलें तर नाहीं ना? या आशंकेनें तिला कसेंसेंच वाटलें, म्हणून आपल्या अंगाभोंवतीं पडलेला नरहरीच्या हाताचा विळखा सोडविण्या-चा प्रयत्न करीत ती लज्जायुक्त कंपित स्वरानें म्हणाली,

"इश्श! हें काय भलतंच? कुणी पाहील ना? सोडा मला."

पण नरहरीला आज जणूं उन्मादवायूच झाला होता. त्यानें आपल्या बाहूंचा विळखा बिलकूल सैल न करतां अधिकच दृढ करीत म्हटलें,

"पाहीनात का कोणी? लग्नाचीं नवरा-बायकोच म्हणतील ना कुणी पाहिलं तर?"

नरहरीचा हा विनोदी कोटिक्रम मालिनीच्या विनयशील भीरु स्त्रीहृदयाला पटण्यासारखा नव्हता. तिनें त्याच्याकडे एक कोपयुक्त नेत्रकटाक्ष फेकून निषेधाच्या स्वरांत म्हटलें,

" हा काय पांचटपणा आरंभला आहे आज? मला नाहीं असला थिल्लरपणा आवडत. सोडा पाहूं मला. कांहीं झोकून तर आला नाहींत ना आज?"

तिनें नरहरीचे हात सोडविण्यांत अखेर यश मिळविलें. तिच्या शेवटच्या कुचेष्टेखोर वाक्यानें नरहरी मनापासून हसला. नरहरी हसतांच मालिनीहि हसूं लागली. नरहरी हसत हसत म्हणाला,

" तूं म्हणतेस तेंच खरं. मी आज थोडा झोकूनच आलों आहे. पण दारू नव्हे हं! घाबरून जाशील नाहीं तर. मीं झोकली आहे ती आनंदमदिरा— अन् तिचाच हा उन्माद आहे."

" पण, इतका उन्माद होण्यासारखा आनंद व्हायला असं झालं आहे तरी काय, बाई?" मालिनीनें औत्सुक्यानें प्रश्न केला.

" झालं आहे काय? अग खुळे! तुझा नवरा आज श्रीमंत झाला आहे श्रीमंत— आहेस कुठं?"

असें म्हणून नरहरीनें प्रेमभरानें तिच्याकडे पाहून तिच्या गालावर हलकेच एक चापट मारली. कृत्रिम कोपानें मानेला एक हिसडा देत मालिनी म्हणाली,

" इश्श! असं कुठलं घबाड हातीं लागलं आज? सांगाल तरी सगळं मला."

तिच्या स्वरांतील उत्सुकता नरहरीला स्पष्ट दिसून आली. त्यानें अंगांतील कपडे काढून ठेवले. तीहि आतां अर्धवट टाकलेला स्वैंपाक पुरा करण्याच्या उद्देशानें चुलीकडे गेली. तिच्यापासून थोड्याशा अंतरावर एक पाट टाकून त्यावर बसून नरहरी सांगूं लागला,

" आजचा माझा आनंद पाहून तुला आश्चर्य वाटलं असेल नाहीं? पुष्कळ दिवसांच्या आजारांतून उठल्यानंतर जशी माणसाला 'खा-खा' सुटते तसंच माझं झालं बघ. दीडवर्षापूर्वी बाबा वारले. तेव्हांपासून आतांपर्यंत मला खऱ्या आनंदाचा असा दिवस दिसलाच नाहीं. बाबांच्या अकालीं मृत्यूमुळं संसाराचा भार अवेळींच माझ्यावर पडला व त्यामुळं कॉलेजांतील शिक्षण

इंटरमीजिएटपासून मला कसं नाइलाजानं सोडून द्यावं लागलं हें तुला ठाऊकच आहे. शिक्षण अपुरं सोडतांना मला ज्या यातना झाल्या त्या माझ्या मलाच ठाऊक! पण पोटाचा प्रश्न सोडविणं अधिक महत्त्वाचं असल्यामुळं मला नाइलाजानं कॉलेजांतील सुखकर जीवनावर पाणी सोडावं लागलं.

"जवळ पुंजी फार थोडी आणि तशांत लग्नामुळं तुझा भार माझ्यावर पडलेला! अशा स्थितींत नोकरी जितक्या लवकर मिळेल तितकं बरं, म्हणून मी गेलं दीड वर्ष खूप खटपट करून पाहिली. याच एका काळजीनं गेले कित्येक महिने माझ्या मनाला काडीचंहि स्वास्थ्य नव्हतं. यामुळंच माझं वर्तन इच्छा नसतांनासुद्धां तऱ्हेवाईक होत होतं. माझं मला हें कळत असे; पण गिरणींतील धोट्यासारखीं माझी असहाय अवस्था झाली होती! परिस्थितीच्या यंत्राच्या हुकमतीखालीं मला धावपळ करावी लागत होती. त्यामुळं मी उदास व दुःखी होतों; व माझ्या या चमत्कारिक वर्तनामुळं तुलाहि फार त्रास सोसावा लागला—"

"मला कसला त्रास!" मालिनी मान वेळीत म्हणाली, "आपल्या छायेखालीं माझे दिवस कसे सुखानं जातात तें मला कळतहि नाहीं."

आपणावरील मालिनीची ती निष्ठा पाहून नरहरीला समाधान वाटलें. गेले कित्येक दिवस त्यानें ज्या मानसिक व आर्थिक यातना भोगल्या होत्या त्यांची झळ थोडीफार तरी कमी होण्यास मालिनीच्या प्रेमळ सहवासाचा त्याला फार उपयोग झाला होता. त्यामुळें मालिनीबद्दल त्याला पूर्वी वाटणारें प्रेम द्विगुणित झालें होतें. खूप खटपट करूनहि कुठेंच नोकरी न मिळाल्यामुळें संसारांत येणाऱ्या आर्थिक अडचणींचा ताप कित्येक वेळां त्याला असह्य होई; व अशा वेळीं आपलें लग्न झालें नसतें तर किती बरें झालें असतें असाहि विचार केव्हां केव्हां नरहरीच्या डोक्यांत येई, नाहीं असें नाहीं. अशा वेळीं, शिक्षण पुरें होईपर्यंत लग्न करण्याची आपली इच्छा नसतांहि, केवळ स्वतःच्या म्हातारपणाच्या सबबीवर आपल्या वडिलांनीं आपल्यावर लग्नाची सक्ती कशी केली याचा इतिहास आठवून त्याला वडिलांचा कांहींसा रागहि येई. पण मालिनी समोर दिसली, तिच्या स्मितमुखावर नजर गेली, कीं पुरें! त्याच्या मनांतील असले विचार नाहींसे होत; व उलट आपल्या पायांत हें नाजूक बंधन दृढ झालें नसतें तर आपण कोठें व कसे वाहवत

गेलों असतों, आपण काय केलें असतें हें त्याचें त्यालाच कळेनासें होई. त्याच्या आयुष्याची नौका या कठीण परिस्थितीच्या वादळांतहि सुरक्षित राहिली होती याचें कारण त्या नौकेला जोडलेलें मालिनीच्या प्रेमाचें सुकाणूं होय, ही गोष्ट नरहरीस मनोमय पटलेली होती. आणि म्हणूनच अशा आपल्या उपकारकर्त्या प्रेमळ जीवास आपल्यामुळें कष्ट सोसावे लागतात या गोष्टीचें त्याला मनांतून दुःख होई. पण परिस्थितीच्या समुद्राचें पाणी कितीहि खारें असलें तरी नरहरीच्या जिवाची टिटवी तें थोडेंच आटवूं शकणार होती ?

हे सारे विचार क्षणार्धात नरहरीच्या डोक्यांत येऊन गेले म्हणून मालिनीच्या बोलण्याचें त्याला अधिकच कौतुक वाटलें. तो थोडासा खिन्नपणें हसून म्हणाला,

" नुसतं तोंडानं म्हटल्यानं माणसाला सुख मिळालं असतं तर आणखी काय हवं होतं ? आजपर्यंत माझ्या बेकारीमुळं तुला दारिद्र्यांत, हालअपेष्टांत दिवस काढावे लागले खरे. पण यापुढं मात्र तुला चार दिवस सुखाचे जातील अशी मीं आज व्यवस्था केली आहे."

" माझ्या सुखाचं मेलं असो. तुम्ही सुखी असलांत तर मला कसलं आलं आहे दुःख ? पण आज तुम्हांला एवढा आनंद कां झाला तें अजून नाहींच सांगितलं तुम्हीं." भाकरी करायच्या संपल्यामुळें पिठाची परात पाण्यानें विसळून तें पाणी शिजत असलेल्या आमटीच्या पातेल्यांत ओतीत मालिनीनें विचारलें.

" अरेच्या ! असं झालं का ? " स्वतःच्या या विसराळूपणास स्वतःच हसून नरहरी म्हणाला, " पोहायला म्हणून जावं न् तळ्याची शोभा पाहण्यांतच सारा वेळ गमावून बसावं तशापैकींच झालं म्हणायचं हें ! बरं ऐक तर आतां— रोजच्याप्रमाणंच आजहि सर्व दिवस नोकरीसाठीं वणवण भटकून, संध्याकाळीं चौपाटीच्या वाळवंटांत बसलों असतां आज तिथं एका भल्या गुजराथी गृहस्थाची दैवयोगानं गाठ पडली. त्यांना काय वाटलं कुणास ठाऊक. ते कांहीं क्षण माझ्या चेहऱ्याकडे निरखून पाहतच राहिले. नंतर माझ्याजवळ बसून त्यांनीं एखाद्या जवळच्या नातलगाप्रमाणं माझी चौकशी केली. माझी

बेकार स्थितींतील दीनवाणी हकीकत ऐकून त्या दयाळु गृहस्थांना माझी करुणा आलीसं दिसलं. त्यांनीं सहानुभूतीपूर्वक मला विचारलें,

" मी तुम्हांला नोकरी देतों, पत्करतां ? "

" क्षणभर काय बोलावं तेंच मला कळेना. जन्मांधाला एकदम दृष्टिलाभ झाला, तर प्रथम कांहीं वेळ जसे त्याचे डोळे अगदीं दिपून जातील तसं मला झालं; पण त्या गृहस्थाच्या आपुलकीच्या वागणुकीमुळं धीर येऊन मीं त्यांना साभार होकार दिला. नंतर त्यांनीं नोकरीच्या स्वरूपाविषयीं थोडी माहिती दिली. त्यावरून कळलं, कीं त्यांची एक सिनेमा कंपनी असून त्यांना नायकाचीं कामं करण्यासाठीं माझ्यासारख्या चेहऱ्यामोहऱ्याच्या एखाद्या माणसाची गरज आहे. ते मला प्रथम दीडशें रुपये पगार द्यायला कबूल आहेत. मग काय ?– बोल ! पतकरूं ही नोकरी ? "

नरहरीच्या या अकल्पित प्रश्नानें मालिनीचाहि थोडासा गोंधळ झाला. तिनें क्वचित् प्रसंगीं सिनेमा पाहिलेला असला तरी, नट म्हणून त्यांत काम करावयाचें म्हणजे काय काय करावें लागतें याची फारशी कल्पना तिला असणें शक्यच नव्हतें. त्यामुळें तिला नरहरीच्या प्रश्नास एकदम होकार किंवा नकार देववेना. म्हणून तिनें उलट प्रश्नांची पळवाट काढून विचारलें,

" तुम्ही काय ठरवतां ? "

" त्यांत ठरवायचं काय ? घरीं चालून आलेली लक्ष्मी थोडीच दूर लोटायची आहे ? मी उद्यां त्यांच्या ऑफिसांत त्यांच्याशीं लेखी करारपत्र करून देणार आहे. त्यांना तसं सांगितलंहि आहे आज मीं." नरहरीच्या बोलण्यांत आत्मप्रौढीचा भाग नव्हता असें म्हणणें सत्यास सोडून होईल.

आपल्या नवऱ्याला एकदम दीडशें रुपयांची नोकरी लागली या बातमीनें मालिनीला आनंद झाल्यावांचून कसा राहील ? तिनें नवऱ्याकडे अभिमानानें एकवार पाहिलें व विचारलें,

" त्या उपकारकर्त्यांचं नांव काय ? देव त्यांचं भलं करो ! "

" त्यांचं नांव इन्दुवदन दवे. ते येथील प्रख्यात डेक्कन पिक्चर्स कॉर्पोरेशनचे मॅनेजिंग डायरेक्टर आहेत. त्यांच्या फिल्म्स फार लोकप्रियहि आहेत. आतां राणीसाहेबांना त्या वरचेवर बघायला मिळतीलच म्हणा ! "

" तरीच आज तुम्ही इतके खुषींत होता म्हणायचे!" मालिनीनें त्याच्या-पुढें जेवणासाठीं ताट ठेवीत म्हटलें.

" हो, कां असूं नये ?" नरहरी हसत हसत म्हणाला, " पुष्कळ दिवसांची मनीषा पूर्ण झाली म्हणजे आनंद हा होणारच. आजपर्यंत नोकरीसाठीं खूप धडपड करून पाहिली पण कुठंच दाद लागेना; पण अखेर माझ्या शिक्षणा-पेक्षां माझ्या रूपानंच हात दिला म्हणायचा !"

" इश्श, कांहीं तरीच आपलं!" नवऱ्याच्या गौरवर्ण रेखीव चेहऱ्याकडे प्रेम-भरानें लज्जायुक्त कटाक्ष फेकीत मालिनी उद्गारली व तिनें भात उकरण्यास सुरुवात केली.

" हूं नरहरपंत, आतां तुम्ही पुढें या आणि चंद्रिकेचे दोन्ही दंड आपल्या दोन्हीं हातांनीं घट्ट धरा."

डेक्कन पिक्चर्स् कॉर्पोरेशन्चे डायरेक्टर इन्दुवदन दवे हे आपल्या नव्या चित्रपटाचें—प्यारी दिलबहारचें—शूटिंग करीत होते. कॉर्पोरेशनच्या भव्य व सुसज्जित स्टूडिओमध्येंच शूटिंगचें काम चाललें होतें. कापडाचीं मोठमोठीं रंगीत व सचित्र फ्लॅट्स लावून एका भव्य दिवाणखान्याचें दृश्य तयार केलें होतें. चित्रपटांतील नायक चोरून रात्रीच्या वेळीं नायिकेची भेट घेण्यासाठीं येतो व कांहीं वेळ त्या दोघांचें प्रेमसंभाषण झाल्यावर कोणाची तरी चाहूल ऐकूं आल्यामुळें, नायक घाइघाईनें नायिकेचा निरोप घेऊन पळून जातो. पण जाण्यापूर्वी एकवार नायिकेच्या प्रेमालिंगनाचें सुख उपभोगण्याचा मोह त्यास अनावर होतो. अशा प्रसंगाचा देखावा घेण्याचें काम सुरू होतें. नरहरीनें या चित्रपटांत नायकाची भूमिका स्वीकारली असून नायिकेचें काम कॉर्पोरेशनची मुख्य नटी मिस् चंद्रिका हिनें केलें होतें.

चंद्रिका ही नटी रूपानें फारशी चांगली होती असें नव्हे. पण अनेक वर्षें सिनेमांत काम केल्यामुळें, आपल्या तुटपुंज्या रेखीवपणांत कसबाची भर घालून, उन्मादकपणा कसा आणावा हें तिला पुरतें कळून चुकलें होतें. ती नेहमींच आपल्या केसांची फुगीर रचना करीत असे. वेषभूषेंत भडकपणा कायम राहील इकडे तिचा विशेष कटाक्ष असे. आज तिला एका मुसलमानी

सरदार-कन्येची भूमिका करावयाची होती. त्यासाठीं तिनें सर्वांग सहजींच दिसेल असें तलम पण भडक रंगाचें जरीचें वस्त्र परिधान केलें होतें. वक्षः-स्थलावरून तसल्याच प्रकारच्या वस्त्राची नीट घडी करून ती तिनें आपल्या खांद्याखालून व वरून आडवी आवळून बांधली होती. नेसत्या वस्त्राचा पदर तिनें मुसलमानी पद्धतीप्रमाणें आपल्या केसांवरून घेतला होता. हाताचे दोन्ही दंड मात्र उघडेच सोडलेले होते. तोंड व ओठ यांचें रंगकाम नेहमींसारखेंच भडक होतें.

अशा थाटानें मिस् चंद्रिका हळूहळू आपल्या महालाच्या सज्जांत प्रिय-कराची वाट पाहत येरझारा करीत होती.

तिच्या प्रियकराची भूमिका नरहरीनें घेतलेली होती. तोहि एक सरदार-पुत्रच होता. पण बादशहाची नामर्जी होऊन त्याला हद्दपारीची शिक्षा झाली होती व त्यामुळें सध्यां त्याला विपन्नावस्था प्राप्त झाली होती. तथापि, देशी सिनेमांतील नेहमींच्या पद्धतीप्रमाणें त्या सरदारकन्येचें त्याजवरील प्रेम तिळ-मात्रहि कमी होत नाहीं. त्यांच्या चोरून भेटी होऊं लागतात. अशाच एका गुप्त भेटीच्या देखाव्याचें 'चित्रीकरण' आज चालू होतें. नरहरी व चांद्रिका नायक-नायिकेच्या वेषांत एकमेकांचा निरोप घेत होतीं व डायरेक्टर इन्दुवदन हे मोठमोठ्यांदा ओरडून त्यांना अभिनयाच्या सूचना देत होते. त्यांच्या सूचनेबरहुकूम नरहरी व चांद्रिका यांना कृति करणें भाग होतें.

नरहरीनें पुढें होऊन चांद्रिकेचे उघडे दंड आपल्या दोन्ही हातांनीं घट्ट दाबून धरले.

"हं अस्सं, ठीक!" इन्दुवदन समाधानी स्वरानें म्हणाले, "चांद्रिके, आतां तूं लाजून खालीं पहा. गालांवर लाली येऊं दे. हं अस्सं. डावा डोळा तिरपा करून नरहरीकडे पहा. गालांतल्या गालांत हास. वाः ठीक! आतां नरहरपंत तुम्ही तिला एकदम आलिंगन द्या......कट्."

असल्या प्रकारच्या अभिनयाचा नरहरीला हा पहिलाच प्रसंग होता. त्यामुळें तो मनांतून बिचकून गेला होता. पण डायरेक्टराच्या आज्ञेप्रमाणें कृति केलीच पाहिजे; नाहीं तर शिव्या खाण्याचा प्रसंग येतो, हें आतां महिन्या दीडमहिन्याच्या अनुभवानें त्याला चांगलें कळून चुकलें होतें. त्यामुळें गुराखी नेईल त्या रस्त्यानें जाणाऱ्या पाळीव गुराप्रमाणें डायरेक्टर सांगील

त्याप्रमाणें तो कृति करीत होता. पण, असल्या हुकुमाच्या निर्जीव तालमीनें डायरेक्टराच्या मनाचें समाधान होण्यासारखें नव्हतें. आज इतकीं वर्षें सिनेमाचा धंदा करून प्रेक्षकांच्या आवडीनिवडीचें सूक्ष्म ज्ञान त्यांनीं अनुभवानें पैदा केलेलें होतें. त्यामुळें आलिंगनाचे प्रवेश जितके उत्तान व अधिक तितका तो चित्रपट अधिक लोकप्रिय होतो व धनलाभ करून देतो हें त्यांना पक्कें माहीत होतें. देशी सिनेमाच्या प्रेक्षक-वर्गांत कलेपेक्षां उत्तान प्रसंगाचेच भोक्ते अधिक असतात हें इन्दुवदनांना पुरें कळून चुकलें होतें व म्हणून ते आपल्या चित्रपटांत असल्या प्रसंगांची रेलचेल करून सोडीत.

अननुभवामुळें आलिंगनाच्या प्रसंगीं नरहरी चाचरला. त्याच्या त्या कृतींत डायरेक्टरना हवा होता तो भाव कांहीं आला नाहीं. लागलीच डायरेक्टरांनीं कॅमेऱ्याची घरघर बंद करण्याचा हुकूम सोडला. नरहरीला सभ्य भाषेंत चार शिव्या हासडल्या व आलिंगन कसें द्यावें, त्या वेळीं चेहऱ्यावर कोणता भाव कसा आणावा, याची दीक्षा देण्यास सुरुवात केली आणि अखेर डायरेक्टरांच्या मनाचें पूर्ण समाधान होईपर्यंत नरहरीला तीच ती कृति पंधरा-वीस वेळां करावी लागली, तेव्हां कोठें त्याची त्या दिव्यांतून सुटका झाली.

हा सर्व प्रकार चालू असतां एका गोष्टीनें नरहरीला विशेषच आश्चर्य-चकित केलें. मिस् चंद्रिका इतकी धीट (निर्लज्ज?) असेल अशी त्याची मुळींच कल्पना नव्हती. आलिंगनांच्या या सर्व पुनरावृत्तींच्या प्रसंगीं तिनें जो धीटपणा, जें पुढारीपण दाखविलें त्यानें नरहरी थक्कच होऊन गेला. डायरेक्टरच्या सूचनेच्याहि एक पाऊल पुढें जाऊन ती नरहरीला चेतविण्याचा यत्न करी. त्याचे हात आपण होऊन आपल्या अंगाभोंवतीं ओढून घेई; इतकेंच नव्हे तर, असल्या अभिनयांत दाखविलेल्या अजाणतेपणाबद्दल हसत हसत स्पष्ट शब्दांत तिनें त्याची थट्टाच नव्हे— तर कुचेष्टाहि केली.

आषाढांत पुनः पुन्हा येणाऱ्या पावसाच्या सरींप्रमाणें मिस् चंद्रिकेच्या आलिंगनांचे प्रसंग नरहरीवर वरचेवर येऊं लागले. आणि अति परिचयामुळें पुढें पुढें नरहरीलाहि त्यांत संकोच वाटेनासा झाला. इतकेंच काय, पण असल्या प्रसंगांच्या पुनरावृत्तीबद्दल एक प्रकारची स्पृहा

नरहरीला न कळतच त्याच्या मनांत उद्भवूं लागली. त्यांत चंद्रिकेनें या रोपट्यास आपल्या आकर्षकशक्तीच्या पाण्याचा भरपूर पुरवठा सतत चालूं ठेविला होता. सिनेमांत अनेक वर्षें काम केल्यामुळें, शृंगारिक हावभावांच्या उत्तान अभिनयाचें तिला एक प्रकारचें व्यवस्थित शिक्षणच मिळालें होतें. त्यामुळें निरनिराळ्या पुरुषांच्या हृदयाशीं नानाविध खेळ खेळण्याचें तिच्या अंगवळणींच पडून गेलें होतें. एखाद्या सराईत शिकाऱ्याला रान कसें उठवावें, सावज कसें गाठावें, त्याचा पाठलाग कुशलतेनें कसा करावा व सावज आटोक्यांत येतांच अचूक शरसंधान कसें साधावें, वगैरे मृगयाविषयक ज्ञान जसें अनुभवानें अगवत झालेलें असतें; व प्रसंगीं तो त्या ज्ञानाचा जसा योजकतेनें उपयोग करून शिकार यशस्वी करून दाखवितो, तशीच चंद्रिका आपल्या नरमृगया-कौशल्यांत निपुण होती. तिचा वेध सहसा चुकत नसे. एकदां सावज हेरल्यावर त्यावर नेत्रकटाक्षांचा, स्मित हास्यांचा, वेषभूषेचा, लाडिक वाक्शरांचा कसा उपयोग करावा हें तिला कोणी सांगण्याची जरूरी नसे.

पहिल्याच प्रसंगीं चंद्रिकेनें नरहरीचा अंदाज पूर्णपणें बांधून टाकला; आणि नंतर आपल्या सर्व अस्त्रानिशीं तिनें त्याच्यावर हल्ला करण्यास सुरुवात केली. ती आपण होऊन त्याजबरोबर वारंवार कांहीं तरी बोलणें काढी, त्याच्या दृष्टीला आपली विलासी व चंचल दृष्टि अशी रोखून लावी, कीं नरहरीनेंच बिचाऱ्यानें खालीं मान घालावी. तो स्टूडिओच्या दारांत किंवा खिडकींत उभा असतां मुद्दामच त्याला घसटून जावे किंवा खेटून उभें राहावें. अशा रीतीनें तिनें लाविलेल्या चौफेर सुरुंगांपुढें नरहरीचा मनोदुर्ग किती वेळ टिकाव धरूं शकणार!

पुढें बऱ्याच दिवसांच्या सवयीनें स्टूडिओंतील व रंगपटांतील असल्या अनेक प्रकारांचा विधिनिषेध नरहरीला वाटेनासा झाला होता. त्यांतील जो किळसवाणेपणा प्रथमतः त्याला कसासाच वाटत होता, तो त्याच्या वारंवार होणाऱ्या पुनरावृत्तीमुळें त्याच्या अंगवळणीं पडूं लागला. उन्मादक व उत्तान शृंगारचेष्टांतील अस्वाभाविकपणा सवयीनें नरहरीला रुचूं लागला तर नवल तें काय आहे?

चंद्रिकेच्या मोहलीलांनीं नरहरीचें मन दिवसेंदिवस अधिकाधिक व्याकुल होऊं लागलें. तिचें हसणें, तिचें बोलणें, तिचें चालणें, तिची वेषभूषा वगैरे तिच्या बारीकसारीक हालचालींविषयीं देखील नरहरीच्या मनांत एकसारखे विचार येऊं लागले. एखाद्या दिवशीं चंद्रिका स्टूडिओंत आली नाहीं तर त्याला कांहीं तरी चुकल्या-चुकल्यासारखें होई. तिनें रोज आपल्याशीं कांहीं तरी बोलावें, आपणाकडे पाहून हसावें म्हणून तो नव्या नव्या युक्त्या योजूं लागला. तिला बरोबर घेऊन निरनिराळ्या ठिकाणीं सायंसहलीसाठीं जाण्या-पर्यंतहि अलीकडे नरहरीची मजल गेली होती. अर्थातच चंद्रिकेला या साऱ्या प्रकारांचा अर्थ तेव्हांच कळून चुकला. नरहरीच्या स्वभावांतील या इष्ट फेर-फारामुळें तिला मनापासून आनंदहि होत होता. पण तो आनंद ती उघडपणें व्यक्त होऊं देत नसे. नरहरीभोंवतीं पसरलेलें आपलें मोहजाल, चंद्रिका नाजुक रुसवा, लाडिक हट्ट, असल्या तंतूंच्या साहाय्यानें अधिकाधिक दृढ करीत होती.

चंद्रिकेच्या असल्या कृतीमुळें नरहरीच्या मानसपटावर दोन विरोधी नरदांचें तांडव सुरू झालें. एकीकडे त्याची प्रेमळ, साधीभोळी व विश्रब्ध मालिनी त्याला त्याच्या पायांतील नाजूक शृंखलेची आठवण करून देत असे; तर दुसरीकडे आपल्या उत्तान, उन्मादक व भेदक लीलांच्या फूत्कारांनीं चंद्रिका-नागीण हळूहळू त्याला आपल्या जवळजवळ ओढीत होती. या दोन तलवारी एका म्यानांत वागविण्याचें काम तो किती दिवस निभावून नेऊं शकला असता ? मालिनी व चंद्रिका यांच्याबद्दल जों जों तो विचार करी तों तों त्याला त्या दोघींमधील अंतर समुद्राच्या खोलीप्रमाणें अधिकाधिक भासमान् होई. या दोघींच्या हसण्याची, बोलण्याची, चालण्याची वेषभूषेची—सारांश, दोघींच्या हरेक गोष्टीची तो मनांतल्या मनांत नेहमीं तुलना करी. आणि अशा तुलनेच्या शेवटीं त्याला ठाम वाटे, कीं चंद्रिकेमध्यें मालिनी-पेक्षां कांहीं तरी अधिक आहे. तें काय अधिक आहे हें त्याला सांगतां येत नसे. पण अलीकडे त्याला मनांतून पक्केपणीं वाटे, कीं चंद्रिका आपल्याशीं ज्या प्रेमळ मोकळेपणानें वागते तशी मालिनी वागत नाहीं. तिच्या आपल्या-विषयींच्या वागणुकींत कोठें तरी कांहीं तरी कमी पडत आहे, व तें आपणांस चंद्रिकेच्या सहवासांत मिळतें, अशी अलीकडे त्याच्या मनाची समजूत झाली

होती. आणि या समजुतीच्या चाकोरींत सापडलेला त्याच्या मनाचा गाडा चंद्रिकेच्या मोहपंकांत अधिकाधिक रुतूं लागला.

ही जाणिव जसजशी अधिकाधिक दृढ होऊं लागली तसतसा मालिनीबरोबर होणाऱ्या नरहरीच्या वागणुकींत झपाट्यानें फरक पडूं लागला. मालिनीवरील त्याचें प्रेम आतां चंद्रिकेच्या चरणीं लोळण घेऊं लागलें. मालिनीबरोबर तो पूर्वीप्रमाणें बोले-चालेनासा झाला. त्याचें पाऊल आतां घरांत स्थिर राहीना. स्टूडिओंत काम फार असतें या ठरीव सबबीवर त्यानें मालिनीचें चौकस तोंड बंद करावें व त्या भोळ्या जिवानेंहि तें खरें मानावें! दिवसच्या दिवस नरहरी चंद्रिकेच्या सहवासांत घालवूं लागला. चंद्रिकेनें नुसती इच्छा दर्शवितांच नरहरीकडून त्या इच्छेनुरूप सर्व क्रिया होऊं लागल्या. आपल्या या विजयाचा चंद्रिकेला अभिमान वाटूं लागला. पण तिच्या या अभिमान-हिमालयाचें एव्हरेस्ट शिखर अद्याप तिच्या दृष्टीस पडावयाचें होतें.

पण त्यासाठीं तिला फार वेळ वाट पाहावी लागली नाहीं.

पुढच्याच महिन्याच्या पहिल्या आठवड्यांतील गोष्ट—

त्या सबंध दिवसांत चंद्रिकेची व नरहरीची भेट झाली नव्हती. नेहमींप्रमाणें आज तो आपल्याबरोबर हँगिंग गार्डनवर फिरावयास कां आला नाहीं याचा विचार करीत त्या दिवशीं रात्रीं भोजनोत्तर चंद्रिका आपल्या बिऱ्हाडीं तांबूलसेवन करीत पडली असतां, अचानक तिच्या दारावर थाप मारल्याचा आवाज तिला ऐकूं आला. या भलत्याच वेळीं कोण आलें या विचारांत तिनें किंचित् घुश्शांतच दार उघडलें तों बाहेर नरहरीची मूर्ति उभी! चंद्रिकेला या घटनेचें आश्चर्य वाटल्यावांचून राहिलें नाहीं. नरहरी आपल्या अगदीं आहारीं आला आहे हें तिला माहीत होतें. तिच्या हरेक इच्छेला कृतीचें स्वरूप देण्यांत व्यक्त होणारी नरहरीची उत्कंठाहि तिच्या नजरेंतून सुटलेली नव्हती. तिला घेऊन तो अनेकदां अनेक ठिकाणीं फिरावयासहि गेला होता. हें सर्व खरें असलें तरी नरहरी अद्याप तिच्या बिऱ्हाडीं केव्हांहि आलेला नव्हता, त्यामुळें आज अशा भलत्याच वेळीं त्याला आपल्या बिऱ्हाडीं आलेला पाहून तिला प्रथमतः विस्मय

वाटल्यावांचून राहिला नाहीं. पण त्याच्या चेहऱ्याचें जरा बारकाईनें निरीक्षण करतांच क्षणार्धात त्याचा उद्देश तिच्या ध्यानांत येऊन चुकला. आत्मविजयाची, अभिमानाची एक लाट तिच्या सर्वांगांतून निघून गेली.

तिनें स्वतःची बावरलेली स्थिति सावरली आणि आपलें अभिनयकुशल स्मितहास्य चेहऱ्यावर आणून नरहरीचें स्वागत केलें.

अनोळखी गांवांत नव्यानेंच हिंडणाऱ्या प्रवाशाच्या चेहऱ्यावर व एकंदर हालचालीवर जो एक चोरटेपणा व्यक्त होतो तो नरहरीच्या सर्व कृतींत दिसून येत होता. त्याच्या शरीराला त्याच्या न कळत किंचित् कंप सुटल्या-सारखें झालें होतें. धन्याच्या चाबकाच्या इशाऱ्याप्रमाणें निमूट कामें करणाऱ्या सर्कशींतील जनावराप्रमाणें, चंद्रिकेनें हातांनीं दाखविलेल्या आसनावर तो मुकाट्यानें जाऊन बसला. त्याची खालीं लवलेली नजर वर करण्याचेंहि भान त्याला उरलें नाहीं.

चंद्रिका आपल्याशींच हसली आणि त्याच्यापासून थोड्या अंतरावर बसून मुकाट्यानें पानपट्टी करूं लागली. मागील इतिहासाचा चित्रपट तिच्या मनाच्या पडद्यावरून भराभर सरकून जात होता. कांहीं वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं. शेवटीं तयार केलेली पट्टी नरहरीपुढें करीत चंद्रिकेनें त्याजकडे तिरप्या नजरेनें पाहत विचारलें,

"आज कुणीकडे वाट चुकलांत बाई इकडे!"

नरहरीनें कांहीं वेळ उत्तर दिलें नाहीं. तिनें पुढें केलेली पट्टी त्यानें एकदम तोंडांत कोंबली. त्याच्या मनांत चाललेल्या खळबळीचें अस्पष्ट चित्र त्याच्या चेहऱ्यावर उमटत होतें. शेवटीं त्यानें कांहीं तरी एक निश्चय केला असावा. त्यानें वर मान करून चंद्रिकेच्या हास्यस्मित मुखावर आपली विकारलोलुप नजर रोखली. आणि कोटाच्या आंतील खिशांत हात घालून त्यानें नोटांचें एक पुडकें बाहेर काढलें. चंद्रिकेचा एक हात आपल्या हातीं घेऊन व त्या हातावर आपल्या हातांतील नोटांचें पुडकें ठेवून नरहरी आवेगानें म्हणाला, "आतां नाहीं मला या यातना सहन करवत. चांद्रिके, तूं माझं हृदयसर्वस्व हरण केलं आहेस; तुझ्यावांचून मला आतां जगणंहि अशक्य आहे. माझ्यावर दया कर, मी माझा सारा पगार आज

तुला अर्पण केला आहे. मला आपला म्हण. आपण दोघें सुखानें एकत्र संसार करूं."

धरण फुटलेल्या पाण्याच्या लोंढ्याप्रमाणें नरहरीच्या तोंडून भराभर शब्द बाहेर पडत होते. त्याच्या एकेक शब्दानें चंद्रिकेची आनंदाची लाट गगनाला भिडूं पाहत होती. तिनें नोटांचें पुडकें शेजारच्या गादीखालीं सारीत नरहरीकडे पाहून असें कांहीं मोहक हास्य केलें, कीं त्यांत नरहरीवरील विजयाचा सारा इतिहास भरून राहिला होता !

उतरतीला लागलेल्या दगडाला आपोआप अधिक वेग मिळत जातो तसेंच नरहरीचें झालें. दरमहा पदरांत पडणारा पगार परस्पर चंद्रिकेच्या घराची वाट धरूं लागल्यामुळें इकडे मालिनीबरोबरच याच्या वैवाहिक संसाराची अधिकाधिक दुर्दशा होत चालली. त्याच्या प्रेमळ निगेच्या अभावीं त्याच्या संसारचित्रांतील नाजूक भावनांचे गोड रंग हलके हलके उडून जाऊ लागले. हातीं लागलेल्या सुंदर चित्राला चिठोरें समजून त्याचें स्वहस्तें तुकडे करणाऱ्या आंधळ्या माणसासारखीच त्याची ही कृति होती. परंतु जलविहाराचें सुख भोगूं इच्छिणाऱ्या उन्मत्त हत्तीनें सुंदर कमलांच्या विनाशाची कधीं क्षिति बाळगली आहे काय ?

नरहरीच्या या चाळ्यामुळें मालिनीची स्थिति अधिकाधिक अनुकंपनीय होत चालली. नरहरीनें सांगितलेल्या थापाथापीमुळें प्रथम कांहीं दिवस तिच्या मनाचें समाधान झालें हें खरें. परंतु खालून मुंग्यांनीं पोखरून काढलेल्या खांबाचा तोल चार काटक्यांचा टेकू देऊन कसा सावरतां येईल ? नरहरीच्या चित्तांत झालेली चलबिचल लवकरच मालिनीनें हेरली आणि आतां ती गुप्त राखण्याची नरहरीचीहि इच्छा नव्हती. तो आतां उघड उघड बायकोची उपेक्षा करूं लागला. पूर्वीं कधींच न केलेला कटु वाक्शरांचा प्रयोग करण्यासहि अलीकडे त्यानें सुरुवात केली. तेव्हां नरहरीच्या अधःपाताची गाडी कोठल्या स्टेशनवर गेली आहे याची कांहींशी कल्पना मालिनीस करतां येऊं लागली. तिनें या त्याच्या कृतीबद्दल प्रथमतः सौम्य निषेध, नंतर थोडाफार त्रागा वगैरे तिच्या हातांत होते ते उपाय करून पाहिले, पण

त्यांचा उपयोग तिच्या इच्छेप्रमाणें न होतां उलटाच होत गेला. नरहरीच्या मनावरील चंद्रिकेची पकड किंचितहि ढिली न होतां उलट ती दिवसेंदिवस अधिकाधिक बळकट होऊं लागली.

नरहरी व चंद्रिका यांच्यासंबंधानें कांहीं कांहीं वार्ता कर्णोपकर्णी मालिनी-च्याहि कानीं येऊं लागल्या. असल्या बातम्या ऐकून मालिनीच्या मनाला तीव्र दुःखाचे चटके बसत. याबाबत नरहरीला कांहीं बोलण्याचें तिनें मनाशीं पक्कें ठरविलें होतें. पण अलीकडे नरहरीच्या पायांवर जणूं नक्षत्रच पडलें होतें. तो आठ आठ दिवसांत घरीं फिरकेनासा झाला होता; आणि मधूनच एखाद्या दिवशीं त्याची स्वारी घरीं आलीच तर पत्र टाकण्यासाठीं पोस्टांत जाऊन येण्यासारखें त्याचें हें आगमन असे. मालिनीनें याबद्दल विचाराणा केलीच तर 'औट डोअर सीन्ससाठीं बाहेरगांवीं जावं लागतं' हें उत्तर त्याच्या जीव्हाग्रीं खडे असे. हीच सबब सांगून हल्लीं नरहरी गेला होता त्याला आज पंधरा दिवस झाले होते. आतां मात्र नरहरीची कोणतीहि सबब न ऐकतां त्याला या चाललेल्या प्रकाराबद्दल स्पष्ट जाब विचारावयाचा असा मालिनीनें मनाशीं ठाम निश्चय केला होता; व नरहरी घरीं येण्याचीच काय ती वाट पाहत होती.

अखेर आणखी चार दिवसांनीं नरहरीची स्वारी एकदाची घरीं आली. चेहऱ्यांत फारच फरक पडला होता. तोंड काळवंडलें होतें, डोळे खोल गेले होते व डोळ्यांभोंवतीं काळसर पिवळसर वलय दिसूं लागलें होतें. त्याच्या तोंडावर खिन्नतेच्या दाट छायेबरोबर एकदोन पुसट ओरखडेहि पाहणारास दिसण्यासारखे होते. भर उन्हाळ्यांत भरून आलेल्या ढगामुळें आकाशाला येणारी उदासीनतेची छटा त्याच्या मुखावर पसरली होती. तो जड पावलांनीं हलकेच आपल्या बिऱ्हाडीं आला व खिन्नपणें बाहेरच्या खोलींतील आराम-खुर्चीवर स्वस्थ पडून राहिला. अंगांतील कपडे काढण्याचीहि त्यानें तसदी घेतली नाहीं. एखाद्या निद्राजड माणसाप्रमाणें तो सारे व्यवहार अनिच्छेनें करीत असावा असें दिसत होतें.

बाहेरील खोलींत झालेली कोणाची तरी चाहूल ऐकून कोण आलें आहे हें पाहण्यासाठीं मालिनी आंतून बाहेर आली. तिच्या उदास चेहऱ्यावर क्षीणतेचें पटल दिसत होतें. तिचे डोळे लालसर झाले असून गालावर

पाण्याचे सुकलेले ओघळ दिसत होते. त्यावरून तिनें बराच वेळ अश्रु-मोचनांत घालविला असावा असें उघड दिसत होतें. एखाद्या क्रूर श्वापदाला एकदम समोर आलेला पाहून हरिणी ओरडते तशी आराम-खुर्चीत पडलेल्या नरहरीला पाहून मालिनी किंकाळली. तिच्या त्या आवाजानें नरहरी आपल्या तंद्रींतून जागा झाला. त्यानें एकवार क्रुद्ध नजरेनें मालिनीच्या रागानें थरथरणाऱ्या देहाकडे पाहिलें, आणि खिशांतून धूम्रपानाचें साहित्य बाहेर काढून एक सिगारेट शिलगावली!

नवऱ्यानें केलेला प्रहार मालिनी सहन करूं शकली नाहीं. आजच दुपारीं कळलेल्या नरहरीच्या लीलाचारित्र्यानें केलेल्या तिच्या अंगाच्या भडक्यांत त्याच्या या दुष्ट तुच्छतेनें केवळ तेल ओतण्याचें कार्य केलें. तिच्या नेत्रांतून तिचा राग मूर्तिमंत बाहेर पडत होता. कांहीं तरी बोलण्यासाठीं तिचे ओठ थरथरत होते; पण त्यांतून शब्द मात्र बाहेर पडत नव्हते. नरहरीचें धूम्रपान सावकाश सुरूच होतें.

"घरीं यायला फावलं वाटतं?"

अखेर बऱ्याच खटपटीनें मालिनीच्या तोंडून शब्द निघाले.

"हो."

नरहरीच्या या बेपर्वाईच्या उत्तरांत उद्दाम तुटकपणा भरला होता.

"इतके दिवस कुठं होतां?"

मालिनीनें जबानी घेण्याचें काम पुढें चालू केलें.

"औट-डोअरला गेलों होतों."

निर्ढावलेल्या साक्षीदाराच्या सराईत बेफिकीरीनें नरहरीनें उत्तर केलें.

"चांद्रिका असेलच बरोबर?"

कुणी तरी कढत पाण्याची बादली डोक्यावर ओतावी तसें मालिनीच्या या प्रश्नानें नरहरीस झालें. एकूण ती सारी हकीकत आपल्यापूर्वीच घरीं येऊन पोंचली तर! आतां मालिनी आपल्यावर गहजब करील हें नरहरीस कळून चुकलें. औट-डोअर सीनसाठीं नरहरी व चांद्रिका कॉर्पोरेशनच्या इतर मंडळीं-

सह एका दूरच्या गांवीं गेली असतां तेथें एका ठिकाणीं आपल्या दोनतीन कामगारबंधूंच्या समक्ष नरहरीनें चंद्रिकेनें अर्धवट रिकामा केलेला सरबताचा पेला तसाच तोंडास लावून रिकामा केला होता! या त्याच्या कृत्याबद्दल त्याच्या बरोबरीच्या एक दोघांनीं त्याची उघड निर्भर्त्सनाहि केली. त्यामुळें नरहरीचा राग अनावर होऊन प्रकरण थोडें हातघाईवरहि गेलें होतें. वावटळीप्रमाणें ही वार्ता पिक्चर्स कॉर्पोरेशनमधील सर्व मंडळींच्या कानांवर गेली. याच त्रासाला कंटाळून तो आज घरीं निवांतपणासाठीं आला होता. पण मालिनीनेंहि चंद्रिकेची चौकशी करतांच आगींतून निघून फोफाट्यांत सापडल्यासारखें त्याला झालें.

आतां होणाऱ्या मालिनीच्या हल्लयांतून निसटण्यास त्यास मार्ग दिसेना. चहूं बाजूंनीं कोंडमारा झालेलें मांजर जसें शेवटीं मारेकऱ्यावरच उलटतें तसेंच नरहरीनें केलें. त्यानें नाक फेंदारून कुऱ्यानेंच विचारलें,

“ तुला कां त्याची पंचाईत! जा चालती हो! ”

“ कां, राग आला वाटतं त्या सटवीचं नांव काढलं म्हणून? ” मालिनीहि तितक्याच क्रुद्धतेनें उद्गारली, “ तिच्या उष्टया पेल्यांतील सरबत पिऊन यावं आणखी थोडं म्हणजे डोकं शांत होईल...”

दारूच्या कोठाराला काकडा लागल्यावर स्फोट होण्याला किती अवकाश लागणार? हातांतील जळकी सिगारेट बाहेर फेकून नरहरी आरामखुर्चीवरून ताडकन् उठला आणि रागानें ओरडला—

“ बस्स! एक अक्षर बोलूं नकोस. मी तिचं उष्टं सरबत पिईन–आणखीहि काय हवं तें करीन. तूं कोण मला विचारणार? एक अक्षर बोल म्हणजे कंबरडंच मोडीन...”

“ मी कोण— ” मालिनी उसळली, “ विसरलांत वाटतं इतक्यांतच? मी तुमची लग्नाची बायको आहे, तशी ती अवदसा कोण तुमची? ”

विद्युल्लतेच्या कडकडाटाला मेघांच्या गडगडाटानें उत्तर मिळालें.

“ माझ्या अब्रूवर निखारे ठेवतेस, मग तूं कसली बायको? जा, चालती हो माझ्या घरांतून. आजपासून तुझं माझं नातं चुलींत गेलं. तुझ्या डोळ्यांदेखत चांद्रिकेस घेऊन येतो थांब! ”

नरहरी आवेगानें बाहेर निघालेला पाहतांच मालिनी ओरडली—" तुम्ही पुष्कळ जाल त्या अवदसेकडे; पण मी जाऊं दिलं पाहिजे ना ?"

तिनें एका उडींतच दाराशीं पोंचलेल्या नरहरीचा कोट पकडला. परंतु मोठमोठे दगडहि निमिषार्धांत चिरडून टाकणाऱ्या लोखंडी रुळाचा अवरोध विटकरीच्या तुकड्यानें कधीं केला आहे काय ? मालिनीच्या कंबरेंत त्वेषानें ताडकन् लाथ मारून नरहरी क्षणार्धांत दिसेनासा झाला !

लेखनकाळ—जून, १९३२.

---

# डाकू

सकाळच्या सूर्याची कोवळीं किरणें पूर्वेकडच्या खिडकींतून आंत येऊन, त्या खिडकीसमोरील भिंतीशीं दक्षिणोत्तर ठेवलेल्या पलंगावर लोळत पडलेल्या काशीनाथाच्या तोंडावर पडलीं, तेव्हां कोठें अंगावर लीलेनें लोळणारी पातळ शुभ्र चादर आळसटपणें पायानेंच दूर ढकलून काशीनाथ उठून पलंगावर बसला. अजूनहि त्याच्या डोळ्यांवरची झोपेची सुस्ती पूर्णपणें उडालेली नव्हती. काल रात्रीं 'लव्ह परेड'च्या शेवटच्या 'शो'ला जाऊन आल्यामुळें झालेल्या जागरणाचा परिणाम त्याच्या किंचित् आरक्त व तडतडणाऱ्या डोळ्यांत अजून दिसत होता. पलंगावर बसल्यावर उजवीकडे व डावीकडे वळवेल तितकें वळून त्यानें आपली पाठ मोडून घेतली. हुनवटीखालीं दोनहि हात धरून मानेसहि त्यानें तीच तालीम दिली. उजव्या हातच्या भिंतीशीं एका खिळ्यावर रात्रीं निजतांना टांगून ठेविलेल्या झेनिथ कंपनीच्या 'ऑल गोल्ड' रिस्ट वॉचकडे त्यानें आपली नजर वळवली. धुक्याच्या आवरणानें पलीकडचे पदार्थ अस्पष्ट दिसावते तद्वत् डोळ्यांवर पसरलेल्या निद्राजडत्वामुळें त्याला घड्याळांतील रोमन आंकडे स्पष्ट दिसेनात. म्हणून त्यानें अंगठ्याजवळच्या बोटांनीं आपले दोन्ही डोळे

एकदम चोळले, आणि फिरून घड्याळांत पाहिलें. एकदम त्याच्या तोंडून उद्गार बाहेर पडले—

"ओ माय जोव्ह! एट् फिफ्टीन्!! (काय, सव्वाआठ?)"

कोट झटकून त्यावर चढलेला कोळी झाडावा तद्वत् त्यानें आपलें अंग झटकून अंगांत शिरलेला आळस बाहेर झाडून टाकला. तो पलंगावरून उठला. आंतील मोरीवर जाऊन त्यानें चूळ भरून तोंड धुतलें व दक्षिणेच्या भिंतीला लागून ठेवलेल्या टेबलावरील स्टोव्ह पेटवून त्यानें त्यावर चहाचें आधण ठेविलें. आणि काल सिनेमांत ऐकलेले मॉरिश शेव्हॅलियरचें—

My love parade—
You are my ideal, my love parade.

हें पद तोंडानें गुणगुणत त्यानें दक्षिणेच्या भिंतींतील खिडकी उघडून बाहेर नजर फेकली.

खिडकीला बोल्ट् बसविण्यासाठीं पुढें सरसावलेले त्याचे दोन्ही हात जागचे जागींच थबकले! तोंडांतून निघणारे इंग्रजी पदाचे भावकंपित आलाप जिभेवरच घुटमळूं लागले! रबराच्या बाहुलीप्रमाणें त्याचे डोळे वटारल्यासारखे होऊन समोरच्या दृश्यावर खिळून राहिले!

धावत्या गाडीला अचानक ब्रेक लागावा तद्वत् काशीनाथाच्या देहाच्या सर्व हालचाली एकदम बंद पडल्या!

क्षणमात्र त्याची विचारशक्तीहि कार्यविन्मुख झाल्यासारखी दिसली.

त्या खिडकीसमोरील गॅलरींत त्याला आज एक 'माणूस' दिसलें आणि त्यामुळेंच त्याच्या देहसृष्टींत अशी उलथापालथ झाली होती.

काशीनाथ त्या घरांत राहावयास आल्यापासून तो समोरचा जामा रिकामाच होता. त्या जाप्त्याच्या रस्त्याकडच्या दारावर आज कैक दिवस 'भाड्यानें देणें आहे' ही पाटी धूळ खात लटकत असलेली त्यानें पाहिली होती. मग आगाऊ कांहींच वार्ता नसतां त्या जाप्त्यांत झालेला माणसांचा वावर पाहून काशीनाथास आश्चर्य कां वाटणार नाहीं?

एरवीं कदाचित् या घटनेचें काशीनाथास फारसें कौतुक वाटलेंहि नसतें. भाडेकरू मिळाला, कीं त्या जागेंत माणसांचा वावर दिसणारच; त्यांत काय एवढेंसें?

पण त्या गॅलरींत जें 'माणूस' काशीनाथाच्या दृष्टीस पडलें तें माणूस पाहून काशीनाथाच्या जागीं कोणीहिं तरुण असता तरी त्यास आश्चर्य वाटलेंच असतें.

मेघांची गंधवार्ताहि नसतां वीज चमकलेली पाहून कोणास आश्चर्य वाटणार नाहीं ?

काशीनाथानें पहिल्याच दृष्टिपातांत ओळखलें कीं—

"प्रकरण पुणेरी आहे खास !"

त्याखेरीज गॅलरींत बसून केशभूषा करण्याची धिटाई या आपल्या गांवळ्या गांवांत कोणांत असूं शकणार ? ही पोषाकाची आजतागायत सफाई, सौंदर्य-वर्धनांत दिसून येणारी नवाई, शिक्षणाचें चेहऱ्यावर खेळणारें तेज हीं सारीं पुणेरी लक्षणें काशीनाथाच्या अनुमानास बळकटी आणीत होतीं.

काशीनाथ कांहीं कार्तिकस्वामीचा अवतार नव्हता—

चेहऱ्यामोहऱ्यानें बऱ्यापैकीं दिसणाऱ्या कोणत्याहि स्त्रीला आपली 'हिरॉइन्' समजून तिच्यावर प्रेम करणाऱ्या आधुनिक नाटकांतील 'हीरो-' प्रमाणें काशीनाथानें त्या 'पुणेरी प्रकरणा'चें संपूर्ण वाचन सुरू केलें—

लोखंडी सळया असलेल्या कठडा लावलेल्या गॅलरींत ती सौदामिनी केशविरचना करण्यांत गर्क झालेली दिसत होती. सळयांशीं एक मोठा आरसा ठेविलेला असून त्यांत पाहून ती सेल्युलॉइड कंगव्यानें आपले लांबसडक व काळेभोर तुळतुळीत केस विंचरीत होती. तिचा पोषाक साधाच पण ऐटबाज होता. तिचें शुभ्र पातळ तिच्या तांबूस गौरवर्णाशीं समरस झालेलें होतें. अंगांतील नकशीदार झालरीचा गुलाबी ब्लाउझ तिचें भरदार यौवन चांगलेंच व्यक्त करीत होता. तिच्या सौंदर्यापेक्षांहि तिच्या चेहऱ्यावर व्यक्त होणाऱ्या शांत प्रेमळपणामुळेंच तिच्याकडे पाहण्याचा सात्त्विक मोह अनावर होतो आहे असें काशीनाथास वाटलें. केस विंचरतांना होणारी तिच्या हातांची रुबाब-दार मोहक हालचाल पाहत असतां, तेथून दृष्टि काढूंच नये असें काशीनाथास वाटलें. गारुड्याच्या नादमधुर पुंगीनें मुग्ध होणाऱ्या नागाप्रमाणें त्याची अवस्था झाली.

तो अनिमिष लोचनांनीं तें सुंदर दृश्य पाहतच राहिला !

आपणास अशा स्थितींत कोणी, दुसऱ्या कोणी नाहीं तरी खुद्द तिनेंच पाहिलें, तर आपणांविषयीं तिला काय वाटेल हा विचारहि त्या स्थितींत त्याच्या मनांत आला नाहीं.

थोड्याच वेळांत तिची केशभूषा आटोपली. खालीं ठेविलेला आरसा हातीं घेऊन तिनें चहूंबाजूंस तो वळवून व वांकड्या माना करून आपल्या केशभूषेचें काम समाधानकारक झालें आहे कीं नाहीं तें नीट निरखलें. नंतर समाधानानें स्वतःशींच स्मितहास्य करून तिनें सहजींच समोर पाहिलें, तों—

तिचीहि स्थिति काशीनाथासारखीच झाली.

तिचे चंचल हरिणाक्ष कांहीं क्षण स्थिर झाले!

काशीनाथाचा सस्मित व पाणीदार चेहरा, भव्य कपाळ व त्यावर न विंचरलेल्या स्थितींतहि मोहकपणें खेळणारे अस्ताव्यस्त केस, घारे डोळे...

या सर्वांवरून एकदम दृष्टि काढून घेणें तिलाहि कठीण गेलें असावें; पण काशीनाथाच्या नजरेस तिची नजर भिडतांच ती लाजली व झटकन् कंगवा आणि आरसा घेऊन ती आंत पळाली. जलदीनें जात असतांना दाराच्या उंबऱ्याशीं ती ठेचकळल्याचेंहि काशीनाथानें पाहिलें. पण तिनें जणूं तिकडे लक्षच दिलें नाहीं. ती सुसाट आंत निघून गेली. आपण पाठलाग करीत असलेला ससा अचानक बिळांत शिरलेला पाहून शिकाऱ्याची व्हावी तशी स्थिति काशीनाथाची झाली. वळीव पडून गेल्यावरहि हवेंत कांहीं वेळ आर्द्रता राहावी तद्वत् तें मोहक दृश्य समोरून नाहींसें झालें तरी काशीनाथास कांहीं वेळ त्याचा सुखकर भास होत होता.

निराशेनें एक सुस्कारा टाकून काशीनाथ खिडकींतून मागें वळला. 'स्टो'वर ठेवलेल्या पाण्याला आधण येऊन त्याची वाफ होऊं लागली होती. आतां कोठें काशीनाथास चहाची आठवण झाली. त्यानें नेहमींच्या सवयीप्रमाणें चहाच्या सर्व क्रिया केल्या; पण त्यांत त्याचें लक्ष असल्याचें कांहीं दिसत नव्हतें. वारंवार खिडकींतून तो त्या गॅलरीकडे दृष्टि फेकीत तोंडानें गुणगुणत होता—

The lips of Lucille,
The beauty of Camile,
You are my ideal,
My love parade......

नंतर त्या सबंध दिवसांत काशीनाथानें ती दक्षिणेची खिडकी अजीबात बंद केली नाहीं. इतकेंच नव्हे तर पूर्वेच्या कोपऱ्यांत असलेलें त्याचें लिहावयाचें टेबल व खुर्ची त्यानें मुद्दाम त्या खिडकीसमोर आणून ठेविली. सारा दिवस त्या टेबलावर तो कांहीं तरी लिहीत होता; पण लिहिण्यांत इतका वेळ घालवूनहि काल रात्रीं 'लव्ह परेड'मध्यें ऐकलेले चार-सहा चटकदार व विनोदी चुटके व त्यांतील कांहीं पदखंड यापलीकडे त्याच्या हातून कांहींच लिखाण झालेलें दिसलें नाहीं; आणि व्हावें तरी कसें? लक्ष थाऱ्यावर असेल तेव्हां साऱ्या गोष्टी ना? एखादी हरवलेली वस्तु शोधण्यासाठीं आपण जशी फिरून फिरून तींच तींच ठिकाणें धुंडाळीत असतों तद्वत् काशीनाथ वारंवार त्या दक्षिणेच्या खिडकींतून समोरील गॅलरींत एकसारखा दृष्टिक्षेप करून कांहीं तरी 'हरपलें श्रेय' धुंडाळीत होता.

पण त्या संबंध दिवसांत त्या गॅलरींत पुन्हा कोणी फिरकल्याचें काशीनाथाचे दृष्टीस पडलें नाहीं. एकंदर घरांतहि फारशी हालचाल दिसली नाहीं. आपल्याशीं अनेक तर्कवितर्क करण्यांत त्यानें तो सारा दिवस वेंचला. ही रमणी कोण असावी, ती येथें कां व कशासाठीं आली असावी, तिचा मुक्काम येथें किती दिवस होणार आहे, वगैरे अनेक प्रश्न स्वतःच उत्पन्न करून तो स्वतःच त्यांचीं उत्तरें देण्याचा अयशस्वी प्रयत्न करीत होता. 'तिची आपली ओळख झाली तर काय बहार होईल! या एकांतिक जिण्याचा आतां अगदीं वीट आला बुवा!' असाहि एक ओझरता विचार काजव्याच्या प्रकाशाप्रमाणें त्याच्या मनांत एकवार चमकून गेल्यावांचून राहिला नाहीं.

सबंध दिवसभर मार्गप्रतीक्षा करूनहि सकाळीं दिसलेल्या त्या उषादेवीचें पुनर्दर्शन न झाल्यामुळें, सबंध मृगनक्षत्र पावसाचे चार थेंबहि न पाडतां गेल्यामुळें, शेतकऱ्याची होते तशी काशीनाथाची निराशा झाली. सध्यां कोर्टांना उन्हाळ्याची सुटी असल्यामुळें त्याला काम असें कांहींच नव्हतें. (नाहीं तरी एल्एल्. बी. होऊन पुरतें वर्षहि न झालेल्या या उमद्या वकिलास कोर्टाच्या दिवसांत तरी काय काम होतें म्हणा!) त्यामुळें रोज चार वाजतांच क्लबमध्यें जाऊन कॅरम किंवा ब्रिजचा यथेच्छ समाचार घेणारा काशीनाथ आज सूर्य मावळून गेला तरी खोलींतून बाहेर पडण्याचें कांहीं चिन्ह दिसेना. जणूं एखाद्या अदृश्य शृंखलेनें त्याचे पाय तेथेंच खिळून राहिले होते.

आपणास आज हें असें काय होतें आहे हें त्याचें त्यालाच समजेना. एखाद्या निर्जन ठिकाणीं दुरून कोठून तरी कांहीं गूढ आवाज ऐकूं यावा; पण तो कशाचा आहे हें ओळखतां येऊ नये तसेंच कांहींसें काशीनाथाचें झालें. त्याच्या अंतःकरणांत कांहीं तरी गूढ खळबळाट सुरू होता याची संवेदना त्याला स्पष्टपणें होत होती; पण तो खळबळाट कसला आहे हें मात्र त्याला ओळखतां येत नव्हतें. एका स्त्रीच्या केवळ दर्शनानेंच आपली अशी अवस्था होईल अशी कल्पनाहि आजपर्यंत त्याला कधीं स्पर्श करूं शकली नाहीं.

अखेर अंधार झाला तेव्हां जड अंतःकरणानें काशीनाथ बसल्या जागेवरून उठला व कोट.टोपी कशी तरी अंगावर चढवून व खोली बंद करून तो बाहेर पडला. रस्त्यावर येतांच न कळतच त्याची नजर त्या गॅलरीच्या जाप्त्याच्या रस्त्याकडील दाराकडे गेली. दाराला कुलूप होतें; पण कैक दिवस तेथें दिसणारी 'भाड्यानें देणें आहे'ची मळकट पाटी मात्र स्थानभ्रष्ट झालेली दिसली. माडीवरच्या, इतके दिवस बंद असलेल्या खिडक्या उघडल्या गेल्या होत्या व प्रत्येक खिडकीच्या अर्ध्या भागांत शुभ्र कापडाचे जाळीदार पडदे लाविलेले दिसत होते. तेथें कोणी तरी राहावयास आलें होतें हें नक्कीच. पण ती सकाळीं दिसलेली रमणी दाराला कुलूप लावून या संध्याकाळच्या वेळीं कोठें गेली असावी?—

फिरायला तर गेली नसेल?

होय, असेंच असलें पाहिजे. पुणेरी शिकलेली बाई ती! ती इथल्या अशिक्षित खेडवळ बायकांसारखी फिरायला जायला थोडीच लाजणार आहे?

काशीनाथाच्या मनांत हा विचार येतांच त्यानें क्लबांत न जातां आज आपण फिरावयाला जावें असें ठरविलें.

आणि क्लबचा रस्ता टाळून तो बाजूच्या रस्त्यानें श्रीकरुणेश्वराच्या देवळाच्या रोखानें निघाला.

फिरायला जायचें झालें, कीं याच एका रस्त्याला दूरवरच्या करुणेश्वराच्या देवळापर्यंत जायचें असा काशीनाथाचा नेहमींचा कटाक्ष असे. त्या बाजूस सृष्टिसौंदर्य नयनमनोहर व प्रेक्षणीय होतें. डाव्या हातास डोंगराची ओळ व मधून मधून दिसणारी तुटक्या कड्यांची मौज, उजव्या बाजूस असलेलें, उतरतीवर उगवलेलें व सायंकाळच्या मंद वाऱ्यानें आपले चिमुकले शेंडे

मोहक रीतीनें हलविणारें गवत, व त्यावर चरणारे गुरांचे विखुरलेले कळप, त्यापलीकडे दिसणाऱ्या खेडवळ शेतकऱ्यांच्या साध्या झोपड्या, त्याहि-पलीकडे दिसणारें क्षितिज, वगैरे नैसर्गिक सौंदर्याच्या दर्शनानें मन भारून गेल्यावांचून राहत नसे. आणि करुणेश्वराच्या देवळाभोंवतालचा देखावा तर खरोखरीच आल्हादकारक! नेहमींच तेथें कायमचें बसून राहावें असें वाटे.

आपल्या दिवसभर झालेल्या निराशेची धग या मोहक सृष्टिसौंदर्याच्या सुखसिंचनानें थोडी तरी कमी होईल या आशेनें क्लबांत न जातां आज काशीनाथ या बाजूस वळला. आपल्या या चमत्कारिक मनःस्थितीचा स्फोट कदाचित् क्लबांत होईल व आपण सर्वांच्या कुचेष्टेचे व हास्यविनोदाचे विषय होऊं, अशीहि सकारण भीति त्याला मनांतून वाटत होती. म्हणून या दुहेरी उद्देशानें त्यानें करुणेश्वराच्या देवळाचा रस्ता पकडला.

पण आज त्याच्या कुंडलींत कोणत्या ग्रहाचा जोर होता कोणास ठाऊक!

तो सरासरी निम्मा अधिक रस्ता चालून गेला असेल-नसेल तों त्याच रस्त्यानें समोरून येणारी एक तरुणी त्याच्या दृष्टीस पडली. लोण्याचा वास येतांच नाक फेंदारणाऱ्या मांजराप्रमाणें काशीनाथानें आपली दृष्टि विस्तारली. अंधाराच्या आवरणांतूनहि काशीनाथानें पाहतांक्षणींच ओळखलें कीं—

'सकाळचीच ही तरुणी; शंकाच नको.'

अनपेक्षित स्थळीं भेटलेल्या परिचित माणसाकडे न्याहाळून पाहावें तद्वत् त्या दोघांनींहि एकमेकांकडे त्या अंधारांत न्याहाळून पाहिलें. दोघांनाहि सकाळची ओळख पटली असावी; कारण नजरेला नजर भिडतांच दोघांनींहि ती काढून घेण्याची सारखीच घाई केली; व जणूं काय कांहींच झालें नाहीं असा आविर्भाव करून दोघेंहि आपापल्या मार्गानें विरुद्ध बाजूस चालूं लागलीं.

मंद होत चाललेल्या अग्नीला वाऱ्याच्या झोतानें पुनरपि उजाळा मिळावा तद्वत् काशीनाथाच्या अंतःकरणांतील थोडीशी शांत होऊं पाहणारी खळबळ या पुनर्भेटीनें दुप्पट वेगानें पुन्हा सुरू झाली. जणूं जखमेवर बसत चाललेली खपलीच कोणी तरी खुडून काढली असें त्याला वाटलें!

आतां त्याच्या मनांत दुसरा विचार येणें शक्यच नव्हतें. मधाच्या पोळ्या-भोंवतीं गुणगुणत फिरणाऱ्या मधमाशीप्रमाणें त्याचे विचार आतां त्या एका

तरुणीभोंवतीं घुटमळूं लागले. त्याच्या मनांत एकच विचार आतां स्थिर झाला—

ही तरुणी कोण ?—

आणि गेले दोन दिवस एकसारखा त्याला त्रास देणाऱ्या या प्रश्नाचें उत्तर त्याला एके दिवशीं अभावितपणेंच मिळालें—

त्या दिवशीं करुणेश्वराच्या वाटेवर दोघांची भेट झाल्यापासून काशीनाथ त्याच मार्गानें दुसऱ्या दिवशींहि त्याच वेळीं फिरावयास गेला.

पुन्हा त्या दिवशींहि उभयतांची वाटेंत दृष्टिभेट झाली.

पुन्हा तिसऱ्या दिवशींहि त्याच प्रकारची पुनरावृत्ति झाली !

आणि चवथ्या दिवशींहि—

गोड पदार्थावर बसलेली माशी जराशी उडून फिरून फिरून पुन्हा त्याच पदार्थावर येऊन बसते तसेंच काशीनाथाचें झालें. त्यानें आतां क्लबांत जाण्याचें अजीबात सोडून दिलें व संध्याकाळीं त्या ठरीव वेळीं करुणेश्वराच्या देवळाकडे जाण्याचा उपक्रम चालू ठेविला.

आणि काशीनाथाच्या अंतःकरणांत नवीनच उमटलेली ही देवभक्तीची राजापुरी गंगा आपल्याबरोबर माणूसघाणेपणाचा गढूळपणाहि घेऊन आली होती. पूर्वी नेहमीं मित्रमंडळींच्या मैफलींत मजा मारणारा काशीनाथ अलीकडे अगदींच एकलकोंडा होत चालला होता. संध्याकाळीं फिरावयास जातांना तर त्याला आतां बरोबर कोणीच नकोसें झालें होतें !

ह्या त्याच्या स्वभावपरिवर्तनाबद्दल त्याच्या मित्रमंडळींत बरीच चर्चा झाली. पण त्याच्या कारणाचा पत्ता प्रथमतः कोणासहि लागेना. अखेरीस चार दिवसांनीं या कोड्याचा उलगडा त्या मित्रमंडळीस झाला आणि त्याच दिवशीं काशीनाथाच्या मनांत घोळणाऱ्या प्रश्नाचेंहि उत्तर मिळालें.

रोज फिरावयास जाण्यास निघण्यापूर्वी रस्त्यावर आल्यावर काशीनाथ आधीं त्या विशिष्ट दाराकडे नजर फेकून तेथें कुलूप लागून ती तरुणी फिरावयास गेली आहे ना, याची मनाशीं खात्री करून घेऊनच मग फिरावयास निघे. आजहि त्याच उद्देशानें त्यानें त्या दाराकडे नजर वळविली असतां

त्याला तेथें एक नवीनच चीज आढळली. त्या घरावर काळ्या पार्श्वभूमीवर पांढऱ्या अक्षरांनीं मजकूर लिहिलेली एक लंबाकृति पाटी लटकत असलेली त्याला दिसली. परीक्षेच्या निकालाची तार उमेदवार ज्या उत्सुकतेनें वाचतो त्या उत्कंठेनें श्वास रोधून काशीनाथानें एका दमांत ती सारी पाटी वाचली—

| |
|---|
| **डॉ. कु. काशीबाई कुलकर्णी,**<br>एल्. सी. पी. एस्.<br>**Dr. Miss Kashibai Kulkarni,**<br>L. C. P. S. |

'अँ' असा उद्गार काढून त्यानें पुन्हा एक वेळ ती पाटी लक्षपूर्वक वाचली. एखादी महत्त्वाची गुप्त गोष्ट कळल्यानें वर्तमानपत्राच्या बातमीदारास होतो तसला आनंद, ती पाटी वाचून काशीनाथास झाला. जणू तो स्वतःशीं समाधानानें म्हणत होता—

"चला, नांव तरी कळलं!..."

आणि करुणेश्वराच्या रस्त्यावर आज जेव्हां त्या उभयतांची भेट झाली, तेव्हां तिच्याकडे पाहतांना काशीनाथास कांहीं एक वेगळाच गूढ आनंद वाटला. एखाद्या कृपणानें पुरून ठेविलेल्या निधीचें ठिकाण समजलेला माणूस त्याच्याकडे ज्या मिस्किल व गूढ भावनेनें पाहतो त्याच भावनेनें काशिनाथानें डॉ. कु. काशीबाई कुलकर्णी यांचेकडे पाहिलें. त्याच्या डोळ्यांत त्या अव्यक्त भावनेचें पाणी चमकत होतें.

काशीनाथाच्या स्वभावपरिवर्तनाचें रहस्यहि याच पाटीमुळें त्याच्या मित्रमंडळीस कळून चुकलें. आणि एकदां रस्त्यांत त्याच्या चार स्नेह्यांनीं त्याला अभावितपणें गाठलें तेव्हां त्याच्या रहस्याची कुंभाराची सून समाजाच्या उकिरड्यावर आली!

एका जानी दोस्तानें काशीनाथाच्या पाठीवर थाप मारून विचारलें,—

"कसं काय वकीलसाहेब, आपण तर अगदीं उंबराचं फूल बनलांत

अलीकडे! क्लबांत आतांशा आपली पायधूळहि झडत नाहीं? इतका आपला वेळ चोरला कुणी? ... ”

काशीनाथानें कांहीं उत्तर देण्याचा प्रयत्न करण्यापूर्वीच त्याचे दुसरे एक दोस्त फिदीफिदी हसत ओरडले—

“अरे कोणी म्हणून काय विचारतोस? त्या नवीनच आलेल्या डाकूनं. होय ना वकीलसाहेब?”

“काय डाकूनं? हा कोण डाकू आला बुवा आपल्या गांवांत?”

तिसरे गृहस्थ आश्चर्यमिश्रित कुतूहलानें विचारते झाले.

“हा नव्हे–ही म्हण!” दुसऱ्या मित्रवर्यांनीं मिस्किलपणानें हसत जाहीर खुलासा केला. “अरे, वकीलसाहेबांच्या पलीकडे ती आली आहे ना डॉ. कु. आय् मीन् डॉक्टर कुमारी काशीबाई कुलकर्णी? तिचीच ही डाकूगिरी......”

प्रचंड हास्याच्या ढगाआड त्या इन्फर्मेशन ब्यूरोच्या डायरेक्टरसाहेबांच्या पुढील खुलाशाची चांदणी पार लुप्त होऊन गेली!

आणि ह्या ढगांतून आतां पडणाऱ्या कुचेष्टेच्या वळवाचा मारा चुकविण्यासाठीं कांहींच न बोलतां तेथून एकदम निघून जाणाऱ्या काशीनाथाला चार शिंतोड्यांचा प्रसाद पदरांत घ्यावाच लागला.—

“आहे ऽऽ बुवा डाकू!......”

मित्रांच्याकडून होणारी टवाळी काशीनाथानें चुकविली खरी, पण त्यांच्या बोलण्यामुळें त्याच्या मनांत उठलेले विचारतरंग तो कसे टाळणार? सूर्याचे प्रत्यक्ष किरण अंगावर घेण्याचें टाळतां येईल; पण त्यानें हवेंत उत्पन्न झालेली उष्णता कशी चुकवितां येणार? कमळाभोंवतीं घिरट्या घालणाऱ्या भुंग्याप्रमाणें त्याचें मन त्याच एका विचारांत गढून गेलें.

“आपले मित्र म्हणतात त्याप्रमाणं खरंच का काशीबाईची ही डाकूगिरी आहे? आपण तिच्या मोहिनींत गुरफटलों आहोंत या आरोपांत कांहीं सत्य आहे काय?”

पुष्कळ विचार करूनहि या प्रश्नाचा नक्की निर्णय करणें काशीनाथास शक्य झालें नाहीं. हा आरोप अजीबात उडवून लावणें त्याला आरंभीं वाटलें होतें

तितकें सोपें नव्हतें एवढें मात्र खास! काशीबाई प्रथम त्याच्या दृष्टीस पडली त्या दिवसापासून— नव्हे त्या वेळेपासूनचा सारा इतिहास त्यानें, एखाद्या चित्राच्या आल्बमप्रमाणें सावकाश आपल्या नजरेसमोरून चाळवला. त्या दिवसापासून आपले मित्र म्हणतात तसा आपल्या वागणुकींत थोडासा फरक झाला आहे हें त्याला आपल्या अंतर्मनाशीं कबूल करावेंच लागलें. पूर्वीपेक्षां आपण पुष्कळच एकांतप्रिय व आत्मनिष्ठ बनलों आहोंत हें त्याचें त्यालाहि स्पष्ट दिसत होतें. पण याचें कारण काशीबाई आहे हें कबूल करण्यास तो तयार नव्हता.

तिचें दर्शन व्हावें म्हणून दक्षिणेच्या खिडकींतून समोरच्या गॅलरींत तो दिवसाकांठीं शंभर वेळ पाहत असे. तिच्या नांवाची जपमाळ तर त्याच्या मनांत एकसारखी ओढली जात होती. तिचा सुकोमल बारीक आवाज कानांवर यावा म्हणून तो आपल्या 'आत्म्याचे कान' करीत होता. तिच्याशीं परिचय होऊन बोलण्याची संधि लाभावी म्हणून तो न चुकतां करुणेश्वराच्या मार्गानें रोज फिरावयास जात होता. या सर्व गोष्टी तो करी—- अगदीं मनापासून करी—-पण देहाचे सर्व चोजले यथास्थित करून घेत असतां त्याची आपणास मुळींच आसक्ति नाहीं असें वरकरणी भासविणाऱ्या एखाद्या आधुनिक वैराग्यशील साधुमहाराजाप्रमाणें आपल्या या सर्व वागणुकीचें आदिकारण तो नाकारीत होता.

त्यामुळें त्याचें मन चोरणारी डाकू म्हणून त्याच्या मित्रमंडळींनीं काशीबाईचा उल्लेख करून तिच्या नांवाच्या पाटींतील दोन आद्याक्षरांवर केलेला श्लेष प्रथमतः त्याला फारसा आवडला नाहीं. पण एकदां घरांत शिरलेल्या घुशीप्रमाणें तो श्लेषात्मक शब्द त्याच्या मनांतून कांहीं केल्या निघेच ना! उलट तो जों जों ती डाकूगिरीची कल्पना दूर करावयास पाही तों तों, वडाच्या झाडाप्रमाणें ती अधिकाधिक खोल व विस्तार पावत गेली. आणि त्याच्या अंतःकरणांत उंचावत जाणाऱ्या या कल्पनेच्या शिखरावर एका प्रसंगानें तर कळसच चढविला!—

त्या दिवशीं नेहमींप्रमाणेंच काशीनाथ करुणेश्वराच्या देवळाच्या रोखानें फिरावयास निघाला होता. काशीबाई अर्थातच तत्पूर्वी आपल्या नेहमींच्या वेळीं बाहेर गेली होती. सभोंवारच्या रम्य सृष्टिसौंदर्याचें कांहींशा उदास दृष्टीनें

अवलोकन करीत काशीनाथ चालला होता. संध्याकाळ झाल्यामुळें घरांकडे पळत वळणाऱ्या गुरांच्या मागून, आपल्या खेडवळ व अशिक्षित पण पृथगात्म कल्पनांच्या हास्यविनोदाचा आनंद लुटीत एक गुराख्याचें तरुण जोडपें मजेंत चाललें होतें. त्याकडे दृष्टि जातांच काशीनाथानें न कळत एक उदास निःश्वास सोडला. आपल्या एकांतिक जीवनाची तीव्रता त्या साध्याभोळ्या पण प्रेमळ हृदयाकडे पाहून त्याला अधिकच कटु व जाचक वाटली. आणि याच एका उदास विचारांत गुरफटला गेल्यानें सभोंवारच्या कसल्याच परिस्थितीची जाणीव न राहतां तो करुणेश्वराच्या देवळाशीं केव्हां येऊन पोंचला तें त्याला कळलेंहि नाहीं.

देवळांत जाऊन त्यानें कांहींशा बालिश भावनेनें दारांतील घंटा वाजविली व शंकराच्या पिंडीस भक्तिपूर्वक नमस्कार केला. उदास विचारांच्या जडत्वामुळें त्याला कांहींसें दमल्यासारखें वाटलें, म्हणून तो तेथेंच बाजूच्या चौथऱ्यावर बसून राहिला. देवालयांतील अंधार गाभाऱ्यांतील समईच्या उजेडानें जास्तच गडद झाला होता. गाभाऱ्यांतील कोंदट हवेंत धुपाचा धूर मिसळला होता. काळ्या कुळकुळीत पाषाणाची लंबाकृति भव्य पिंडी, तीवर ओढलेल्या गंधाच्या पट्ट्यांनीं व वाहिलेल्या फुलांनीं, त्या अंधुक उजेडांत अधिकच उग्र दिसत होती. भोंवतालच्या या उदास वातावरणामुळें निर्जन अरण्यांत समानशील सोबत मिळालेल्या प्रवाशाप्रमाणें काशीनाथाच्या मनांतील उदास विचार अधिकच जोरानें चालूं लागले; व निशाबाजाचें निशेच्या कैफांत भान हरपावें तसेंच त्याचें झालें.

एका भयभीत पण मंजुळ व परिचित आवाजानें काशीनाथास त्याच्या या स्थितींतून जागें केलें. स्वप्नांतून अचानक जागें झालेल्या माणसाप्रमाणें त्यानें बाहेरून इकडे तिकडे पाहिलें. पाण्यांत उगवलेल्या कमळाप्रमाणें त्या देवळांतील अंधारांत त्याला एक आकृति दिसली. त्यानें डोळे ताणून पाहिलें—

हो, शंकाच नको. काशीबाईच ती!......

काशीबाई दृष्टीस पडतांच मित्रमंडळींनीं केलेल्या थट्टेची व डाकू या विमनस्क श्लेषाची त्याला आठवण झाली आणि ही कल्पना मनांत येतांच त्याला कसेंसेंच वाटूं लागलें. तिच्याकडे पाहण्याचें आतां त्याला धैर्य होईना. तो एकदम उठून बाहेर जावयास निघाला.

पण देवळाबाहेर नजर जातांच बाहेर वळवाची जोरदार सर झडत असल्याचें त्याच्या नजरेस आलें आणि त्याबरोबर काशीबाईच्या देवळांतील आगमनाचें व तिच्या भीतियुक्त अवस्थेचें कारण त्याच्या लक्षांत आलें. आतां त्यालाहि बाहेर पडणें शक्य नव्हतें. पाऊस ओसरेपर्यंत त्याला व तिलाहि त्या देवळाच्या आश्रयानें राहणें भागच होतें.

आणि एकाच पिंजऱ्यांत कोंडल्या गेलेल्या दोन पांखरांची मैत्री जमावी तद्वत् त्या दोघांना एकमेकांशीं बोलण्यावांचून आतां गत्यंतर नव्हतें.

प्रथमतः पावसाच्या अचानक—अनपेक्षित आगमनाबद्दल अचंबा व अश्रु-विमोचन झाल्यावर, आगाऊ माहीत असलेलीं एकमेकांचीं नांवें, औपचारिक पद्धत म्हणून, एकमेकांनीं विचारून घेतलीं. नंतर गांवांबद्दल कांहीं गप्पा झाल्या. या बोलण्यांत दोघांनींहि आपापल्या बौद्धिक करामतीची एकमेकांवर छाप टाकण्याचा प्रयत्न केला; व आधींच नांगरून तयार झालेल्या भूमींत पडलेलें बीं चटकन् मूळ धरतें त्याप्रमाणें, आधींच एकमेकांविषयीं मनांत असलेल्या एका विशिष्ट भावनेच्या बीजाचें मूळ या परिचयाच्या उष्णतेनें व संभाषणाच्या जलवृष्टीनें त्यांच्या मनोभूमींत खोल रुजलें गेलें.

इतक्या वेळांत पाऊस थांबला. तेव्हां काशीबाई व काशीनाथ एकदम घरीं जाण्यास निघालीं. बाहेर अंधार पडला होता व पावसाच्या माऱ्यामुळें रस्ताहि खराब व धोक्याचा झाला होता. काशीबाई त्या रस्त्याला अद्याप नवखीच असल्यामुळें चालतांना ती अडखळूं लागली. हें लक्षांत येतांच काशीनाथानें झटकन् आपल्या खिशांतून बॅटरी काढून तिचा प्रकाश रस्त्यावर पाडला. नंतर तीं दोघेंहि त्या विजेच्या प्रकाशांत निमूटपणें मार्ग आक्रमूं लागलीं.

फिरावयास जातांना आज ज्या ठिकाणीं त्याला तें गुराख्याचे जोडपें भेटलें होतें त्या स्थळी येतांच संध्याकाळीं पाहिलेल्या त्या मोहक दृश्याची काशीनाथास आठवण झाली. पण जातांना त्या दृश्यानें त्याला जी उदासीनता आणली होती तिचा मागमूसहि आतां राहिला नव्हता. उलट त्या आठवणीनें आतां त्याच्या मनांत एक निराळीच गोड कल्पना चमकून गेली. आणि ही कल्पना मनांत येतांच त्याची दृष्टि आपोआपच त्याच्या शेजारून चाललेल्या काशीबाईकडे गेली. तिच्या शांत व प्रेमळ मुखचंद्रम्यांत कांहीं और जादू भरून राहिली आहे असें आतां त्याच्या लक्षांत आलें. तिच्या

ठेकेबाज चालीबरोबर चाल ठेवून चालतांना त्याला एक प्रकारची गंमत वाटत होती आणि त्यांत या कल्पनेनें तर त्याचें अंतःकरण कसल्या तरी गूढ भावनेच्या आनंदानें भरून गेलें! त्याला राहून राहून आपल्या दोघांच्या ठिकाणीं त्या गुराखी जोडप्याचें दृश्य दिसत होतें आणि बॅटरीनें काशी-बाईला मार्ग नीट दाखवीत तो चालला असतां काशीनाथाच्या मनांत विचार आला —

आपल्या प्रेमाच्या प्रकाशांत संसाराचा मार्ग न्याहाळीत चालतांना आपणांस काशीबाईच्या सहवासाची सोबत अशीच लाभेल काय?

आणि यानंतर काशीबाईशीं बोलण्याचालण्याचा प्रसंग जेव्हां जेव्हां येई तेव्हां तेव्हां पदांतील ध्रुवपदाप्रमाणें हा प्रश्न काशीनाथाच्या मनांत येत असे तो या एकाच दृष्टीनें. तिच्या हरेक हालचालीचा अर्थ लावूं लागला. त्यामुळें पूर्वी फारशी प्रतीत न झालेली अखंड माधुरी तिच्या प्रत्येक हाल-चालींत, कृतींत, शब्दांत साठून राहिली आहे असें त्यास वाटूं लागलें. आणि वारंवार वापरल्यानें क्षुल्लक वस्तूबद्दलहि वापरणाराचे मनांत प्रेम उत्पन्न होतें तद्वत्, वारंवार या एकाच विचाराभोंवतीं रेंगाळत राहिल्यामुळें त्याला काशी-बाईविषयीं अभिलाषा उत्पन्न झाली.

काशीबाईच्या ओळखीचें असें त्या गांवीं तिच्या एक दूरच्या मावशीखेरीज फारसें कोणी नव्हते व नवीनच दवाखाना उघडल्यामुळें कामहि पण नव्हतेंच. त्यामुळें तिचा व काशीनाथाचा प्रसंगानें झालेला परिचय पुढें अनेक कारणांनीं वाढत गेला व त्याचें रूपांतर दाट स्नेहांत झालें. आठवड्यांतून अनेक वेळ त्यांचा चहा एकत्र होऊं लागला; दुपारचा रिकामा वेळ कॅरमनें खाऊन टाकला; दोघांच्याहि घरीं एकच पोऱ्या कामावर नेमला गेला, फिरावयास जाणेंहि त्यांचें बहुधा एकत्रच होऊं लागलें. क्वचित् दोघेंजण एखाद्या बोलपटाला मिळून जाण्याइतकीहि त्यांची भीड चेपली गेली.

आणि मेलमध्यें बसलेल्या प्रवाशाप्रमाणें त्या उभयतांमधील परकेपणाची भावना इष्टस्थानांतील अंतर झपाट्यानें तोडीत गेली. काल लावलेल्या रोपट्यास आज फुलें आलेलीं दिसावींत, तद्वत् अल्पकाळच्या परिचयानें देखील

त्यांच्यांत अनेक वर्षांचा स्नेह असल्यासारखा घरोबा उत्पन्न झाला. जणूं या दोन पुष्पांत निर्माण झालेल्या एकांतिक आयुष्याचें पुं-केसर एकत्र आणणाऱ्या परिचय-भृंगाचीच काय ती उणीव होती!

ही उणीव दूर होतांच दोन फुलांचा एकजीव झाला.

एकमेकांच्या सुखकर संगतींत त्यांच्या एकांतिक आयुष्याची जाचक जाणीव कमी होत गेली. दोघांच्याहि आयुष्याच्या ग्रंथाचें नवेंच पण मनोहर प्रकरण उघडलें गेलें. आणि त्या प्रकरणांतील जोडीच्या जीवयुग्माच्या माधुरीनें त्यांच्या हृदय-कमलास नवीन प्रफुल्लता आणली. या मोहक सौंदर्यचित्राचा विध्वंस करावा असें त्या दोघांपैकीं कोणासच वाटेना. उलट, या कल्पनामय चित्रांत सत्याचा रंग भरून त्यास सजीवता आणावी असेंच त्यांना मनापासून वाटूं लागलें. आणि म्हणूनच आपल्या काशीनाथ या नांवास सत्यता आणून देण्याबद्दल काशीनाथानें केलेल्या विनंतीस काशीबाईनें खालच्या मानेनें लाजरी मूक संमति दिली!

लेखनकाल— ऑगस्ट, १९३२.

———

# दोन बाळ्यांतील फरक !

दुपारच्या रखरखीत उन्हाचा ताप कमी होऊन संध्याकाळची शीतळ वाऱ्याची झुळुक अंगावरून गेली तेव्हां मी जागा झालों. आळसटलेले डोळे किलकिले करून मनगटावरील घड्याळांत पाहिलें.

चार वाजायला आठदहा मिनिटें कमी होतीं.

एकूण भरपूर तीन तास झोप काढली तर! आतां उठायला कांहीं हरकत नाहीं, असा मनाशीं विचार करून मक्षिकावारणार्थ अंगावर घेतलेलें उपरणें मी बाजूस करूं लागलों, तों गळ्याजवळ उपरण्यावर कांहीं जडसा पदार्थ लागला.

मीं चाचपून पाहिलें.

तो कोवळा लुसलुशीत छोटा हात होता!

रमेश!—

नुसत्या स्पर्शानेंच मला कळून चुकलें, कीं तो हात चिमुरड्या रमेशचाच आहे.

—मला झोप लागल्यावर स्वारी येऊन निजली वाटतें माझ्या मागें आपणहून.

त्याचा तो गोंडस इवलासा हात हातांत घेऊन मी प्रेमानें किंचित् दाबला आणि त्याचें मधुरसें चुंबन घेतलें. आणि नंतर तो हात हलकेच बाजूला करून मी उठून बसलें.

रमेशचा गोड—पण रडून किंचित् म्लान झालेला चेहरा पाहतांच मला दुपारची ती सारी घटना पुन्हा आठवली—

जेवण झाल्यावर रोजच्याप्रमाणें रमेशला घेऊन मी वर आलें. त्याच्याशीं तास अर्धा तास खेळल्याखेरीज मला तर मुळीं चैनच पडत नसे अलीकडे. दिवसाच्या कार्यक्रमांत कांहीं तरी मोठी चूक झाली अशी रुखरुख मनाला लागून राही, एखादा दिवस रमेशबरोबर खेळायला नाहीं मिळालें तर—इतका त्या पोरानें मला आपला लळा लाविला होता.

मोठा लाघवी पोरगा! नव्हता अजून पुरता वर्षाचा सुद्धां झाला. पण खेळकर इतका, कीं त्याला संभाळतां संभाळतां पुरेनाट होई; पण त्यांतहि एक प्रकारचा आनंद होई मनाला. सारा उद्योग सोडून त्याच्या अर्थशून्य ए ऽ ऽ ए ची भाषा ऐकत राहावें, त्याच्या बालिश चाळ्यांचें कौतुक करीत राहावें असें वाटे!

किती करमणूक करी तो माझ्या मनाची आपल्या नाना चाळ्यांनीं! शिस्तीनें जेथल्या तेथें ठेवलेल्या साऱ्या वस्तूंची, रमेश आपल्या चिमुकल्या हातांनीं उलथापालथ करून टाकी. तोंडांत धरून पत्त्यांचीं पानें ओलीं व वेडींवांकडीं करून साऱ्या खोलीभर पसरून टाकी. पादत्राणांच्या संग्रहावर तर त्याचा कटाक्ष विशेषच असे. जिन्याच्या पायऱ्या चढण्याचा प्रयत्न करण्यांत, खुर्ची-कपाटासारखा आधार घेऊन उभें राहण्यांत, किंवा खिडकीच्या गजांतून बाहेर पाहण्यांत त्याला मोठा आनंद होई.

त्याच्या या सुखकर खोड्या वाढतच गेल्या आणि त्याबरोबरच त्याच्या या बाललीलांपासून मला मिळणारा आनंदहि वाढत होता. रमेशनें एखादी खोडी करावी अन् ती सावरून त्याला उचलून कौतुकानें जवळ घ्यावा, कीं लागलीच आपले डोळे मोठ्या मजेनें विस्तारवून व जीभ सपाटून बाहेर काढून, दोन्ही हाताच्या मुठी घट्ट आवळून, रमेश माझ्याकडे पाहून हसे; आणि एकदम

गळ्याला इतक्या जोरानें मिठी मारून बिलगे, कीं माझ्या हृदयांतील वात्सल्याला उधाणच येई !

रमेशच्या या लाडिक लीलांनीं मला इतकें भारून टाकलें होतें, कीं त्याच्याशीं तास दोन तास खेळून, या वात्सल्यानंदाचा उपभोग घेतल्या-खेरीज माझा अलीकडे तर दिवस सुना जाईनासा झाला होता. माझ्या निराश जीवन-सागरांत रमेशनें निर्माण केलेलें हें सुंदर प्रमोद-द्वीप माझें एकुलतें एक सुखस्थान होऊन राहिलें असल्यास नवल कसलें !

रमेशच्या मोहक चेहऱ्यावर नजर फिरवीत असतां हे सारे विचार माझ्या मनांत कांहीं क्षणांच्या अवधींत येऊन गेले आणि या विचारांनीं मनांत उत्पन्न झालेली कृतज्ञतेची भावना व्यक्त करण्यासाठींच जणूं रमेशच्या केसांवरून मी हळुवारपणें हात फिरवूं लागलों !

त्या स्पर्शानें किंचित् दचकल्यासारखें करून, अंगाला झटका देऊन, रमेश डाव्या कुशीवर निजला होता तो उताणा झाला आणि त्याचा सबंध चेहरा माझ्या दृष्टीस पडला.

—आणि रमेशच्या डाव्या गालावरील आसवांच्या वाळलेल्या ओघळांवर नजर जातांच, माझ्या मनांत नुकत्याच उत्पन्न झालेल्या कृतज्ञतेच्या भावनेला एक नाजूक धक्का बसल्याचा मला भास झाला.

माझ्या आनंदाच्या या ठेव्याला अशीं आंसवें गाळविण्याला माझाच क्षुद्र स्वार्थ कारणीभूत झाला नव्हता काय ?—

बिचारा रमेश नेहमींसारखाच आजहि आपल्या आजोबांना आपल्या बालक्रीडेनें आनंदविण्याचा यत्न करीत होता. त्या अर्भकाला काय माहीत, कीं, आजोबांनीं काल सारी रात्र सोंगट्यांच्या खेळापायीं जाग्रण केलें असल्या-मुळें त्यांचे डोळे आतां अगदीं मिटण्याच्या मार्गास लागले आहेत ते ?

तो छोकरा नेहमींसारखा गोड गडबड करूं लागला; पण रोजच्यासारखें तिचें कौतुक करण्याचें टाकून, मीं मात्र आज अंथरूण पसरून झोपण्याची तयारी चालविली होती.

रात्रीच्या जागरणानें माझे डोळे अगदीं तारवटून गेले होते आणि अंथ-रुणाला पाठ लागतांच निद्रा आपलें मायाजाल माझ्यावर पसरण्यास अगदीं सज्ज होती.

अर्थातच रमेशच्या चाळ्यांचें कौतुक करण्यास आज तरी मला अवकाश नव्हता. त्यामुळें त्याच्या हातांतील पत्ते बाजूस फेकून देऊन मीं त्याला अंथरुणावर निजवून थोपटण्यास सुरुवात केली.

पण आजोबाप्रमाणें त्यानें रात्रीं जागरण थोडेंच केलें होतें, कीं निद्रा त्याजवरहि सुप्रसन्न व्हावी !

तो चटकन् मध्येंच अचपळतेनें उठे आणि माझ्याकडे हसऱ्या डोळ्यांची खोडसाळ दृष्टि टाकून कांहीं तरी खेळ खेळूं लागे.

मीं पुनः पुन्हा त्याला धरून आणून अंथरुणावर निजवावें आणि थोपटतां थोपटतां निद्राजडतेमुळे माझा हात किंचितसा ढिला पडल्यासारखें झालें, कीं रमेशनें सुळकन् उठून दंगा माजविण्यास सुरुवात करावी — असा प्रकार चार-पांच वेळ झाला.

आणि पांचव्या खेपेस या प्रकाराची पुनरावृत्ति होतांच मात्र माझ्या सहनशीलतेचा पारा एकदम चढला. रागाच्या आवेगांत त्या चिमुकल्या जीवाच्या पाठींत दोन रट्टे घालून मी ओरडलों,

" नीज, कारट्या, चूप नीज. फाजील... "

माझा तो नरसिंहावतार पाहून बिचारें अर्भक भेदरून गेलें. कांहीं क्षण तर रडण्याचेंहि भान त्याला राहिलें नाहीं. आणि नंतर त्यानें जो टाहो फोडला तो दोन्ही हातांत दोन बिस्किटें कोंबल्यावरच थांबला.

नंतर मात्र रमेशला निजविण्याचा नाद सोडून व त्याच्यापुढें सात-आठ बिस्किटें टाकून मीं जी तणावून दिली ती चार वाजायला दहा मिनिटें उरेपर्यंत ! मध्यंतरीं रमेशनें काय केलें याची दादहि माझ्या गाढ झोपेनें मला लागूं दिली नाहीं.

आणि चार वाजतां मीं जागा झालों तेव्हां रमेशचा चिमणा हात माझ्या गळ्यांत !

दोन्ही हातांना आणि ओठांशीं चिकटलेल्या बिस्किटांच्या चिकट अवशेषावरून खाऊ संपल्यावर स्वारी मुकाट्यानें माझ्या पाठीशीं येऊन निजली असावी असा मीं तर्क बांधला.

रडून पोर कसा शांत निजला होता ! त्याचा चिमणा मुखचंद्र आंसवांच्या

ओघळांनीं किंचित् मलिन झाला होता, तरीहि त्याचा मोहकपणा कायमच होता.

मला काय वाटलें कोण जाणे, मीं आवेगानें त्याच्या गालाचीं चार-पांच चुंबनें घेतलीं. जणूं मीं आपल्या दुपारच्या पापाचें क्षालन या मार्गानें केलें.

माझ्या त्या अत्याचारानें रमेशहि जागा झाला. आणि मला पाहून नेहमीं-प्रमाणें आपले काळेभोर डोळे मोठ्या आनंदानें विस्तारून, जीभ सपाटून बाहेर काढून, दोन्ही हाताच्या मुठी घट्ट आवळून रमेश एकदम माझ्या गळ्याला जोरानें मिठी मारून बिलगला !

तोच त्याचा नाजुक सुखस्पर्श ! तेंच त्याचें निर्व्याज, निरागस प्रेम मला त्या मिठींत पूर्ववत् अनुभवावयास मिळालें !

दुपारची घटना त्या चिमण्या जीवाच्या ध्यानींमनींहि राहिली नाहीं. त्यानें आपल्या नेहमींच्या निरागसभावानें मला मिठी मारली !

पण त्यामुळेंच मला दुपारच्या घटनेचें दुःख तीव्रतेनें जाणवलें. आणि रमेशच्या गौर, फुगीर गालांचें चुंबन घेतांना माझ्या मनांत विचार आला, कीं म्हातारपण हें दुसरें बाल्य म्हणतात; पण पहिल्या व दुसऱ्या बाल्यांत आढळणारा केवढा हा फरक ?

लेखनकाल— मार्च, १९३४.

---

# वेताची खुर्ची !

कचेरींतून येऊन मी घराचा उंबरठा ओलांडतों तोंच ओटीवरच्या प्रवासी सामानाकडे माझी नजर गेली.

ओटीच्या भिंतीशीं लागून कातडी सूट-केस व तीवर होल्ड-ऑलमध्यें गुंडाळलेला प्रवासी बिछाना व्यवस्थितपणें ठेवलेला मला दिसला.

आगामी पावसाची सूचना देणाऱ्या कृष्णमेघांप्रमाणें त्या चिरपरिचित सामानानें कोण पाहुणे आले आहेत याची स्पष्ट कल्पना मला दिली.

कातडी सूट-केसवरच्या—

**K. R.** *alias* **Appasaheb Pandit,** Vakil, Nagar.

या पांढऱ्या अक्षरांवरून नेहमींच्या सवयीप्रमाणें नजर फिरवीत मीं जिन्याच्या पायऱ्या चढण्यास सुरुवात केली.

माझ्या बसावयाच्या खोलींत अप्पासाहेब संथपणें येरझारा घालीत असल्याचें मला आढळून आलें.

"नमस्कार वकीलसाहेब, केव्हां आली स्वारी ? अगदीं Surprise visit देऊन आम्हांला चकित करण्याचा बेत होता वाटतं ?"

माझा नमस्कार हसत हसत स्वीकारून अप्पासाहेब म्हणाले,

"हा आतांच साडेचारच्या गाडीनं आलों. आगाऊ कळवायला हवं होतं खरं शिरस्त्याप्रमाणं, पण बेटं गेलं राहून झालं. अहो, म्हातारपण झालं ना आतां आमचं?"

असें म्हणून अप्पासाहेब मोठ्यानें हसले. मीहि त्यांच्या हसण्यास साथ देत कपडे काढूं लागलों.

कपडे वगैरे काढून झाल्यावर मीं अप्पासाहेबांना म्हटलें,

"साडेचाराच्या गाडीनं आलांत काय? म्हणजे अर्धापाऊण तास झाला तुम्हांला येऊन. मग कचेरींत भगवानाला कां नाहीं पाठवलात? मी नसतों का लागलीच वकीलसाहेबांच्या सेवेला हजर झालों?...बरं, चहा वगैरे तरी दिला कीं नाहीं आमच्या राणीसाहेबांनीं...?"

"त्या करीत होत्या आग्रह चहाचा; पण म्हटलं, तुम्हांला येऊं दे कचेरींतून नि मग एकदमच घेऊं चहा. हो, म्हटलं तुमच्यासाठीं वहिनी करतील तो चहा इतरांच्या चहापेक्षां खासा असणार! तेव्हां त्यांत आपली लावावी वर्णी."

पुन्हा एकदां हास्यवीचि उसळली नि मी चहाफराळाचें सांगण्यासाठीं खालीं गेलों.

थोडक्याच वेळांत पुन्हा वर येऊन मी नेहमींच्या माझ्या खुर्चीवर बसतां बसतां म्हटलें,

"या, असे या आरामखुर्चीवर. बसा ना अप्पासाहेब! असे उभे कां परक्यागत?"

"असूं दे, असूं दे! गाडींतल्या गर्दीत एकसारखा एका जागीं खिळून बसल्यामुळें पाय कसे आंबून गेले आहेत; म्हणून जरा येरझारा काढून मोकळे करतों थोडे."

अप्पासाहेबांनीं येरझाऱ्या चालूच ठेविल्या.

"उद्यां आहे का तारीख तुमची?" संभाषण चालू राहावें म्हणून मीं विचारलें.

"होय. उद्यां बहुतेक खटल्याचा निकाल लागेल असं वाटतं. कंटाळलों बुवा तुमच्या या कोर्टाला! तारखांवर तारखा लागल्या. वरचेवर ये-जा करण्यांतच माझे किती पैसे वेचले गणती नाहीं."

" पण अप्पासाहेब, तुमचा हा खटला असा लांबला याचा मला मात्र मनापासून आनंद वाटतो."

" कां बुवा ?" भ्रुकुटिभंग करून मजकडे पाहत अप्पासाहेबांनीं विचारलें.

" अहो, हा खटला असा रेंगाळत चालला, म्हणून तर तुमच्यासारख्या थोरामोठ्यांचे पाय आमच्या घराला लागण्याचा हा योग आला व तुमच्या वारंवार येण्यानं स्नेहसंबंध जुळला ना ?" असें म्हणून मी मोठ्यानें हसलों.

अप्पासाहेबहि मंदस्मित करीत म्हणाले,

" खरं आहे बुवा तुम्ही म्हणतां ते. भाऊसाहेब तुमचे आमचे 'कॉमन' स्नेही. त्यांनींच तर मला या गांवांत तुमचं घर सुचवलं उतरण्याला नि तुमची माझी ओळखहि करून दिली. या खटल्याच्या कारणानं आपण एकत्र आलों. आणि आतां जरी या गांवांत माझ्या खूपशा ओळखी झाल्या आहेत, तरी मी तुमच्याखेरीज कुठं नाहीं उतरायचा दुसरीकडे."

" वा, ही तर तुमची आमच्यावर मोठीच कृपा म्हटली पाहिजे ! "

इतक्यांत भगवान् चहा-फराळाचा ट्रे घेऊन आला. चहाच्या छोट्या टेबलावर तें सामान मांडून व त्या टेबलाशीं दोन खुर्च्या ठेवून तो निघून गेला.

त्यांपैकीं एका खुर्चीवर बसून मीं अप्पासाहेबांना म्हटलें,

" हं, या अप्पासाहेब, खुर्ची वाट पाहत आहे आपली."

परंतु अप्पासाहेबांनीं त्या लाकडी खुर्चीवर न बसतां पश्चिमेच्या कोपऱ्याकडे एक दृष्टिक्षेप केला मात्र आणि म्हटलें—

" राहूं द्या हो खुर्ची. अद्याप माझे पाय पुरे मोकळे झाले नाहींत." असें म्हणून अप्पासाहेबांनीं उभ्यानेंच फराळाचा समाचार घेण्यास सुरुवात केली.

आतां मात्र मला संशय आला, कीं अप्पासाहेब जाणूनबुजून खुर्चीवर बसण्याचें टाळीत आहेत. पाय आंबल्याची त्यांची सबब केवळ मला सांगण्यापुरतीच आहे. हो, नाहीं तरी सेकंड क्लासनें प्रवास करणारास गर्दीचा त्रास कसला आलाय् ?

हा विचार मनांत येतांच तत्काळ मला अप्पासाहेबांच्या या कृतीच्या बुडाशीं असलेल्या कारणाचा उमज पडला. आणि माझें मलाच आश्चर्य वाटलें.

इतके दिवस ही गोष्ट माझ्या लक्षांत कशी नाहीं आली ?

आपल्या नजरेसमोर रोज दिसणाऱ्या किंवा घडणाऱ्या किती तरी गोष्टींचें महत्त्व एखादा विशिष्ट प्रसंग उद्भवेपर्यंत आपल्या लक्षांत येत नाहीं. आणि तसा प्रसंग येऊन त्या रोज घडणाऱ्या गोष्टीनें आपलें लक्ष एकदां का वेधून घेतलें, कीं आजपर्यंत ही विशिष्ट गोष्ट आपल्या लक्षांत कशी नाहीं आली याचें कोडें आपल्या मनाला पडतें.

माझेंहि आज तसेंच झालें.

खुर्चीवर बसण्याचा दोनतीन वेळ मीं आग्रह केला असतांहि तो मनावर न घेतां, खोलींत येरझारा घालीत फिरणारे अप्पासाहेब पश्चिमेच्या त्या विशिष्ट कोपऱ्याकडे एकसारखे दृष्टिक्षेप करीत होते ही गोष्ट आणि तिचा अर्थ आत्तां माझ्या ध्यानीं आला. एकदोन वेळांनंतर कांहीं तरी विचारण्याचा मनांत आलेला विचार त्यांनीं तसाच दाबून टाकला असावा असाहि संशय आतां मला आला.

आणि कशानें कीं काय, त्यांच्या या कृत्याचा अर्थ एकाएकीं माझ्या ध्यानांत आतां आला.

नेहमींप्रमाणें त्या पश्चिमेच्या कोपऱ्यांत त्यांची आवडती खुर्ची नव्हती. आणि त्यामुळेंच बहुधा स्वारी बसण्याची अशी टंगळमंगळ करीत असावी.

—आणि हा विचार मनांत येतांच दावें सुटलेल्या वासराप्रमाणें माझ्या कल्पनेनें जें उड्डाण केलें, तें थेट वर्ष-सवावर्षापूर्वी अप्पासाहेब प्रथमतःच भाऊसाहेबांच्या ओळखीनें माझ्या घरीं आले तेव्हांचा प्रसंग तिनें माझ्या मानसनेत्रांसमोर उभा केला.

औपचारिक आगत-स्वागत करून अप्पासाहेबांना मीं मोठ्या सन्मानानें माझ्या एकुलत्या एक आरामखुर्चीवर बसवलें व आजच्याप्रमाणेंच त्या दिवशींहि चहा सांगण्यासाठीं म्हणून मी खालीं गेलों आणि परत वर येऊन पाहतों तों, अप्पासाहेब आपले ती आरामखुर्ची सोडून त्या पश्चिमेच्या कोपऱ्यांतील त्या जुनाट व ढिल्या वेताच्या खुर्चीवर जाऊन बसलेले ! मी विचारतांच पश्चिमेचा वारा घेण्यासाठीं येथें बसलों असें ते म्हणाल्याचेंहि मला आठवलें.

आणि त्यानंतर अप्पासाहेब जितक्यांदा माझ्याकडे आले तितक्यांदा बाकीच्या सर्व खुर्च्या सोडून ते त्याच विशिष्ट वेताच्या खुर्चीवर कटाक्षानें बसत हेंहि मला समजून आलें.

मात्र आजचा हा प्रसंग उद्भवेपर्यंत वारंवार घडलेल्या या विशिष्ट घटनेचा भावार्थ माझ्या ध्यानीं आला नव्हता. किंबहुना अप्पासाहेबांची ती कृति मी इतकी स्वाभाविक समजत होतों, कीं तिच्या पाठीशीं कांहीं भावार्थ असूं शकेल अशी शंकाहि मला कधीं आली नाहीं.

पण ज्याची शंकाहि आली नव्हती तेंच नेमकें घडून आलें होतें!

घास घेण्यासाठीं उचललेलें शंकरपाळें तसेंच परत ताटलींत ठेवून मीं भगवानाला हाक मारून म्हटलें,

"भगवान्, ती आपली वेताची खुर्ची वाळली असली तर आण पाहूं. अप्पासाहेब तिच्याखेरीज दुसऱ्या खुर्चीवर बसत नाहींत."

अप्पासाहेबांच्या नजरेवर दृष्टि रोखून मीं मुद्दामच शेवटचें वाक्य उच्चारलें होतें. पाण्यांत खडा टाकून पाहण्याचा तो माझा प्रयत्न होता.

आणि माझ्या कल्पनेबाहेर तो यशस्वी झाला.

माझे ते शब्द ऐकून एखाद्या भयानक स्वप्नानें माणूस दचकून उठावा तद्वत् अप्पासाहेब मोठ्यानें दचकले. क्षण दोन क्षण आपली गोंधळलेली मनोवृत्ति सावरण्याचा प्रयत्न करीत अप्पासाहेब म्हणाले,

"छे, हो, भलतीच तुमची कल्पना! हा पहा मी बसलों दुसऱ्या खुर्चीवर."

अप्पासाहेबांच्या तोंडचे शब्द संपतात न संपतात तोंच भगवानानें ती वेताची खुर्ची आणून ठेवलीसुद्धां आणि दुसऱ्या खुर्चीवर बसण्यास निघालेले अप्पासाहेब नेमके त्या वेताच्या खुर्चीवर जाऊन बसले!

मीं मंद हास्य केलें.

तें पाहून अप्पासाहेबहि हसले!

नंतर थोडा वेळ कोणीच कांहीं बोललें नाहीं; निमूट चहापान चालू होतें. सुपारी-लवंग अप्पासाहेबांच्या पुढें करीत मीं म्हटलें,

"का कसा काय आवडला रंग खुर्चीचा? फार जुनाट खुर्ची होती आणि काळवंडलीहि होती बरीच, म्हणून तिचा दर्शनी भाग तेवढा रंगवून घेतला. आतां कशी काय बरी दिसते का?"

"हो, ठीक दिसते कीं!"

अप्पासाहेबांनीं त्रोटक उत्तर दिलें. हरवलेलें लाडकें कुत्रें सापडल्यावर मालक जसा त्याच्या पाठीवरून हात फिरवीत बसतो, तद्वत् अप्पासाहेब त्या

खुर्चीच्या रंगविलेल्या हातांवरून हळुवारपणें हात फिरवीत होते. एखाद्या चिरपरिचित जिव्हाळ्याच्या मित्राशीं मूकपणें गुजगोष्टी कराव्यात त्यासारखी अप्पासाहेबांची कृति मला भासत होती. वेताची खुर्ची बसावयास मिळाली याचा त्यांना झालेला आनंद त्यांच्या चेहऱ्यावर प्रतिबिंबित झाल्यावांचून राहिला नाहीं.

" अप्पासाहेब— "

त्यांच्या त्या गोड तंद्रींतून जागें करण्यासाठीं मीं हळूच त्यांना हाक मारली. त्यांनीं चमकून माझ्याकडे पाहिलें आणि ओशाळल्या स्वरांत विचारलें,

" मला हाक मारलीत तुम्हीं ? "

" हो. एक प्रश्न विचारावासा वाटतो..."

" समजला तुमचा प्रश्न." अप्पासाहेब गंभीरपणें म्हणाले, " माझ्या या कृतीचं तुम्हांला नवल वाटणं साहजिकच आहे. एवढीशी जुनाट वेताची खुर्ची ती काय; अन् तिच्यासाठीं मी असा हपापल्यासारखा करतो तो काय; असंच तुम्हांला वाटत असेल! पण माझ्या या मनोवृत्तीचं कारण समजलं तुम्हांला, तर तुम्ही सध्यांपेक्षांहि जास्त चकित व्हाल."

" तें काय बुवा कारण ? "

" अहो मामा, ही खुर्ची माझी आहे म्हणून तिच्याविषयीं मला इतका आपलेपणा वाटतो."

" काय–म्हणतां काय अप्पासाहेब! ही खुर्ची तुमची ? अहो, भाऊसाहेबांच्या घरीं पडून राहिलेली ही जुनाट खुर्ची त्यांच्याकडून मागून आणली...."

पण मला मधेंच थांबवून अप्पासाहेब म्हणाले,

" पण ही खुर्ची माझी आहे हें भाऊसाहेबांनासुद्धां ठाऊक नाहीं, तर ते तरी तुम्हांला काय सांगणार ? ही खुर्ची मी भाऊसाहेबांच्या पत्नीला कांहीं कारणामुळं दिली होती. पुढं ती त्यांच्याकडेच राहिली बरेच दिवस. वहिनी वारल्यावर भाऊसाहेबांनीं ती तुम्हांला दिली."

" अस्सं ? एकूण ही तुमची खुर्ची म्हणून तिच्यावर तुमचं इतकं प्रेम ? "

" खरं सांगायचं तर ही खुर्ची मूळची माझी नाहीं."

" आज तुम्ही अगदीं एखाद्या कथालेखकासारखाच प्रकार मांडलाय् अप्पासाहेब! नवलाईचे झटक्यावर झटके देत आहांत तुम्ही मला आज!"

" मामा, अगदीं अंतरंगांतली गोष्ट सांगायची म्हणजे या वेताच्या खुर्चीची ती एक नवलकथाच होईल." अप्पासाहेब गंभीरपणें म्हणाले. कसल्या तरी गतस्मृतींनीं त्यांचें अंतःकरण भारावल्यामुळें त्यांच्या आवाजांत किंचित् आर्द्रता आली आहे असें मला वाटलें.

" तुमची हरकत नसेल तर ती नवलकथा..."

पुन्हा मला मधेंच थांबवून अप्पासाहेब म्हणाले,

" सांगतों, तुम्हीं विचारलं नसतं तरी या खुर्चीची हकीकत मीं आज तुम्हांला सांगणार होतों. कारण आजची माझी या गांवीं येण्याची बहुधा शेवटचीच खेप होईल. तेव्हां या खुर्चीची मी तुमच्याकडे मागणी करणार होतों. कारण ही खुर्ची मला अत्यंत जिव्हाळ्याची वाटते.

" अगदीं प्रथम मी तुमच्या घरीं आलों तेव्हां तुमच्या सुसज्जित दिवाणखान्याची व्यवस्था पाहत असतां, एकदम माझी नजर या वेताच्या खुर्चीवर खिळून राहिली. एखाद्या कृपणाचा हरवलेला ठेवा त्याला परत सापडावा तसं मला झालं. मला मोह आवरेना. मी मागचा-पुढचा कांहींहि विचार न करतां चटकन् त्या खुर्चीवर जाऊन बसलों.

" श्रान्त माथा मातेच्या मांडीवर टेकल्यानं मिळतो तसा विसांवा त्या क्षणीं माझ्या मनाला वाटला. अगदीं प्रेमाच्या माणसाच्या बाहुपाशांत आपण गुरफटून गेलों आहोंत असं मला वाटलं.

" आणि माझी ही भावना कांहीं केवळ काल्पनिक नव्हती. या खुर्चीकडे पाहिलं, कीं मला रावसाहेबांची आठवण होते. त्यांची ही अत्यंत आवडती खुर्ची. ते नेहमीं याच खुर्चीवर बसत असत आणि त्यामुळंच त्यांच्या सतत सान्निध्याचं सौभाग्य लाभलेली ही खुर्ची मला रावसाहेबांइतकीच प्रिय वाटते."

क्षणभर थांबून अप्पासाहेबांनीं त्या खुर्चीच्या हातावरून अगदीं हळुवारपणें प्रेमानें हात फिरविला.

" तुम्हांला माहीत नसेल कदाचित् रावसाहेब कोण तें. रावसाहेब हे माझे मावसबंधु. आमचा दोघांचाहि जन्म एकाच दिवशीं, एकाच घरीं— आजोळीं झाला. जणूं आम्हीं दोघांनींहि हातांत हात घालून एकमेकांच्या सोबतीनंच

या परक्या जगांत प्रवेश केला आणि ही आमची सोबतीची भावना आमच्या वाढत्या वयाबरोबर वाढत गेली. लहानपणापासून आमचे दोघांचे स्वभाववांत, आचार-विचार, आवड-निवड यांमधें इतकं विलक्षण साम्य होतं, कीं आम्हां दोघांमधें कांहीं तरी अज्ञात सांखळी जुळलेली असावी असं सर्वांस वाटे. एकाला कांटा बोचला तर दुसऱ्याला कळ येई; एकाचं जेवण झालं कीं दुसऱ्याचंहि पोट भरावं, असा आम्हां दोघांमधला प्रेमसंबंध होता. आणि सुदैवानं आमचा एकत्र सहवासहि पण फार दिवस झाला. शिक्षणहि दोघांचं एकत्र, एकदम व एकच झालं. अशा कारणांनीं आमच्या स्वभावांतला सारखेपणा इतका वाढला, कीं आम्ही क्वचित् केव्हां दूर राहिलों तरी एकमेकांस विसंबत नव्हतों. मी एखादा जिन्नस स्वतःसाठीं खरेदी केला, कीं त्याची 'डुप्लिकेट कॉपी' रावसाहेबासाठीं मी हटकून घेई. उलट तिकडे रावसाहेबानं एखादं कापड खरेदी करून त्याचा नव्या फॅशनचा कोट शिवला, कीं त्याचाच जोडीदार बंधु माझ्याकडे रवाना व्हायला केव्हांच चुकला नाहीं.

"अशा प्रकारें 'कुड्या दोन पण आत्मा एक' या म्हणीचा सुखद अनुभव घेत आम्हीं किती तरी दिवस एकत्र काढले. आमचं शिक्षण एकत्र झालं, लग्नंहि एकदमच झालीं. पण पुढं उद्योगधंद्यानिमित्तानं आम्हांला दूर राहावं लागलं. मीं वकिलींत प्रवेश केला, आणि रावसाहेबानं सोप फॅक्टरी काढली. पण दोघांमधें गांवांचं अंतर उभं राहिलं तरी दोघांच्या प्रेमांत मात्र खंड पडला नाहीं. एकमेकांना मदत देण्याला आणि एकमेकांची मदत घेण्याला आम्हांला केव्हांहि संकोच वाटला नाहीं. इतकंच नव्हे तर आम्ही एकमेकांकडे हवी ती मदत अथवा जिन्नस हक्कानं मागत असूं. आणि अशी मदत देण्याघेण्याबद्दल, एकमेकांकडे सुटीच्या दिवसांत राहायला येण्याबद्दल आमचे नेहमीं प्रेमकलहहि होत असत. आणि अशा कलहाच्या 'फिनिशिंग् टचीस्'नीं आमच्या प्रेमाच्या चित्राला अधिकच सौंदर्य प्राप्त होत होतं.

"पण या सुखाचा आस्वाद चिरकाल घेण्याचं सुदैव माझ्या फुटक्या कपाळीं दैवानं लिहिलेलं नव्हतं. आणि सहा-सात वर्षांपूर्वी रावसाहेबांच्या मृत्यूनं इहलोकांतील माझं जीवन, चरकांतून रस पिळून निघालेल्या वाळक्या चिपाडाप्रमाणं शुष्क करून टाकलं.

" मरेपर्यंत हरएक बाबींत माझा पाठपुरावा करण्याचं आपलं बालपणापासूनचं व्रत रावसाहेबांनीं निष्ठेनं पाळलं. इतकं कीं, सहा-सात वर्षांपूर्वी मी एकदां टायफॉइडनं आजारी पडलों तों रावसाहेबहि त्याच सुमारास त्याच रोगानं आजारी पडले ! त्या आजारांतच शेवटीं त्यांचा शेवट झाला— आणि मी दुर्भागी मात्र स्वर्गाच्या अर्ध्या वाटेपर्यंत त्यांना सोबत करून परत फिरलों !"

एवढें बोलून अप्पासाहेबांनीं एक आंवढा गिळला. त्यांचे नेत्र पाणावले होते आणि आवाजांत एकप्रकारचा सूक्ष्म कंप उत्पन्न झाला होता.

" माझ्या आजारामुळं," अप्पासाहेब पुढें सांगूं लागले, " रावसाहेबांची शेवटची भेट मला अंतरली. माझा आजार वाढेल या भयानं मी चांगला बरा होईपर्यंत रावसाहेबांच्या मृत्यूची वार्ताहि मला कुणी कळविली नाहीं आणि जेव्हां ती दुःखद वार्ता मला कळली तेव्हां रावसाहेबांची भेट घेणं कोणत्याहि मानवी प्रयत्नाच्या बाहेरचं काम होतं ! त्यांच्या अंत्यदर्शनास मी मुकलों याचं मला किती दुःख झालं असेल, याची मामा, तुम्हीच कल्पना करा."

पुन्हा कांहीं क्षण अप्पासाहेब स्तब्ध राहिले. जणूं त्या दुःखद गतस्मृतीचा आलेला कढ ते आंतल्या आंत दाबून टाकण्याचा प्रयत्न करीत होते !

" मी चांगला बरा झाल्यावर रावसाहेबांच्या घरीं समाचारासाठीं गेलों आणि तिथून येतांना त्यांची अत्यंत आवडती अशी वेताची खुर्ची त्यांची स्मृति म्हणून मीं आणली. रावसाहेबांची नेहमींची बसण्याची ही खुर्ची होती. खुर्ची ही अशी वस्तु आहे, कीं जी माणसाच्या फोटोग्राफप्रमाणं एकसारखी आपल्या नजरेसमोर दिवाणखान्यांत ठेवतां येते. या खुर्चीत बसलों, कीं मला रावसाहेबांच्या सहवासांतच आपण बसलों आहोंत असा भास होतो ! वाटलं तर माझी ही कल्पना खुळी म्हणा, पण मला मात्र त्या कल्पनेपासून राव-साहेबांच्या सहवासाचं आभासात्मक का होईना—पण सुख भोगतां येतं.

" रावसाहेबांच्या पत्नीलाहि ही खुर्ची पतीच्या आवडीची वस्तु म्हणून हवी होती. त्यामुळं त्यांचा माझ्यामागें लकडा सुरू झाला. तेव्हां त्यांची ती मागणी टाळण्यासाठीं मीं ही खुर्ची भाऊसाहेबांच्या घरीं दिली. तिचा इतिहास मीं त्यांच्या घरीं कुणालाच सांगितला नाहीं. कारण खुर्ची परत नेतांना तो सांगण्याचा माझा विचार होता.

" पण भाऊसाहेबांच्या पत्नीचा आजार व मृत्यु या लवकरच घडून आलेल्या पुढच्या घटनांमुळं ही खुर्ची परत मागण्याचं लांबणीवर पडत गेलं व पुढं तर ही खुर्ची भाऊसाहेबांनीं कुणाला दिली, काय केली, मला कांहींच कळेना.

" पुढं तिचं पुनर्दर्शन बऱ्याच वर्षांनीं मला तुमच्या घरीं झालं आणि तिच्या पुनर्दर्शनानं माझ्या हृदयांतील रावसाहेबांविषयींचं प्रेम जोरानं उचंबळून आलं; पण माझा न् तुमचा तेव्हां नवाच परिचय झालेला असल्यानं मला ह्या खुर्चीचं रहस्य सांगणं शक्य नव्हतं. आज मात्र मीं होऊन ही खुर्ची तुमच्याजवळ मागण्याचं ठरवलं होतं. कारण, उद्यां या चालू खटल्याचा निकाल लागला, कीं पुन्हा या गांवीं येण्याचा योग येईल न येईल कोणी सांगावं!

" मग काय मामा, द्याल ही वेताची खुर्ची मला तुम्ही ? "

अप्पासाहेबांनीं इतक्या काकुळतीनें हा प्रश्न मला विचारला, कीं त्यांच्या डोळ्यांतील याचनेचा तो करुणभाव आणि आवाजांतील स्निग्ध आर्द्रता पाहून मला कसेंसेंच वाटलें. एवढा नामवंत व धनवंत वकील एका वेताच्या खुर्चीसाठीं माझ्यासारख्या सामान्य माणसाची इतक्या दीनपणानें विनवणी करतो आहे ही विधिघटना मला चमत्कृतिपूर्ण वाटली.

मीं ताबडतोब म्हटलें,

" वाः अप्पासाहेब! तुमचीच आहे खुर्ची ती. अगदीं खुशाल न्या नगराला."

अप्पासाहेबांनीं कृतज्ञतेच्या नजरेनें एकदां माझ्याकडे पाहिलें आणि खुर्चीवर मागें रेलून तिचे दोन्ही हात आपल्या हातांनीं घट्ट दाबून धरले! त्यांच्या डोळ्यांच्या पापण्या पाण्यानें किंचित् भारावल्या होत्या; पण चेहऱ्यावर मात्र पूर्ण समाधान व आनंद यांच्या मिश्र छटा नीट न्याहाळणारास सहज दिसल्या असत्या.

लेखनकाल— नोव्हेंबर, १९२३.

---

# अंधारांतील दीप्ति

पाय घसरून पडल्यावर खालच्या निसरड्याची जाणीव व्हावी आणि नंतर 'अरेरे, आपण खालीं पाहायला हवं होतं!' अशी रुखरुख मनाला लागून राहावी तद्वत् ती गोष्ट घडून आल्यावर मला वस्तुस्थितीची जाणीव झाली; नि मग मात्र माझ्या मनाला एकच हुरहुर लागून राहिली, कीं—

'सुमतीला झाल्या गोष्टीबद्दल काय वाटत असेल?'

माझ्या साऱ्या तर्कवितर्कशक्तींना त्या साऱ्या रात्रभर शिणवूनहि मला या प्रश्नाचें समाधानकारक उत्तर मिळालें नाहीं. मानसिक त्रास खूपच सहन करावा लागला.

म्हटलें तर घडून आलेली घटना किती क्षुल्लक होती! माझ्या जागीं दुसरा एखादा असता, तर त्यानें झालेल्या गोष्टीकडे लक्षहि दिलें नसतें. पण मला ही विचार करायची सवय लागली आहे ना? तीमुळें मी अनेकदां स्वतःला मानसिक त्रास मात्र करून घेतों.

आजचा हा प्रसंगहि त्यापैकींच होता.

अवघ्या एक-दोन क्षणांचा खेळ झाला खरा; पण मला त्याचा मानसिक जाच मात्र खूपच वेळ सोसावा लागला.

मी 'अंधारांतील दीप्ति' हें सुनीत रचण्यांत अगदीं गर्क झालों होतों. डाव्या हाताच्या खिडकींतून समोरचा पश्चिम क्षितिजावरचा मनोरम देखावा दिसत होता. क्षितिजाच्या खिडकीला लावलेला गुलाबी पडदा, किंचित् दूर सारून संध्यादेवी मावळत्या सूर्याचें शेवटचें दर्शन घेत होती. तिच्या विरह-दुःखाबरोबर अंधार वाढत होता आणि त्या वाढत्या अंधारांत सूर्यकिरणांचीं मावळती प्रभा तिला विशेषच आकर्षक भासत होती.

या मोहक, मधुर निसर्गदृश्यानें माझी प्रतिभा जागृत केली होती. कल्पने-मागून कल्पना सुचून काव्यपंक्ति झराझरा लिहून होत होत्या. त्या तंद्रींत मला आजूबाजूचें कांहींच भान राहिलें नव्हतें. जणूं तेवढ्या वेळापुरता मीं माझ्याव्यतिरिक्त इतर सर्व सृष्टीचें अस्तित्व विसरून गेलों होतों.

मनाजोगतें काव्य लिहून होत असलें म्हणजे पोटांत समाधानाचा जो उमाळा येतो त्याचा आनंद कांहीं वेगळाच आहे. त्या आनंदाच्या भरांत माणूस स्वतःच्या काव्यसृष्टीखेरीज इतर सारें कांहीं विसरून जातो. कलात्मक आनंदाची नशा त्याला चढून त्याची जणूं सविकल्प समाधिच लागते.

निदान माझी तरी त्या दिवशीं तशीच अवस्था झाली होती. त्या उन्मनस्क स्थितींत खोलींत वाढणाऱ्या अंधाराची मला जाणीवहि झाली नाहीं.

अखेर सुनीत पूर्ण झालें तेव्हां कोठें खोलींत पसरलेल्या अंधाराची मला जाणीव झाली. नुकत्याच पूर्ण केलेल्या सुनीतांतील शेवटची

**" दाराआड उभी बघून तुजला आलिंगण्या धावलों "**

ही ओळ किंचित् मोठ्यानें गुणगुणत मी दिवा आणण्यासाठीं म्हणून माडीवरून खालीं यावयास निघालों. खोलीच्या दरवाजाचें एक दार उघडें होतें. त्यांतून मी गडबडीनें बाहेर पडत असतां दुसऱ्या लावलेल्या दाराआड उभ्या असलेल्या कोणा तरी व्यक्तीला माझा धक्का लागला. माझीं पाउलें एकदम थबकलीं नि ओठांवरील काव्यपंक्तिहि तेथेंच जिरली.

किंचित् मागें वळून मीं म्हटलें,

" कोण तें ?... तुम्ही होय. प्लीज एक्स्क्यूज हं ! माझं लक्ष नव्हतं..."

ती व्यक्ति कांहींच न बोलतां तेथून पलीकडच्या दालनांत निघून गेली.

—आणि दिवा आणण्यासाठीं निघालेला मी तसाच परत खोलींत येऊन अंधारांत कॉटवर पडून स्वतःशींच विचार करूं लागलों—

—झाल्या प्रकाराबद्दल सुमतीला काय वाटलं असेल बरं?

तिनें माझ्या औपचारिक क्षमायाचनेला कांहींच उत्तर दिलें नव्हतें. याचा अर्थ मीं काय समजावा? ती लाजली कीं रागावली?

दोन्ही प्रकार संभवनीय होते.

सुमतीला आमच्या घरीं आल्याला अजून एक आठवडाहि झाला नव्हता. आमच्या गांवांतल्या दोन-तीन 'स्थळां'पैकीं एखादी शिकार गाठण्यासाठीं सुमतीचे वडील तिला घेऊन आमच्या वडिलांच्या ओळखीने आमच्या घरीं मुक्कामास आले होते. कॉलेजला सुटी असल्यामुळें मीहि त्या सुमारास घरींच होतों.

अर्थातच्च कॉलेजकुमाराला तरुण, सुंदर, अविवाहित मुलीविषयीं वाटणारी उत्सुकता माझ्याहि हृदयांत उत्पन्न झाली. एखाद्या गुप्त पोलिसाप्रमाणें सुमतीच्या दरेक बारीकसारीकसुद्धां हालचालीवर मीं सूक्ष्म नजर ठेविली; आणि तिच्या एकंदर 'कॅरेक्टरिस्टिक्स्'चा सूक्ष्म 'स्टडी' चालविला. जणूं बी. ए.ला माझा ऐच्छिक विषय 'सुमति' हाच होता!

मनांत खूप खूप इच्छा असूनहि सुमतीशीं बोलण्याचा मोका मला साधतां येईना.

ओळख होऊनहि बिनओळखीच्या परक्यागत वागण्याचा प्रसंग आपल्या समाजरचनेंतील स्त्रीपुरुषमैत्रीच्या निषेधनिर्बंधांमुळें येतो तो असा! तरुण मनाला असल्या विचित्र वागणुकीचा किती त्रास होतो तें एक अनुभवीच जाणे!

मला तर याचा फारच ताप झाला. सुमतीसारख्या गोड तरुणीबरोबर बोलण्याची मनांत जबर इच्छा होई. तिचे ते काळेभोर टपोरे डोळे जणूं मला प्रत्येक दृष्टिक्षेपाबरोबर आवाहनच करीत आहेत असें वाटे. पण प्रत्येक खेपेस या साऱ्या इच्छा मला महाप्रयासानें आंतल्या आंत दाबून टाकाव्या लागत. मनाला कांचणी मात्र तीव्रतेनें सहन करावी लागे.

त्यामुळें सुमतीशीं बोलण्याचा जो हा पहिलाच प्रसंग मला आला, त्याचा चमत्कारिकपणा मला अधिकच खेदकारक वाटला. विशेषतः माझ्या तोंडांतील

पद्यपंक्तीनें झालेल्या प्रकाराला विकृत अर्थ चिकटला जाण्याचा संभव होता सुमतीचें मत माझ्याविषयीं वाईट व्हावें ही भावना मला उदास करीत होती.

आणि सुमति कांहींच न बोलतां एकदम पलीकडे निघून गेली यामुळें तर माझा ओशाळेपणा द्विगुणितच झाला. माझ्या तोंडांतील ती पद्यपंक्ति, आनंदानें किंचित् पळत गेल्यासारखी भासणारी माझी गत, आणि दाराआड उभ्या असलेल्या सुमतीला झालेला माझ्या हाताचा स्पर्श या साऱ्या प्रकारानें माझ्याविषयीं तिची भलतीच समजूत होण्याचा संभव होता. आणि तसा तो झाला असल्यास माझ्या क्षमायाचनेचा स्वीकार न करतां ती रागावून गेली असल्यास नवल नाहीं!

—कीं माझ्याशीं बोलण्याचा प्रसंग आणि तोहि असा चमत्कारिक असल्या-मुळें ती लाजली असावी!

सुमति रागावली, कीं लाजली याचा नक्की निर्णय मला होईच ना.

तर्कवितर्कांच्या प्रवाहांत विचारनौका खूप वल्हवून पाहिली, पण निर्णयाचें पैलतीर कांहीं गवसलें नाहीं.

ती लाजली असेल ही कल्पना मला हृदयंगम वाटत होती. कारण त्यामुळें सूचित होणारी सुमतीची माझ्याविषयींची भावना कोणाहि तरुणाला आवडण्यासारखी हृद्य होती. आणि म्हणूनच ती लाजलेली असावी ही कल्पना मला सुखद वाटत होती.

या कल्पनेचा विचार करूं लागलों, कीं त्या वेळीं तेथें माजलेल्या अंधाराचा मला मनस्वी राग येई. कारण त्यामुळें मला सुमतीचा त्या वेळीं झालेला चेहरा पाहतां आला नाहीं. नाहीं तर ती लाजली, कीं रागावली या कोड्याचें उत्तर मला तेथेंच मिळालें असतें.

सुमतीसारख्या सुंदर कुमारिकेचें मत माझ्याविषयीं निष्कारण वाईट व्हावें ही भीति मला छळीत होती. वास्तविक पाहिलें तर, सुमतीशीं कांहीं माझें लग्न ठरलें नव्हतें, कीं तिच्या माझ्याबद्दलच्या बऱ्यावाईट होणाऱ्या मताचा मीं इतका मुलाहिजा बाळगावा. जिच्याशीं मी आजपर्यंत एक अक्षरहि समक्ष बोललों नाहीं, तिच्या मनोभावनेबद्दल मला इतकी आस्था कां वाटावी असाहि एक विचार माझ्या मनांत मधूनच येई. पण वातचक्रांत सापडलेल्या शुष्क पर्णाप्रमाणें तो तात्काळ दूर उडून जाई.

यौवनाच्या प्रणयप्रधान साम्राज्यांत नुकतेंच पाऊल टाकणारा मी तरुण होतों. आणि या साम्राज्याच्या अधिष्ठात्री देवता ज्या सुंदर कुमारिका, त्यांपैकीं सुमतीसारख्या एका भावमुग्धेचें मत मजविषयीं विकृत बनावें ही कल्पनाहिं माझ्या तरुण मनाला सहन होत नव्हती. स्त्रीच्या सहवासांत असतांना आपल्या स्वभावांतील बारीकहि दोष तिच्या नजरेस पडूं नये असें जें प्रत्येक पुरुषास वाटतें त्या मधुर भावनेचा पगडा या वेळीं माझ्या मनावर होता यांत नवल कसलें?

म्हणून सुमतीला काय वाटलें असेल हा प्रश्न मला फार महत्त्वाचा वाटत होता. पण त्याचें उत्तर मला कोण देणार होतें?

मनाच्या या विचित्र परिस्थितीमुळें खालीं जाऊन सुमतीच्या पुन्हा नजरेस पडावयाचें मला कसेंसेंच वाटूं लागलें. मी त्या रात्रीं न जेवतांच अंथरुणावर पडून तळमळत राहिलों. खोलींत दिवाहि पण लावला नाहीं. 'डोकें दुखणें' या विकाराची माणसाला किती गरज आहे हें आज माझ्या अनुभवास आलें.

टेबलावरील घड्याळाच्या गजरानें मी दुसरे दिवशीं जागा झालों, तेव्हां चक्क उजाडलें होतें. विचार करून करून शिणल्यावर पहाटेस केव्हां झोप आली देव जाणे! पण उठून गजर बंद करावा म्हणून पाहिलें, तों टेबलाजवळ खुद्द सुमतीच उभी! तिनेंच गजर केला होता.

मला काय वाटलें सांगतां येत नाहीं. पांघरुणांत तोंड लपवून पुन्हा निजावें असें एकवार वाटलें; पण तो वेडेपणाच झाला असता. मी खालीं मान घालून निमूट बसलों.

कांहीं वेळानें किंचित् चाचरत सुमतीच म्हणाली,

"तुम्हांला बाबांनीं बोलावलंय् खालीं, येतां?"

"हं."

थोडा वेळ स्तब्धता.

"चहासाठीं वाट पाहत आहेत सारींजणं. म्हणून गजर लावून उठवलं. काल झोप नाहीं आली चांगली?"

"हो, थोडं डोकं दुखत होतं." मीं कसेंबसें उत्तर दिलें.

"फार त्रास झाला वाटतं?" किंचित् हसत सुमति म्हणाली, "एकूण कालची कविता महाग पडली म्हणायची!"

मीं चमकून तिच्याकडे पाहिलें. चटकन् लाजून तिनें खालीं मान घातली. तिच्या गालावरील नाजुक हास्य कित्ती अर्थपूर्ण होतें!

त्या हास्यानें माझ्या मनांतील आशंकेचा अंधार नाहींसा होऊन तेथें एक नवीन स्निग्ध दीप्ति तेवूं लागली.

लेखनकाल—जून, १९३४.

# पहिलें प्रेम

दार उघडून खोलींत पाऊल टाकतांच कोपऱ्यांत पडलेलें पोस्टाचें पाकीट पाहून मोठ्या उत्सुकतेनेंच मी तें चटकन् उचलून घेतलें व त्यावरील पोस्टाचा शिक्का पाहिला. गांवाचें नांव पाहतांच मला शिरावरील केवढा तरी मोठा बोजा उतरल्यासारखें हलकें हलकें वाटलें एकदम.

गेले आठदहा दिवस मीं मनाच्या मोठ्या विचित्र परिस्थितींत काढले होते. मनाची घालमेल अगदीं असह्य होई व निराशेच्या यातना जीवाची तळमळ करून सोडीत. एकेक दिवस मला एकेका वर्षासारखा लांब व तापदायक वाटे; आणि दिवसामागून दिवस लोटत चालले, तरी मीं पाठविलेल्या एका साध्या पत्राचें उत्तर पाठविण्याची फिकीर माझ्या गांववाल्या मित्रांपैकीं कोणीहि करीत नव्हता!

माझ्या जीवाच्या यातनांची त्यांना कांहींच कल्पना नसेल का? का कल्पना येऊनहि ते ही बेपर्वा वृत्ति मुद्दाम धारण करीत आहेत? माझ्यासारख्या अधःपतित माणसाशीं पत्रव्यवहारानें देखील संबंध ठेवणें त्यांना कमीपणाचें वाटत असेल का?

अशा शेंकडों शंकाकुशंकांचें रसरशीत निखारे या आठ-दहा दिवसांत माझ्या मनाला एकसारखे चटके देत होते. त्यांतच तुळशीच्या विरहाची भर पडून माझी तळमळ क्षणोक्षणीं वाढत होती.

हजारदां मनांत आलें, कीं उठावें नि जावें तडक गांवीं निघून; आणि प्रत्यक्षच तुळशीचा समाचार घ्यावा. पण...पण—मनांत कितीहि आलें, तरी मला परत माझ्या गांवीं जाण्याला तोंडच कुठें होतें ? तसें असतें तर मीं प्रथमच तुळशीला एकटी कशाला जाऊं दिली असती ? आणि मग आजची दाहक परिस्थितीहि माझ्या भोगवटयाला आली नसती.

माझ्या गांवीं जाणें मला शक्य नव्हतें म्हणून तर हा सारा खटाटोप! मन राहीना. दिलेली मुदत टळून गेली, तरी तुळशी परत आली नाहीं तेव्हां मला अस्वस्थता वाटूं लागली. तिला पाठविलेल्या पत्रांचें उत्तरहि येईनासें झालें तेव्हां मनाला भलत्या शंकांच्या काचण्या त्रास देऊं लागल्या.

तात्यांनीं तिचें तिकडे कांहीं बरेंवाईट तर केलें नसेल ना ? या विचारानें मला राहून राहून बेचैन करून सोडलें होतें. तात्या असें कांहीं करणार नाहींत असें एकदां वाटे. पण फिरून मनांत येई, त्याचा काय नेम ! मला नादीं लावून तिनेंच कुलांगार केला व आपल्या तोंडाला काळें फासलें अशी त्यांची समजूत असल्यामुळें ते आपला राग तुळशीवर काढणें अगदींच अशक्य नव्हतें.

शंका-कुशंकांच्या या चक्रव्यूहांतून बाहेर पडण्याचा एकच मार्ग म्हणून, मीं गांवांतल्या माझ्या जुन्या दोन-चार जवळच्या मित्रांना पत्रें पाठवून तुळशीची तिकडची बातमी कळविण्याबद्दल काकुळतीला येऊन विनंति केली होती.

केवढया उत्सुकतेनें मी उलट टपालीं उत्तराची वाट पाहत होतों. पण उलट टपालीं तर राहोच, तब्बल एक आठवडा लोटला तरी एकाहि पत्राचें उत्तर येईना ! साऱ्यांनींच जणूं माझ्याविरुद्ध कट केला होता.

हे आठदहा दिवस माझी जी अवस्था झाली तिचें वर्णन करणें मला तरी शक्य नाहीं. रोजच्या सवयीमुळें व्हावयाचे देहधर्म होत राहिले, त्यापलीकडे माझ्यांत जिवंतपणाचें कांहीं लक्षणच उरलें नव्हतें म्हटलें तरी चालेल. अतिरिक्त मानसिक तापामुळें वेडावल्यासारखी माझी अवस्था:झाली होती.

म्हणूनच आज हातीं आलेलें गांवचें पत्र पाहून मला एकदम इतका आनंद झाला, कीं क्षणभर तुळशी भेटल्याचाच भास झाला मला !

मीं अत्यंत उत्सुकतेनें तें पत्र टर्‌कन लिफाफा फाडून उघडलें व वखवखलेल्या आधाशाप्रमाणें त्यांतील मजकुरावरून नजर फिरविली.

माझा शाळेंतील वर्गसोबती शंकर मराठे याचें तें पत्र होतें. पत्रांत एवढाच मजकूर होता—

" न. वि. वि.

तुमचें पत्र मिळालें. तुळशी दीड महिन्यापूर्वी येथें आली होती खरी, पण पंधरा दिवसांपूर्वीच ती तुमच्या बागेंतील माळ्याबरोबर कोठें पळून गेली तिचा पत्ता नाहीं. तिच्या घरीं दुरून चौकशी करतां त्यांचा पाट लावण्याचा विचार असल्याचें कळतें. तुळशीबद्दल तुम्हांला आम्हीं सर्वांनीं परोपरीनें पूर्वीच बजावलें होतें; त्याचा प्रत्यय तुम्हांला इतक्या लवकरच आणि अशा विचित्र रीतीनें आला हें पाहून तुमच्याबद्दल फार वाईट वाटतें. आतां तरी तुम्हांला पश्चात्ताप होऊन घरीं यायची बुद्धि होवो अशी माझी इच्छा आहे. क. हे. वि.

आपला,

**शंकर.**"

पत्र वाचून माझ्या मस्तकावर जोराचा लाठीमार झाल्यासारखी सुन्न अवस्था आली मला. पायांतली सारी शक्ति एकदम नाहींशी झाल्यासारखें होऊन मी शेजारच्या खुर्चीवर कसाबसा बसलों.

क्षणकाल पत्राच्या मजकुराचा नीटसा अर्थच मला कळेना. पत्र पुन्हा वाचण्याचेंहि धैर्य करवेना !

तुळशी सखारामबरोबर पळून गेली असेल–? छे! या बातमीवर माझा नाहीं बसत विश्वास. तुळशी— माझी तुळशी असलें कांहीं करणार नाहीं कधीं. पण शंकरच्या लिहिण्याचा मग अर्थ काय ?

शंकरनें मुद्दाम खोटेंच कांहीं लिहिलें असेल असें मला म्हणवेना. त्याच्या पत्रांत माझ्याविषयीं रोष होता, पण तिरस्कार नव्हता. त्यानें लिहिलेलें खोटें असतें, तर तुळशी इतक्यांत परत यायला नको होती का ? निदान

तिनें माझ्या पत्रांपैकीं एकाला तरी उत्तर पाठवून आपली खुशाली कळवायला कांहीं अडचण नव्हती.

अशा उलटसुलट विचारांच्या फेऱ्यांत माझें मन गोते खात होतें. शंकरनें तुळशीबद्दल जी अभद्र वार्ता आपल्या पत्रांत लिहिली होती, तीवर माझा विश्वास बसेना कांहीं केल्या; पण ती एकदम खोटीहि वाटेना!

पत्राचें उत्तर येऊन खुलासा झाल्यावर माझ्या मनाची घालमेल कमी होईल असें मला गेले आठ-दहा दिवस वाटत होतें, पण झालें मात्र विपरीतच! शंकरच्या पत्रानें ती घालमेल कमी न होतां उलट वाढलीच; आणि मनाचा तापहि त्या मानानें जास्त झाला. तुळशी मला सोडून गेल्याची बातमी मला असह्य वेदना देऊं लागली. काळजावर कोणी तरी निष्ठुरपणें सुरी फिरवीत असल्याचा अनुभव मला येऊं लागला.

खरंच का तुळशी इतकी बेइमान झाली असेल माझ्याशीं?

हा प्रश्न राहून राहून अंतःकरणाच्या खोल गाभ्यांतून वर येऊन माझ्या डोळ्यांपुढें भेसूरपणें नाचत होता. डोळे गच्च मिटून घेतले तरीहि त्या प्रश्नाचें तांडव नजरेआड होईना. दीर्घकाळच्या जिवावरच्या दुखण्यांतून नुकत्याच उठलेल्या माणसाप्रमाणें निःशक्त होऊन मी खुर्चींत चैतन्यहीन पडून राहिलों होतों.

हळूहळू संध्याकाळ होऊन खोलींत अंधार पडत चालला होता; पण उठून दिवा लावण्याची इच्छाहि होईना मला. खोलींतील अंधारापेक्षांहि माझ्या डोळ्यांसमोर अधिक निबिड व अधिक भयाण अंधार पसरला होता!

आणि त्या अंधाराहूनहि जास्त भयप्रद वाटणाऱ्या कांहीं स्मृति माझ्या मनांत थैमान घालीत होत्या. अगदीं असहाय, प्रतिकारशून्य, निःस्तब्ध बनून मी हा परिस्थितीचा सारा चित्रपट पाहत होतों.

पुरीं दोन वर्षं सुद्धां झालीं नसतील त्या गोष्टीला—
मला पक्का आठवतो तो दिवस.

ज्यूनियर बी. ए.,मधें मी तेव्हां असल्यामुळें टर्मचे दिवस जेमतेम भरतांच कॉलेज रेसिडेन्सीला रामराम ठोकून आमचें गांव गांठलें मीं.

मार्चपासून जूनपर्यंत आतां जवळ जवळ चार महिने मला आमच्या गांवीं आरामांत काढायला मिळणार होते या आनंदांत मी होतों.

त्या आनंदाची सुरुवात म्हणूनच कीं काय, मीं संध्याकाळीं गांवीं पोंचल्या-नंतर आई व तात्या यांच्याशीं औपचारिक गप्पागोष्टी करून रात्रीच्या जेवणा-नंतर माझ्या खोलींत जाऊन मीं जी तणावून दिली, ती दुसऱ्या दिवशीं सूर्यनारायण चांगला आमच्या घराच्या छपरावर चढून येईपर्यंत! आणि मला जागृति आली, ती कांहीं झोप पुरी झाल्यामुळें नव्हे, तर माझ्या खोलींत कोणाची तरी चाहूल ऐकूं आल्यामुळेंच.

मी अर्धवट झोपेंत असतां खोलींतील खुर्ची कोणी तरी खर्कन् ओढल्याचा आवाज ऐकून मीं पडल्या-पडल्याच विचारलें,

" कोण आहे ? "

" मी–" मंजुळ आवाजांत, पण स्पष्ट उत्तर आलें.

" मी कोण ? "

" तुळसा."

" अँ ? तुळसा कोण ? " तें अपरिचित नांव कानीं पडतांच, मीं अंगावरची चादर दूर करून कुशीवर वळून विचारलें.

" तुळसा मोलकरीन नव्हं का ? " तुळसानें पूर्ववत् स्पष्टपणें उत्तर दिलें, " खोली झाडून ठेवायला आईसाबांनीं सांगितलं. तुम्ही झोपा गुमान."

असें म्हणून तुळसानें फिरून आपल्या कामाला सुरुवात केली. जणूं काय माझें अस्तित्वहि तिच्या गांवीं नव्हतें. तिच्या या निःसंकोच वृत्तीचें मला मनांतल्या मनांत थोडें नवल वाटलें, म्हणून मी पलंगावर उठून बसून तुळसाकडे कांहींशा कौतुकानें पाहूं लागलों.

खोली झाडीत असलेली मोलकरीण इतकी देखणी असेल अशी माझी मुळींच अपेक्षा नव्हती. पण तिला प्रत्यक्ष पाहतांच मी चकितच झालों. तुळसा गोरी तर होतीच, पण तिच्या बांधेसूतपणामुळें तिच्यांत विलक्षण आकर्षकपणा आलेला आहे हें माझ्या तेव्हांच ध्यानीं आलें. भरदार व ठाशीव अवयवांमधून तिचें यौवन कसें बाहेर फुटून निघूं पाहत असल्याचा भास होई.

मी तिच्या त्या उन्मादक मोहकतेकडे पाहतच राहिलों. खोलींत फिरणाऱ्या तिच्या मूर्तीमागून माझे डोळे भारल्यासारखे फिरत होते. क्षणभर माझी मला शुद्धच राहिली नाहीं कशी ती.

मधेंच तिनें माझ्याकडे पाहिलें. तिची व माझी दृष्टादृष्ट झाली. मघांशी तिच्या बोलण्यांत मला जो मनमोकळेपणा दिसून आला, तोच निःसंकोच भाव तिच्या दृष्टींतहि होता. स्थिर दृष्टीनें माझ्या नजरेला नजर लावून ती पाहत राहिली! यामुळें मलाच लाज वाटली. मी तिच्यावर खिळलेली दृष्टि बळेंच बाजूला करीत कांहीं तरी विचारायचें म्हणून म्हणालों,

"आज कमळा नाहीं आली कामाला?"

"कमळानं काम सोडलं इथलं. तिच्या जागीं मीच काम करतें सारं."

"कधींपासून?"

"झालं दोन माहिनं."

"अस्सं? तुझं गांव हेंच का?"

"माझी आई इथंच असतीया; पण माझ्या नवऱ्याचं गांव आहे साताऱ्याजवळ."

"मग तूं इकडं कां आलीस?"

"नवरा गेला माझा मरून, तेव्हां तिथल्या माणसांनीं मला त्रास द्यायला सुरुवात केली; म्हणून आतां आईजवळच राहायला आलें मी."

"हो का?"

मी कांहीं तरी बोलायचें म्हणून बोललों. तिचा तो धीटपणा व खणखणीत उत्तरें देण्याची पद्धत पाहून मी मनांतल्या मनांत जरासा गोंधळून गेलों होतों. इतकीं निर्भीड उत्तरें प्रथम भेटींत कोणी स्त्री पुरुषाला देईल अशी माझी अपेक्षा नव्हती; त्यामुळें तुळशीचा तो मोकळेपणा पाहून मीच बावरून गेलों व हा संभाषणप्रसंग चटकन् आवरता घ्यावा म्हणून म्हणालों,

"मला दाढी करायची आहे. तांब्याभर ऊन पाणी आण पाहूं."

तुळशी पाणी आणण्यासाठीं माझ्या खोलींतून निघून गेली खरी, पण माझ्या मनांतील तिच्याविषयींचे विचार कांहीं निघून गेले नाहींत. तिच्या देखणेपणापेक्षांहि तिच्या धीटपणाचाच विचार माझ्या मनांत चालला होता. इतक्या धीटपणानें आणि तेंहि पहिल्याच भेटींत कोणीहि स्त्री माझ्याशीं कधीं बोलल्याचा योगच आला नव्हता माझ्या आयुष्यांत आजवर; त्यामुळें एखादें अकल्पनीय दृश्य पाहून माणसाची व्हावी तशी माझी मति गुंग झाली असल्याचा मला अनुभव आला.

तुळशीच्या या धीटपणाचा माझ्या मनावर एक मात्र परिणाम झाल्याचें मला नक्की आठवतें. माझ्या आधींच्याच बुजऱ्या स्वभावामुळें मला तिची थोडीशी भीतिच वाटूं लागली मनांतून. स्त्रीसहवासांत आधींच अर्धमेला होऊन जाणारा माझा जीव तुळशीला पाहून जास्तच कंप पावूं लागला.

माझें मलासुद्धां या विचित्र वृत्तीचें कारण कळेना. तसें पाहिलें तर तुळशी ही आमच्या घरची मोलकरीण होती. ती असेल थोडी देखणी, धीटहि असेल जास्त; पण मला तिची इतकी दहशत कां वाटावी याचा मला उलगडाच होईना.

तशी दहशत वाटत होती इतकें मात्र खरें. आणि दिवसगतीनें ती कमी न होतां वाढतच चालली. ती इतकी, कीं मी शक्य तितका तिला टाळण्याचा बुद्धिपुरःसर प्रयत्न करूं लागलों.

या प्रयत्नांना माझ्या इच्छेप्रमाणें यावें तितकें यश न येण्याचें कारण खुद्द तुळशीचा वाढता धीटपणा होय. मी जों जों तिला झुकांडी देण्याचा प्रयत्न करीं तों तों ती जास्तच माझ्याशीं लगट करीत असल्याचें लवकरच माझ्या ध्यानीं आलें. आमच्यामध्यें एक तऱ्हेच्या लपंडावाचा खेळ सुरू झाल्या-सारखेंच वाटे मला केव्हां केव्हां.

अगदीं त्या पहिल्या दिवसाच्या दृष्टिभेटीपासून तुळशीची माझ्याशीं वाग-ण्याची तऱ्हा मला कांहींशी तऱ्हेवाईक वाटूं लागली. माझीं सर्व प्रकारचीं कामें न सांगतां वेळच्या वेळीं आणि व्यवस्थित होत असल्याचें पाहून मनां-तल्या मनांत मी खूष असे. कारण मला इतक्या वर्षांच्या अनुभवांत इतकें चोख काम करणारी मोलकरीण आमच्या घरीं कधीं कामाला राहिल्याचें आठवत नव्हतें !

माझ्या कामाच्या निमित्तानें हवें तेव्हां माझ्या खोलींत येण्याचा तर तुळशीला परवानाच मिळाल्यासारखें झालें होतें. माझ्या संकोची स्वभावाला तिचें हें वेळींअवेळीं बेधडक खोलींत घुसणें मानवत नव्हतें; परंतु तिला प्रतिबंध करण्याचें सामर्थ्य मात्र माझ्यांत कधीं आलें नाहीं. मी मनांत खूपदां निश्चय करी, कीं 'तूं माझ्या खोलींत बोलावल्यावांचून येत जाऊं नकोस' असें तुळशीला बजावण्याचा; पण ती समोर दिसली, कीं ते शब्द माझ्या तोंडांतून कांहीं केल्या बाहेर पडत नसत!

तिच्या बेफिकीर धीटपणाचें मला भय वाटे. तिला मीं असें बजावतांच तिनें 'कां? मी काय करतें तुम्हांला? खातें काय?' असा रोखठोक प्रश्न विचारला, तर मी काय उत्तर देणार होतों?

मनांत नसतांहि तिचा माझ्या खोलींतील राबता वाढविण्यास माझा हा दुबळेपणा कारण होत होता आणि एके दिवशीं संध्याकाळीं तर तिनें मला चांगला दरदरून घामच फोडला.

त्या दिवशीं मी कांहींसा अस्वस्थ चित्तानें, मस्तक सुन्न होऊन खोलींत पडून राहिलों होतों. सकाळीं मी आमच्या मळ्यांतील विहिरींत यथेच्छ डुंबलों होतों. त्याचा परिणाम डोकें गच्च भरून येण्यांत झाल्याची मला जाणीव होत होती; म्हणून मीं स्वस्थ पडून राहिलों होतों.

माझ्या कपाळावर कोणाचा तरी गार गार हात फिरूं लागल्याचा भास होऊन मीं चमकून डोळे उघडून पाहिलें, तों तुळशी समोर उभी असल्याचें दिसलें. तिचे डोळे माझ्याकडे एकसारखे रोखून पाहत होते. भय किंवा लज्जा यांचा त्यांत मागमूसहि नव्हता; उलट एक प्रकारची निर्भय स्निग्धता त्यांमधून माझ्या चेहऱ्यावर ओसंडत होती.

तिच्या त्या भेदक दृष्टीनें माझ्या शरीरांत एक शिणकारा चमकून गेला. मीं शरीर कांहींसें थरारल्यासारखें केलें व डोळे फिरून गच्च मिटून घेतले.

माझ्या कपाळावर आपले दोन्ही हात दाबून तुळशीनें आपल्या खणखणीत आवाजांत विचारलें,

"बरं नाहीं तुम्हांला, बाळासाहेब? असे संध्याकाळच्या वेळेला झोपूनसे राहिलांत?"

मीं नुसतांच हुंकार दिला. तिनेंच पुन्हा विचारलें,

"काय होतंय्? डोकं चढलंय्?"

तरीहि मीं नुसत्या हुंकारावर भागविलें.

"थांबा हं, मी रगडतें डोकं तुमचं."

"नको-नको!" मीं चटकन् घाबरून उत्तर दिलें, "मला कांहीं होत नाहीं. तूं जा कशी इथून."

तुळशी निघून तर गेली नाहींच; पण अशी कांहीं मजेदार हसली, कीं मी चांगलाच वरमलों मनांत!

"मला इतकं का भितां तुम्ही, बाळासाहेब?" तिनें नेहमींच्या धीटपणानें सरळ प्रश्न टाकला, "मी का वाघीण आहें? तुम्ही इतके दूर पळतां माझ्या-पासून तें. आतां पाहतेंच तर मी, काय होतंय् तें!"

इतकें बोलून तुळशी पलंगावर उशागतीं बसलीच आणि माझ्या दुबळ्या प्रतिकाराची पर्वा न करतां माझें मस्तक आपल्या मांडीवर घेऊन ती तें चेपूं लागली.

या अगदीं अनपेक्षित प्रकारानें मी इतका कांहीं दबून व बावरून गेलों, कीं आतां अधिक आढेवेढे घेतल्यास तुळशीचा धीटपणा आणखी पुढल्या कोठल्या थराला पोंचेल याची कल्पना न करवल्यामुळें मी आईच्या मांडीवरील अर्भकाप्रमाणें स्वस्थ पडून राहिलों!

त्या दिवशीच्या तुळशीच्या अतिप्रसंगानें मला तिची जास्तच भीति वाटूं लागली आणि उलट तुळशी अधिकच धीट झाली. ती नंतर हमेष कांहीं तरी निमित्तानें माझ्या अंगाला स्पर्श करण्याची संधि शोधूनच काढूं लागली म्हटलें तरी चालेल.

या प्रकारानें माझी मात्र वाढती कुचंबणा होऊं लागली. तिला कसें टाळावें हें मला कांहीं केल्या कळेना. घरांत कोणाला या बाबतींत मला कांहीं सांगणेंहि नाजूक आणि अवघड होऊन बसलें. माझें हें मर्मस्थान

बहुधा तुळशीनें ओळखलें असावें, व त्यामुळेंच तिचा धीटपणा--किंवा खरें म्हणजे गळेपडूपणा मर्यादा सोडूं पाहत होता.

कांहीं वेळां तर ती रात्रींहि कांहीं कारणानें माझ्या खोलींत येई! तसें न करण्याबद्दल सांगण्याची सोय नव्हती. 'तुम्ही मला इतकें भिता कां?' हा तिचा प्रश्न तिच्या ओठांवरच होता.

तिच्या प्रयत्नांना अखेर यश आलें. एकदां कशालाशी ती माझ्या खोलींत आली नि नेहमींप्रमाणें मला जवळजवळ खेटूनच उभी राहिली. तिच्या दृष्टींत असें कांहीं विलक्षण पाणी खेळत होतें, कीं मी नजरेला नजर भिडवूं शकत नव्हतों. पण त्या दृष्टीची फेक थेट माझ्या हृदयांत जाऊन भिडली असून माझ्या अंतःकरणांत कसली तरी अननुभूत पण जोराची खळखळ चालली असल्याची मला तीव्रतेनें जाणीव होऊं लागली.

ती खळखळ आंतल्या आंत दाबण्याचा मीं कांहीं क्षण प्रयत्न केला; पण येथेंहि माझ्या दुबळेपणानें मला दगा दिला. तुळशीच्या धीटपणापुढें मीं अशीच माघार घेतली होती, आणि या खळखळीच्या आवेगालाहि मी तसाच असहायपणें बळी पडलों.

एकदम् मी तुळशीचें चुंबन घेऊन मोकळा झालों!

ही लाट इतकी अचानक पण वेगानें आली, कीं मी काय करतों, किंवा केलें, याची मला तेव्हां शुद्धहि नव्हती.

तुळशीनें काडीचाहि प्रतिकार केला नाहीं. पण माझी मलाच नंतर विलक्षण लाज वाटली. माझ्या बाहुपाशांतून तिला दूर ढकलून मी मुकाट्यानें पलंगावर जाऊन उशींत तोंड खुपसून पडलों. भेदरलेल्या सशासारखी माझी अवस्था झाली होती तेव्हां!

माझ्या केसांवरून तुळशीचा हात फिरूं लागल्याची जाणीव होतांच झटकन् तो दूर झिडकारून मी खेकसलों,

"जा—तूं इथून चालती हो पाहूं."

माझ्या अंगीं इतकें धैर्य तेव्हां कोठून आलें कोण जाणे. तुळशीच्या धीटपणाचा निश्चयानें प्रतिकार केल्याचा तो माझा पहिलाच प्रसंग आणि त्याहिपेक्षां नवल हें, कीं तुळशीनें माझ्यापुढें पड खाल्ल्याचाहि तोच पहिला प्रसंग!

आणि त्या प्रसंगानंतर मला एक विचित्र अनुभव येऊं लागला. तुळशीची तेव्हांपासून मला भीति वाटेनाशी झाली. जणूं माझ्यांतील पुरुषी भाव जागृत झाला होता. उलट तुळशीच आतां माझ्याशीं नम्रतेनें वागूं लागली होती. तिचा तो धीटपणा कोठें पळाला कोण जाणे! त्या दिवसापासून ती पाळीव कुत्र्याप्रमाणें माझ्या आज्ञेंत वागूं लागली. माझ्या शब्दाला शब्द करण्याचें तर राहोच, पण नजरेला नजर भिडविण्याचेंहि ती टाळूं लागली.

आमच्या दोघांच्या वृत्तींत असा पालट झाल्याचा एक मात्र परिणाम असा झाला, कीं तुळशीचा विचार माझ्या मनांत सारखाच घोळूं लागला. त्या पहिल्या प्रेमाची स्मृति कांहीं केल्या मनांतून नाहींशी होईना. तुळशीविषयीं वाटणाऱ्या भीतीची जागा आतां प्रीतीनें पटकावली होती. ही प्रीतीची लता दिवसेंदिवस वाढत राहून, आम्हीं दोघें एकमेकांकडे जास्तजास्त ओढलीं जात आहोंत हें मला तेव्हां पुरतेपणीं कधीं उमगलेंच नाहीं.

तुळशीकडून सर्व गोष्टींना निमूट उत्तेजनच मिळत गेल्यानें आमच्या प्रेमाचीं पावलें झपाट्यानें वाटचाल करूं लागलीं. त्याची चाहूल लवकरच आमच्या घरांत व गांवांतहि ऐकूं गेली.

याचा परिणाम व्हायचा तोच झाला.

तात्यांच्या कानीं हा प्रकार जातांच त्यांनीं माझी सपाटून कानउघाडणी केली. तुळशीचें आमच्याकडचें काम सुटलें. गांवांत आमच्याविषयीं भलभलतेंच बोलणें होत असल्याचें मधूनमधून माझ्या कानीं येई. घरींहि वातावरण थोडें गरम होतें. तात्यासाहेबांच्यासारख्या प्रतिष्ठित गांवकऱ्याच्या अब्रूला मीं माझ्या या कृत्यानें काळोखी फासली होती, म्हणून तात्या माझ्यावर संतापले होते.

माझी चूक आतां मलाहि दिसत होती. पण गोष्टी व्हायच्या त्या होऊन गेल्या होत्या. त्या कशा झाल्या तें मलाहि नीटसें कधीं उमगलें नाहीं. त्यांचे परिणाम मात्र मला आतां भोगावे लागत आहेत.

तुळशीच्या हाकालपट्टीनंतर मीं तिची गाठ न घेण्याचा मनाशीं निश्चय केला. पण तिच्या आठवणी कांहीं केल्या मनांतून जात ना. त्या सुखाची स्मृति झाली, कीं बुद्धीला बधिरता येई आणि तुळशीच्या विरहाच्या वेदना व्याकुळ करीत. त्यांचा विसर पाडण्यासाठीं मीं मित्रमंडळीच्या परिवारांत वेळ

घालविण्याचा मार्ग पत्करला. पण माझ्यासंबंधीं त्यांच्या बोलण्यांत जो कुचेष्टेचा स्वर निघे, तो मला असह्य होऊं लागल्याने मला साऱ्यांची संगत टाळून घरांत कोंडून घ्यावें लागे.

घरांतहि धूसपूस आणि टोले-टोमणे यांची धग होतीच. या वातावरणांत मला नको हा जीव असें होऊन जाई. कोणीच मला सहानुभूति दाखविण्यास राजी नसे. मी स्वतःवरच खूप चिडलों, आणि त्या तिरीमिरींतच एके दिवशीं मी तुळशीच्या घरीं जाऊन धडकलों.

तेथें मला हवी होती ती सहानुभूति मिळाली. हृदयाची आग शांत झाली.

या अनुभवानें फिरून आमचीं अंतःकरणें एक झालीं. लोकनिंदेची कदर न बाळगतां मी तुळशीच्या घरीं जाऊं लागलों. तिनेंहि धीटपणें माझें स्वागत केलें. जणूं जोडीनें जगाच्या जाचाला तोंड देण्यास ती तयार होती माझ्या-बरोबर.

जसजशी घरीं व दारीं माझी अवहेलना होत गेली, तसतशी तुळशीच्या प्रेमाची माझ्या मनांतील ओढ वाढत गेली. तुळशी तर मजसाठीं कांहींहि करण्यास तयार होती, अशी तिच्या लाघवी बोलण्यावरून माझी तेव्हां पक्की समजूत झाली होती.

गांवांत होणारी कुटाळकी टाळण्यासाठीं मीं कॉलेजच्या निमित्तानें पुण्याला जावें व तेथेंच तुळशीलाहि मीं न्यावें आणि स्वतंत्रपणें तिची राहण्याची सोय करून द्यावी, ही कल्पना तिनेंच माझ्या मनांत भरविली.

या योजनेनें माझी तात्पुरती सोडवणूक झाली खरी; तात्यांच्या संतापाच्या माऱ्यांतून व गांवकऱ्यांच्या कुचेष्टेच्या तडाख्यांतून मी कांहीं काळ सुटलो खरा; परंतु, पुण्याला तुळशीला आणून टेवल्यावर कांहींशा नाजुक परिस्थितींत मी सापडलों.

आमच्या प्रेमाला तिथें कसलाच अटकाव राहिला नसल्यानें आमच्या वागणुकींत मोकळेपणा आला. तुळशीची मध्यंतरीची लाजाळू वृत्ति पालटून ती पूर्ववत् धीटपणें माझ्याबरोबर सर्वत्र वावरूं लागली. जणूं आम्ही लग्नाचीं नवरा-बायकोच होतों !

तुळशीच्या आहारीं मी आतां पुरताच गेलों होतों. माझ्या स्वभावांतील दुबळेपणाच्या मर्मस्थानामुळें तिची माझ्यावर वाढती हुकमत चालूं लागली. तिच्या-माझ्या खऱ्या संबंधाची परिस्फुटता न व्हावी म्हणून मी धडपडत होतों आणि त्या प्रमाणांत माझ्यावरील आपलें वर्चस्व ती हर प्रयत्नांनीं वाढवीत होती.

मला ही जाणीव केव्हां केव्हां होई. पण प्रवाहांत सापडल्यासारखी माझी अवस्था अगतिक झाली होती. आणि माझ्या आयुष्यांत आलेल्या या पहिल्याच स्त्रीवर माझें प्रेमहि जडलें होतें, हेंहि मी आतां लपवून ठेवीत नाहीं. या पहिल्या प्रेमामुळेंच तिच्या ताबेदारींत मला सुख वाटूं लागलें, तिच्या सहवासांत उन्मादक आनंद वाटूं लागला. तिच्याखेरीज मला चैन पडेनासें झालें !

आमच्या प्रेमाची वार्ता कोठून तरी तात्यांच्या कानीं गेली व त्यांची स्वारी अचानक एके दिवशीं पुण्यास येऊन थडकली ! संतापानें त्यांच्या अंगाची लाही लाही झाली. मला ते किती व काय काय बोलले तें नुसतें आठवलें, कीं आज माझा थरकांप होतो. पण त्यांच्या त्या भडाग्नीमुळेंच मी भडकलों व हट्टाला पेटलों. मला अजूनहि वाटतें, कीं त्या दिवशीं तात्यांनीं माझ्यावर तसा अग्निवर्षाव केला नसता, तर कदाचित् या कथेचा शेवट निराळाहि झाला असता. कोणी सांगावें !

पण झालें तें असें, कीं तात्यांच्या बोलण्यानें मी संतापलों व त्यांना टाकून बोललों !

"कुलांगार कारटा ! फिरून माझ्या घरीं पाय तर टाक, पाहतों मी."

असा दम भरून तात्या निघून गेले. पितापुत्राचें नातें तोडून टाकण्याइतका कणखरपणा माझ्या दुबळ्या स्वभावांत तेव्हां कोठून आला याचें मला आज नवल वाटतें. पहिल्या प्रेमाच्या अंगीं इतका उन्माद असतो का ?

निदान माझा तरी तसा अनुभव आहे. एरवीं मी तुळशीच्या इतका कच्छपीं लागलों नसतों.

तात्यांची व माझी अशी ताटातूट झाल्यावर तुळशीवांचून मला आपलें असें माणूस कोणी उरलें नाहीं. पुण्यांत राहणें आतां प्रशस्त वाटेना, म्हणून मीं कॉलेजला रामराम ठोकून मुंबई गाठली.

मुंबईत लोकनिंदेचा तितकासा त्रास नसला, तरी बेकारीचा मात्र होऊं लागला. तुळशीच्या वागणुकींत थोडा खर्चिकपणा वाढला होता. इथे आल्यापासून पैशाची तरतूद करण्याचा एक मार्ग तिनेंच मला सुचविला.

मला प्रथम तो कसासाच वाटला. पण तिच्या सतत टोंचणीनें व कांहींशा व्यावहारिक परिस्थितीमुळें मला तात्यांशीं वडिलार्जित इस्टेटीच्या फारकतीबाबत दावा करण्याचें धैर्य प्राप्त झालें.

कोर्टकचेरींत आपल्या घराण्याच्या लौकिकाचे धिंडवडे होऊं नयेत याच एका इच्छेनें तात्यांनीं तशी फारकत तावडतोब करून दिली. त्यामुळें माझीहि होणारी केवढी तरी अडचण टळली!

या फारकतीनें आमच्या गांवीं कांहीं एकर जमीन माझ्या वांट्याला आली खरी; पण गांवीं जाऊन तिच्या लागवडीच्या वगैरे फंदांत पडणें मला शक्य नव्हतें. गांवीं जाण्याचें माझ्यांत धैर्यहि नव्हतें. तात्यांचे गांवांत वजन चांगलें असल्यामुळें मला कोणी सहानुभूति दाखवील अशी आशा नव्हती.

अशा स्थितींत हातीं आलेली जमीन विकून त्याचे टक्के करावेत ही तुळशीची कल्पना मला तात्काळ पसंत पडली. तिनें जणूं मला मंत्रमूढ करून टाकलें होतें तेव्हां!

जमीन विकून आलेल्या पैशाचा बराच मोठा भाग तुळशीनें स्वतःसाठीं दागिने करून घेण्यांत खर्च केला. मूळच्या देखण्या तुळशीच्या रूपांत अलंकारांनीं पडणारी भर माझ्या डोळ्यांवर आली असावी. कारण तिच्या तोंडांतून बाहेर पडलेला प्रत्येक दागिना तिच्या शरीरावर मीं माझ्या हातांनीं चढविला होता!

माझ्या सुखाचा तो उत्कर्षबिंदु वाटला मला तेव्हां. तुळशीशिवाय मी जगणार नाहीं अशी भीति मला वाटे. तिच्या सर्व इच्छा पुऱ्या करण्यावांचून मला आयुष्यांत कांहीं कर्तव्यच उरलें नव्हतें. डोक्यांत तुळशीशिवाय दुसरा विचारच राहीनासा झाला.

मनाच्या या अवस्थेची धुंदी कमी होण्यापूर्वींच आपल्या आईला भेटण्याचें निमित्त सांगून आपल्या सर्व दागिन्यांसह तुळशी गांवीं गेली आणि दिलेल्या पंधरा दिवसांच्या मुदतीची दामदुप्पट झाली तरी, ती परत आली

नाहीं! यामुळें माझी वृत्ति किती बेचैन झाली असेल याची कल्पना सांगून येणार नाहीं. त्यांतच तिला पाठवलेल्या एकाहि पत्राचें उत्तर न आल्यामुळें तर माझी अवस्था अतिशय चमत्कारिक झाली. अनेक शंकांनीं माझें मन पोखरून खाल्लें.

अगदीं राहवेना तेव्हां माझ्या जुन्या दोन-तीन मित्रांना काकुळतीस येऊन तुळशीची चौकशी करून बातमी कळविण्यास मीं विनविलें.

शंकरच्या त्या पत्रानें माझ्या मस्तकावर वज्राघातच केला! माझ्या मस्तकांत हजारों किडे पडून तडतडताहेत अशा वेदना होऊं लागल्या. तोंडांतून खेदजड शब्द निघत—

"तुळशी! तुळशी! तुझ्या प्रेमाचं तें सारं नाटक मला केवळ माणसांतून उठवण्यासाठींच होतं का?"

हा केविलवाणा प्रश्न मी टेबलावरच्या तुळशीच्या फोटोला उद्देशून करीत होतों. त्या अंधारांत सुद्धां तुळशीचें तें खदखदून खोंचक हसणें माझ्या डोळ्यांसमोर दिसत होतें. ती भेसूर विटंबना माझ्या शरीराचा थरकांप करीत होती!

लेखनकाल— फेब्रुवारी, १९४०.

---

# अस्पृश्य

आमचें गांव कांहीं फारसें मोठें नाहीं. सारा चार-पांचशें उंबरठ्यांचा पसारा. पण त्या मानानें गांवाचा लौकिक मात्र दूरवर पसरला होता. कारण लांबीरुंदीपेक्षां गांवकऱ्यांच्या भल्याबुऱ्या स्वभावावरच गांवाचा लौकिक अवलंबून असतो.

हा लौकिक कांहीं फारसा स्पृहणीय नव्हता. त्यांत चांगलेपणापेक्षां वाईट-पणाची भर जरा जास्त होती, असें निःपक्षपाती मनाला कबूल करणें भाग होतें. कारण हा लौकिक गांवकऱ्यांच्या आपापसांतील दुहीजन्य भांडणावर उभारलेला होता. हीं भांडणेंहि प्रायः जातिवाचक असल्यामुळें तीं अधिकच किळसवाणीं वाटत.

सर्व हिंदुस्थानांत जाती-जातींचीं भांडणें हा एक प्रबल रोग माजलेला असल्यानें, त्यापासून आमचें गांव फार दिवस अलिप्त राहील हें संभवनीय नव्हतें. घर फिरल्यावर वासेहि फिरणार हें ठरलेलेंच! बारा बलुत्यांचा कारभार खेडेगांवांत असल्यामुळें जातिविषयक कुरापती निघण्यास व त्याचे परिणाम मारामारींत होण्यास फारसा विलंब लागत नसे.

गांवचा मुख्य रस्ता उत्तर-दक्षिण असा गेला असून त्या रस्त्यावर बाजारपेठ वसली होती. या रस्त्याच्या उत्तर टोकाला गांवचीं वेस असून पलीकडे एक महादेवाचें सुंदर व जुनाट देऊळ होतें. आमच्या गांवचें मुख्य देऊळ तें हेंच होय. या देवस्थानाला पूर्वापार उत्पन्न चालत आलेलें असून देवाचा ब्राह्मण पुजारीहि आज कित्येक पिढ्या तो हक्क भोगीत आला होता. गांवची मुख्य वसती हिंदु लोकांची असल्यामुळें त्यांच्यांत सामाजिक हक्कांसाठीं कितीहि भांडणें झालीं तरी त्याची धग या देवळापर्यंत कधींच पोंचत नसे. पण अलीकडे तेवढीहि समाधानाची जागा उरूं न देण्याचा दैवाचा विचार दिसूं लागला.

गांवच्या बाजारपेठेंत मध्येंच मुसलमानांची एक मोडकी मशीद होती. माझ्या लहानपणापासून मला पक्की आठवण आहे, कीं आज कैक वर्षें या मशिदींत पायधूळ झाडण्याची तसदी कोणीच घेतलेली नव्हती. पण अलीकडे केव्हां केव्हां मात्र तेथें एका-दोघां मौलवींच्या आकृति दिसत असत. त्यांच्या खटपटीमुळें म्हणा वा इतर कांहीं अज्ञात कारणामुळें म्हणा, अलीकडे तेथें आमच्या गांवांतील व आसपासच्या पंचक्रोशींतील मुसलमान नमाज पढण्यासाठीं दर शुक्रवारीं एकत्र होऊं लागलेले दिसूं लागले. ते परस्थ मुल्लाजी त्यांना कांहीं धर्मोपदेश करीत असें कर्णोपकर्णीं कळे. कित्येक वेळां हा उपदेशविधि रात्रीं-अपरात्रींहि चालत असे.

माणसाच्या अंगीं जिज्ञासा व तार्किकपणा ही जोडगोळी कायमची ठाण मांडून बसलेली असल्यामुळें, मानवी जीवनाला विविधतेचा मनोरम रंग चढलेला दिसून येतो. वास्तविक पाहतां आमच्या गांवकरी हिंदूंना आजवर त्या मशिदीची आबाळ कां होत आली यासंबंधीं जितकी माहिती होती तितकीच त्या मशिदीच्या पुनरुज्जीवनाच्या कारणांविषयीं होती ! पण जिज्ञासु तार्किक स्वस्थ कोठले बसायला? त्यांनीं अनेक कल्पनांना जन्म देऊन वातावरणांत चैतन्य उत्पन्न केलें व हिंदु लोकांना वाटूं लागलें, कीं लवकरच हिंदु-मुसलमानांत मारामारी करण्याचीच तयारी ते दोघे मौलवी करीत आहेत.

कल्पनेंतून कल्पना निघून लवकरच आमच्या गांवांत हिंदु व मुसलमान असे दोन तट उघड उघड बनले. कोणी म्हणे स्त्रिया व मुलें पळवून बाटविण्यासाठीं हे मौलवी येथें आले. कोणाला वाटे महादेवावर कांहीं तरी संकट

येणार. कोणाचा विश्वास ते दोघे हसननिजामीचे हस्तक आहेत. एक ना दोन! —अशा अनेक कल्पनांना मोकाटपणें शब्दस्वरूप लाभत गेल्यानें त्याचा साहाजिक परिणाम म्हणजे स्थानिक हिंदु-मुसलमानांच्या मनांत न कळत का होईना, पण एकमेकांविषयीं तेढ उत्पन्न झाली व कालाबरोबर ती वाढीस लागली.

जातिवाचक भांडणांचा मुख्य पाया परस्परांविषयींचा अज्ञानमूलक गैरसमज व तज्जन्य संशयी अविश्वास हा होय. परस्पर खुल्या विचारविनिमयाला अवसर मिळेल, तर हिंदु-मुसलमानांत उत्पन्न होऊं पाहत असलेली दुही, निदान आमच्या गांवापुरती तरी, टळेल अशा विचारानें मी तशा स्वरूपाचा एखादा प्रसंग घडवून आणण्याचा प्रयत्न करूं लागलों. पण त्याचा परिणाम अपेक्षेच्या अगदीं उलट घडून आला. कारण प्रत्यक्ष सभेंत तडजोडीची समतोल भावना कोणीच राखली नाहीं. उभयपक्षीं पक्षाभिनिवेशाचा आग्रह धरून उलट बाजूवर खरे-खोटे आक्षेप घेण्यांत आल्यामुळें मूळची तेढ इतकी वाढली, कीं पुन्हा समेटाचा विचारहि मनांत आणणें अशक्य झालें.

गांवकऱ्यांच्या मनांत तेढीचें बीं पेरलें गेलें. त्याला खोट्या अफवांचें पाणी व दुष्ट शिकवणुकीचे खत कोणीकडून ना कोणीकडून तरी मिळत गेलें व अल्पावधींतच परस्परवैमनस्याचा वृक्ष फोफावलेला दिसूं लागला. त्याला फळें येण्याला फक्त अनुकूल संधीचीच उणीव होती!

बीं पेरलें गेलें तरी त्याचें रोपटें होऊन तें फळाफुलांनीं बहरून येण्याला काळाचा योग्य तो अवसर जावाच लागतो, त्याला खतपाणी मिळावें लागतें.

तीहि उणीव थोड्याच दिवसांत भरून निघाली. गणेशोत्सव आला. हा उत्सव आमच्या गांवांत आज अनेक वर्षे सार्वजनिक रीतीनें साजरा होत होता. यंदाच्या उत्सवाचा मी मुख्य चिटणीस होतों. सर्व गांवकऱ्यांनीं या धार्मिक उत्सवाला शक्त्यनुसार वर्गणी देऊन सहाय करावयाचें असा प्रघात असे. त्याप्रमाणें छोटे छोटे बालवीर स्वयंसेवक वर्गणीसाठीं गांवांतून फिरूं लागले. अगदीं परवांपर्यंत मुसलमान लोकहि आमच्या उत्सवास खुषीनें वर्गणी देत असत; पण यंदा नूर बदलला.

स्वयंसेवक गांवचा शिंपी अल्ली याजकडे रीतसर वर्गणीसाठीं गेला असतां,

त्यानें त्याला कांहीं उद्धट वचनांचा अहेर केला. त्यावरून बोलाचाली झाली व प्रकरण पेटलें. वास्तविक प्रकार असा होता—

धोंडोपंतानें (स्वयंसेवक) सहासात महिन्यांपूर्वी अल्लीकडून कांहीं कपडे शिवून घेतले होते व त्याचे शिलाईचे पैसे अद्याप दिले नव्हते. होतां होईतो अल्लीचे तोंड चुकवून धोंडोपंत वेळ मारून नेई. तेव्हां तो दुकानांत आला असतां अल्ली तरी कां म्हणून गप्प राहील? त्यानें साहजिक असें म्हटलें कीं, 'माझी वर्गणी तुझ्याकडच्या शिलाईतून दे व मला पावती दे.'

यावरून बोलणें निघून एकमेकांनी एकमेकांवर खऱ्याखोट्या आरोपांचे भांडणाचे भरांत हल्ले केले. धोंडोपंतानें झालेला आपला अपमान झाकण्या-साठीं गांवांत भूमका उठवली, कीं यंदा मुसलमान उत्सवाला विरोध करणार आहेत व म्हणूनच अल्लीनें वर्गणी न देतां भांडण उपस्थित केलें. झालें. आधींच मनें तयार झालेलीं होतीं. अशा मशागत झालेल्या भूमींत बीजाला मूळ धरावयाला कितीसा वेळ लागणार? लागलीच सर्व हिंदूंनीं या उत्सवापुरता मुसलमानांवर एकजात बहिष्कार घालण्याचें ठरविलें!

आमच्या गांवापासून थोड्याशा अंतरावर असलेल्या शहरांत मुसलमान लोकांचा एक प्रसिद्ध बँड असून आजवर दरवर्षी आम्ही गणपतीच्या मिरवणुकीस तो बँड बोलवीत असूं. यंदाहि त्याला आमंत्रण गेलें होतें. पण मध्यंतरीं अल्ली-धोंडोपंत प्रकरण उद्भवल्यामुळें उत्सवमंडळानें तें आमंत्रण रद्द केले. यामुळे बँडवाल्यांची प्राप्ति बुडाली व 'आगाऊ आमंत्रण आल्यामुळें आपण दुसरीकडचीं आमंत्रणें स्वीकारलीं नाहींत व आतां ते रद्द केल्यामुळें आपलें नुकसान झालें तें भरून द्या' असा त्यांनीं आग्रह धरला. त्या आग्रहाला पेटून उत्सवमंडळानें उत्तर पाठविलें, कीं 'बँडवाले जर मशिदीवरून बँड वाजविण्यास तयार असतील तर पहिलें आमंत्रण अजूनहि कायम समजावें.' अशा प्रकारचा परस्पर-बनाव अहेतुकपणें घडून त्याला परस्पर-वैराचें स्वरूप आलें. उभयपक्षांची निकराची तयारी होऊं लागली.

गणपतीचा उत्सव तर शांतपणें पार पडला. चौघडा, पूजा-अर्चा, आरत्या, मंत्रजागर, कीर्तनें, व्याख्यानें, पुराण वगैरे कार्यक्रम यथासांग पार पडले. बाल-मेळाहि यशस्वी झाला. उत्सव आठवडाभर चालू राहिला. तेवढ्या

अवधींत मुसलमानांनीं कांहीं फारशी गडबड केलेली दिसली नाहीं. मात्र रोज चार-दोन नवे मुसलमान परठिकाणाहून गांवांत येऊन पेठेंतील मशिदींत जमत असल्याची बातमी पसरली. त्यावरून मिरवणुकीच्या वेळां कांहीं तरी गडबड होणार अशी दाट वदंता गांवभर झाली.

ही वार्ता कानांवर पडतांच उत्सव-मंडळाचें धाबें दणाणलें. मंडळांतील बहुतेक कार्यकर्ते सुशिक्षित व पांढरपेशा वर्गांतील असल्यामुळें यदाकदाचित् मारामारीचा प्रसंग आलाच तर या वाचिवीरांचा रांगड्या मुसलमानांपुढें निभाव लागण्यासारखा नव्हता. 'मारामारी होणार' या केवळ भविष्यानेंच पुष्कळांची कंबर खचली व त्यांनीं कांहीं ना कांहीं सबबीमुळें उत्सवांतून अंग काढून घेण्यास सुरुवात केली.

अखेर मिरवणुकीचा दिवस आला. दरवर्षी मिरवणूक संध्याकाळीं पांचच्या सुमारास निघे. पण यंदा दंग्याच्या भीतीमुळें माणसेंच कोणी जमेनात व त्यामुळें सहा वाजून गेले तरी मिरवणुकीस पत्ता नाहीं! खुद्द उत्सवमंडळाच्या अध्यक्षांचा व सभासदांचा पत्ता नाहीं! घरोघर स्वयंसेवक रवाना झाले, पण जाणूनबुजून सापावर पाय देण्यास कोण तयार होणार? जो तो विषाची परीक्षा बघण्याचें टाळीत होता.

साडेसहाला कशीबशी मिरवणूक निघाली. मंडळी अगदींच थोडी व त्यांतहि स्वयंसेवकांचाच भरणा जास्त. मशिदीपासून थोड्याशा अंतरावर मिरवणूक येतांच मशिदींतून एक एक मुसलमान बाहेर पडून रस्त्यावर आडवा उभा राहूं लागला. प्रत्येकाच्या हातांत काठी होती. हें दृश्य पाहतांच मिरवणूक जागचे जागींच थबकली व पुढें काय करावें हा आमच्यापुढें प्रश्न पडला.

मीं पुढें होऊन मुसलमानांचा प्रमुख मौलवी बद्रुद्दिनची गाठ घेतली, आणि सामोपचारानें गोष्टी घेण्यास समजाविलें. समेटासाठीं मशिदीवरून वाद्यें न वाजवितां मिरवणूक नेण्याची मीं कबुली दिली. पण त्यांच्या हातांतील काठीच्या जोरावर त्यांनीं आपला विवेक मारून टाकला होता. त्यामुळें अजीबात मिरवणूक रहित करा, नाहीं तर काठ्यांशीं टकरा द्या असा रोखठोक जबाब त्यांनीं दिला. पहिली गोष्ट अपमानकारक म्हणून व दुसरी

अनर्थावह म्हणून मान्य करणें मला प्रशस्त वाटेना. शिवाय मिरवणूक तशीच हट्टानें पुढें नेणेंहि इष्ट नव्हतें. कारण तींत बालगोपालांची संख्या जास्त होती.

कांहीं तरी उपाय तर केलाच पाहिजे. गांवचे पोलीस कामगार जातीनें मुसलमान, तेव्हां त्यांच्याकडे जाण्यांत अर्थ नव्हता. दुसरा काय तोडगा करावा या विचारांत मी होतों, तोंच मला कुणी तरी रामराम केल्याचा भास झाला. मीं वर पाहिलें तों जवळच कल्लू महार उभा होता.

माझें आपल्याकडे लक्ष गेलें आहे हें पाहतांच तो म्हणाला,

"विचार कसला करतां? मिरवणूक रहित करणं म्हणजे आपल्या धर्माचं मरण कबूल करण्यासारखं आहे. नुसते दहापांच लांडे काठ्यांनिशीं समोर आल्याबरोबर आज पळता पाय काढाल, तर हा समंध कायमपणें आपल्या मानगुटीला बसेल. तुम्हां लोकांत नसेल ताकद तर मला सांगा. आसपासचा सारा म्हारवडा जमवून तुम्ही सांगाल तेथून मिरवणूक हिंडवून आणतों. पाहतों लांडे काय करतात तें."

कल्लूच्या रूपानें देवदूतच माझ्या मदतीला आला असा मला क्षणभर भास झाला. कल्लूसारख्या एका अस्पृश्य मानलेल्या अशिक्षिताची आपल्या धर्मावरील श्रद्धा व त्यासाठीं जीव धोक्यांत घालण्याची तयारी पाहून सुशिक्षित पांढरपेशा लोकांची धर्माबाबतची उदासीनता व भीरुता मला अधिकच तिरस्कारार्ह वाटूं लागली. आपल्या धर्मावर चोंहों बाजूंनीं कसकसे हल्ले झाले व होत आहेत याची त्यांना जाणीव आहे असे सुशिक्षित आपल्या धर्माला वांचविण्याची कांहींच खटपट न करतां उलट त्याला दूषणें देण्यांत दंग असावेत व याच सुशिक्षितांनीं धर्माच्या खोट्या नांवावर ज्यांना पैजाराच्या मोलानें वागवावें त्या अस्पृश्यांनीं मात्र धर्मासाठीं त्यागाचें खडतर मोल देण्यास तयार राहावें! हा विचार मनांत येतांच माझें मन सद्गदून आलें. त्या धर्मप्रेमी कल्लूबद्दल मला एक प्रकारचा आदर वाटूं लागला. एकदम जाऊन त्याला भेटावें अशी मला इच्छा झाली. पण हजारों वर्षांचे परंपरागत संस्कार हाडींमासीं खिळल्यामुळें तसें करण्यास पाय उचलवेनात. कारण दुष्ट रूढीच्या जड शृंखला माझ्या पायांत दृढ होत्या. मी उच्चवर्णीय ब्राह्मण होतों आणि तो— अरेरे! अ–स्पृ–श्य...

असल्या विचारांचा गोंधळ कांहीं क्षण माझ्या मनांत माजून राहिल्यामुळें मीं कल्लूला कांहींच उत्तर दिलें नाहीं. त्यामुळें कल्लूची भावना दुखावली गेली. हात दाखवून अवलक्षण करून घेतल्यासारखें त्याला वाटूं लागलें. तो किंचित् उद्वेगपूर्ण स्वरानें म्हणाला,

"मी महार आहे म्हणून का तुम्हांला इतकी अडचण वाटते? देवाच्या घरीं जात रुजू नाहीं सरकार? देवाची चाकरी करण्याचा सर्वांना सारखाच हक्क आहे. ज्याचा भाव त्याचा देव."

"छे-छे, कल्लू, तुझ्या जातीनं काय केलं आहे? शिवाय जातींत जन्म घेणं ही गोष्ट कुणाच्या हातची का आहे? तुझ्याच हातून आपली मिरवणूक निघावी अशीच देवाची इच्छा दिसते. एरवीं असा प्रकार कां व्हावा? तेव्हां मी तरी तुझ्या पवित्र इच्छेच्या आड कां येऊं? जा, खुशाल तुझे सोबती जमीव. मिरवणूक रहित करण्यापेक्षां ती तुझ्या हातून का होईना, पण पार पडो म्हणजे झालं!"

कल्लूला फार आनंद झाला. माझ्याबद्दल त्याला कृतज्ञता वाटली व ती त्याच्या डोळयांत अश्रुरूपानें प्रगटहि झाली. तो धावतच आपली मंडळी जमविण्यास निघून गेला. तो परत येईपर्यंत मिरवणूक तेथेंच थांबविणें प्राप्त होतें. झाल्या प्रकाराची वार्ता सर्व गांवांत पसरण्यास वेळ लागला नाहीं. या वार्तेनें मुसलमानांतहि चुळबूळ सुरू झाली.

थोड्याच वेळांत आपल्या सोबत्यांनिशीं कल्लू आला. त्या मंडळींच्या चेहऱ्यावर आज आनंदाचें व उत्साहाचें तेज दिसत होतें. त्यांनीं श्रीमंगलमूर्तीला भक्तिभावानें साष्टांग प्रणिपात केला व पालखीचा दांडा उचलला.

'गणपति बाप्पा मोरया। पुढल्या वर्षी लवकर या॥' ह्या घोषानें वातावरण पांच मिनिटेंपर्यंत दुमदुमून गेलें. मिरवणूक पुन्हा निघाली. वाद्यें वाजूं लागलीं.

हातांत काठी घेतलेला कल्लू सर्वांत पुढें चालला होता. मशीद जवळ जवळ येऊं लागली. माझें लक्ष पुढें काय होतें इकडे होतें. तों काय

चमत्कार! यक्षिणीची कांडी फिरावी तसा चमत्कार घडून एक एक मुसलमान आपसूकच रस्त्यांतून खालीं मान घालून मशिदींत जाऊं लागला. वाद्यांच्या व जयजयकाराच्या घोषांत मशिदीवरून मिरवणूक सुखरूप पार पडली.

माझा जीवहि खालीं पडला!

हा चमत्कार कल्लूप्रभृति लाठीबाज अस्पृश्य बांधवांमुळें घडून आला होता, हें उघड होतें. मिरवणूक मशिदीवरून सुखरूप गेली हें गांवांत कळल्याबरोबर आतां भीतीचें कारण उरलें नाहीं अशा विचारानेंच बहुधा भास्करशास्त्री, शंकरराव खराटेप्रभृति उत्सवमंडळांतील प्रमुख गृहस्थ आपल्या पगड्यांचे डौलदार कोके उडवीत हळूच मधल्या कुठल्या तरी गल्लींतून वा बोळांतून मिरवणुकींत घुसूं लागले. त्यांच्या अंगचोर संभावितपणाचा मला अतिशय तिटकारा आला होता. पण ती वेळ कांहीं बोलण्याची नसल्यामुळें मी मूग गिळून राहिलों.

सर्व गांवांतून मिरवणूक हिंडविण्यांत आली. रात्रीं दहा साडेदहाचे सुमारास वेशीबाहेरील महादेवाचे देवळाजवळ मिरवणूक येऊन पोंचली. या देवळाच्या आवारांत एक मोठी विहीर असून ती 'महादेवाची विहीर' या नांवानें प्रसिद्ध होती. आमच्या गांवाला नदी किंवा ओढा नसल्यामुळें गणपतीचें विसर्जन या विहिरींतच करण्याचा प्रघात असे. त्याप्रमाणें या देवळाजवळ येतांच मिरवणूक थांबविण्यांत आली.

पालखी खालीं उतरतांच भास्करशास्त्री आपलें उपरणें सावरीत पुढें झाले व पालखीशेजारीं उभ्या असलेल्या अस्पृश्य भोयांना म्हणाले,

"दूर व्हा, विटाळ होईल. मला मंगलमूर्तीची आरती करावयाची आहे."

'कल्लूच्या कामगिरीचें हेंच बक्षीस काय?' असा प्रश्न माझ्या मनांत उभा राहिला.

भास्करशास्त्र्यांचे हे उद्धट उद्गार ऐकून स्वाभिमानी कल्लूला चेव आला. त्यानें लागलीच उत्तर केलें,

"शास्त्रीबुवा! मिरवणूक येथपर्यंत आम्हीं आणली आहे. आतां विसर्जनहि पण आम्हींच करूं. आतां तुमचं इथं कांहींच काम नाहीं. जा, घरीं जाऊन निजा स्वस्थ!"

"असला भ्रष्टाकार चालू द्यायला सनातन हिंदु धर्म आजच कांहीं मेला नाहीं. तुम्ही अस्पृश्य लोक म्हणजे सनातन आर्य धर्माला केराप्रमाणं आहां. तुमचा विटाळ देवाला कसा चालेल?" शंकरराव खराटे म्हणाले.

"मग आतांपर्यंत कसा चालला? मिरवणूक बिनबोभाट येथवर आम्हीं आणली व आम्हीच मूर्तीचं विसर्जन करणार. आमच्या कामागिरीचं बक्षीस म्हणून तरी मूर्तीच्या विसर्जनाची आम्हांस परवानगी द्या, म्हणजे आम्ही संतुष्ट आहों." कल्लू मजकडे वळून म्हणाला.

त्याची मागणी न्याय्य होती व ती मान्य करण्याची नैतिक जबाबदारी माझ्यावर असल्यामुळें मी तशी परवानगी देण्यास तयारहि झालों. इतक्यांत भास्करशास्त्री म्हणाले,

"तुम्ही पुष्कळ म्हणाल, कीं आम्हीच मूर्तीचं विसर्जन करूं म्हणून. पण विहिरीपर्यंत जाण्याला तुम्हांला मुळीं देवळाच्या आवारांत शिरूं देतो कोण?"

भास्करभटाचा प्रश्न बरोबर होता! मूर्ति तूर्त तरी अस्पृश्यांच्या ताब्यांत होती. पण त्यांना देवळाच्या आवारांत कोण शिरूं देणार?

कल्लूला कळून चुकलें, कीं ही गोष्ट अशक्य आहे. मुसलमानांनीं दंडेली सुरू केली तेव्हां हेच धर्ममार्तंड मिरवणूक बंद ठेवण्यास तयार झाले. पण अस्पृश्य बांधवांनीं देवळाच्या आवारांत शिरण्याची परवानगी नम्रपणें मागितली तेव्हां यांचा कडक सोवळेपणा व सनातनधर्माभिमान एकदम जागृत झाला! अस्पृश्यांनीं मुसलमानांप्रमाणें बडगा दाखविण्याचें मनांत आणलें असतें तर...? जग हें असेंच आहे. बळी तो कान पिळी!

धर्मनिष्ठ कल्लू देवळाच्या पवित्रपणाला बाट लागेल म्हणून मूर्तिविसर्जनाचा आपला आग्रह बाजूला सारण्यास तयार झाला. त्यानें मूर्तिला साष्टांग प्रणिपात केला.

"देवा, जनावराच्या जन्माला घाल; पण पुन्हा हा अस्पृश्याचा जन्म देऊं नकोस!" असे शब्द उच्चारून तो उठला. त्याच्या डोळ्यांतून पाणी वाहत होतें. अधिक उणा एक शब्दहि न बोलतां तो तडक तेथून निघून गेला. त्याच्या मागून त्याचे लोकहि निमूटपणें निघून गेले.

भास्करभट मोठ्यानें 'सुखकर्ता दुःखहार्ता वार्ता...' ही आरती म्हणत होता. मंडळी टाळ्या वाजवून साथ करीत होती. मला त्यांत कांहींच स्वारस्य वाटत

नव्हतें. मीं दूर देवळाच्या पायरीवर बसून आपल्याशींच विचार करीत होतों. माझ्या कानांत कल्लूचे, ‘देवा, जनावराच्या जन्माला घाल; पण पुन्हा हा अस्पृश्याचा जन्म देऊं नकोस.’ हे शब्द सारखे घुमत होते.

मूर्ति पाण्यांत सोडल्याचा व ‘गणपति बाप्पा मोरया’चा आवाज झाला. खिरापतीसाठीं तोबा उडाला. जो तो मिरवणुकीच्या व उत्सवाच्या यशस्वी-पणाबद्दल आपापली पाठ थोपटीत होता. देवळांतील भ्रष्टाकार वांचविल्याबद्दल भास्करशास्त्र्याची स्तुति होत होती.

मला यांपैकीं कशाचीच शुद्ध नव्हती. माझें शून्य मन कल्लूच्या शेवटच्या कारुणिक शब्दांभोवतीं घुटमळत होतें. वातावरणांतून जिकडून तिकडून माझ्या कानांवर तेच हृदयविदारक शब्द आदळत होते—

“देवा, जनावराच्या जन्माला घाल; पण पुन्हा हा अस्पृश्याचा जन्म देऊं नकोस.”

लेखनकाल— ऑगस्ट, १९३९.

---

# नावडती आवड

सदर्न मराठ्याची मेल व मी स्टेशनच्या आवारांत एकदमच येऊन पोंचलों. झटकन् पुण्याचें तिकीट काढून मी फलाटावर गेलों व समोर दिसला त्याच डब्यांत घुसलों. अरुंद तोंडाच्या भांड्यांत कांठोकांठ पीठ भरावें तसा तो डबा तोंडोतोंड भरला होता. मीं माझी ट्रंक व वळकटी दारांतच टाकली अन् दाराच्या तोंडांतल्या बाकावर कसाबसा टेकलों. दाराच्या खिडकींतून बाहेर पाहूं लागलों. स्टेशनवर फारशी गर्दी दिसत नव्हती. विस्तीर्ण मैदानावर मधूनच एखादें झाड दिसावें तद्वत् त्या लांबच लांब फलाटावर रेल्वेचा एखादा माणूस फरशीवर आपल्या वहाणांचा आवाज करीत फिरतांना दिसत होता. फलाटाच्या छताला अंतराअंतरानें टांगलेले गॅसचे दिवे मंदपणें जळत होते. बाकी दूर अंतरावर सर्वत्र काळोख दिसत होता आणि त्या काळोखांत रेल्वे लायनीपलीकडील झाडेंझुडपें एखाद्या अर्धजागृत स्वप्नाप्रमाणें अस्पष्ट व उदास दिसत होतीं.

मी शून्य मनानें त्या उदास देखाव्याचें अवलोकन करीत असतां गाडी केव्हां सुटली तेंहि मला कळलें नाहीं. मात्र फलाटापुढून गाडी पुढें धावतांच

माझ्यासमोरचे गॅसचे दिवे व स्टेशनची इमारत हीं नाहींशीं झालीं. समोर काभिन्न तमःसागर पसरला होता व धावणाऱ्या गाडीच्या वेगामुळें नजरेसमोरून झपाट्यानें जाणारीं झाडेंझुडपें त्या तमःसागराच्या लहानमोठ्या लाटांप्रमाणें दिसत होतीं. माझ्या आंतरिक स्थितीशीं संवादी असलेल्या या बहिःसृष्टीच्या देखाव्याचें अवलोकन करण्यांत मी इतका गुंग होऊन गेलों, कीं मी एका रेल्वेच्या डब्यांत माणसांच्या गलग्यांत आहे हेंहि मी विसरून गेलों. जणूं समानशील मित्र मिळतांच त्याच्याशीं माझें हृदय मूकसंभाषण करून आपला दुःखभार हलका करीत होतें!

परंतु जें मी विसरलों होतों त्याची आठवण करून देणारा एक उदारधी निघालाच! माझ्यापलीकडे बसलेल्या त्या महात्म्यानें माझ्या खांद्यावर आपला जाडजूड हात ठेवीत कांहींशा बोबड्या स्वरांत विचारलें,

"काय मिस्टर, कुठं जायचं तुम्हांला?"

भक्ष्याचा आस्वाद घेण्यांत गुंग झालेल्या वनराजाला व्यत्यय आणणाऱ्या शिकाऱ्याचा येतो तसा मला त्या गृहस्थाचा राग आला. वाघासारखे डोळे रोखून मीं त्याच्याकडे पाहिलें. तो पिकल्या केसांचा गृहस्थ बराच तुंदिलतनु होता. म्हातारपणचीं बहुतेक लक्षणें त्यानें आपल्या शरीरावर धारण केलीं होतीं. हातांतलि जीर्ण चंचींतील मळकट तंबाखूची चिमूट तोंडांत टाकून ती चघळीत गृहस्थमजकूर माझ्याकडे अपेक्षित मुद्रेनें पाहूं लागले.

"पुण्याला." गृहस्थमजकुरांचें आपादमस्तक अवलोकन केल्यावर बैदा टाळण्यासाठीं मीं एकाच शब्दांत तुटक उत्तर दिलें.

पण माळावर वस्त्राला चिकटलेलें कुसळ झाडून टाकूं पाहावें तों तें अधिकच चिकटतें तसेंच त्या म्हाताऱ्याचें झालें. 'पुण्याला' असें एकशब्दी उत्तर उघड उघड तुटक आवाजांत देऊन मी झटक्यानें मान वळवून खिडकींतून पुन्हा बाहेर पाहूं लागलों तरी तिकडे लक्षहि न देतां, जणूं आफ्रिकेच्या जंगलांत अचानक आपला गांवकरीच भेटला, अशा आनंदानें संतोषदर्शक स्वरांत तो म्हणाला,

"वा-वा! ठीक. आम्हीहि पण पुण्यालाच चाललों आहोंत."

कोणी न विचारतांच म्हाताऱ्यानें आपल्या माहितीची पडशी सोडली. मी

तिकडे लक्षहि न देतां बहिःसृष्टीच्या देखाव्यांच्या संवेदना कल्पनेच्या कॅमेऱ्यानें हृदयाच्या नेगेटिव्हवर उमटविण्याचें काम करीत होतों.

पण तो थेरडा कसला खट. त्यानें पुन्हा मला हातांनीं डिवचून माझ्या समाधीचा भंग करीत विचारलें,

" पुण्याला कशाला ? शिक्षणासाठीं ? "

" हं." त्याच्याकडे वळूनहि न पाहतां मी उत्तरलों.

" काय शिकतां ? कॉलेजमध्यें आहांत ? "

" हं."

" कोणतं कॉलेज ? आपलं--फर्ग्युसन कीं..."

ह्या त्याच्या फाजील चांभारचौकशांचा मला असा राग आला होता, कीं एक द्यावी ठेवून श्रीमुखांत, असाहि एक ओझरता विचार माझ्या संतत डोक्यांत येऊन गेला. पण माझ्या शैक्षणिक सुसंस्कृततेनें माझ्या न कळतच उत्तर केलें,

" नाहीं. मेडिकल स्कूल—"

" काय ? मेडिकल स्कूल ? एल्. सी. पी. एस्. ? " अचानक द्रव्यलाभ झालेल्या माणसाप्रमाणें तो म्हातारा आनंदानें ओरडला. " वा, अलभ्य लाभ ! अलभ्य लाभ ! तुमची ओळख झाली फार छान झालं. हा आमचा मुलगा ( आपल्या शेजारीं बसलेल्या एका वीस वर्षे वयाच्या तरुणाकडे बोट करून ) चंदूलाल. हाहि एल्. सी. पी. एस्.लाच जात आहे. त्याच्या ओळखीचं तिथं पुण्यास कुणी नाहीं. बरी तुमची ओळख झाली. जरा लक्ष ठेवाल ना आमच्या चंदूवर ? "

मीं चंदूकडे एक दृष्टिक्षेप केला.

मला वाटलें, बाहेरच्या तमःसागरानें हा मानवी देह धारण कला असावा !

चंदूलालनें आपले खोल गेलेले डोळे व उंचावलेलं नाक यांचा समन्वय पांढऱ्या काड्यांच्या गोल चष्म्यानें करण्याचा यत्न केला असावा असें मला वाटलें. त्याची उंच मान व मस्तक त्याच्या एकंदर शरीरयष्टीला मुठीसारखे शोभा देत होतें. ओठांच्या काळवटपणावर पुढें आलेल्या एका दातानें लहानसा पांढरट ठिपका ठेवल्यासारखा दिसत होता.

त्या दर्शनानें अंग शहारल्यासारखें होऊन मीं क्षणमात्र डोळे मिटून घेतले. आपले दोन्ही कृश हात जोडून चंदूलालनें मला केलेला नमस्कार स्वीकारण्याचेंहि भान मला राहिलें नाहीं.

"काय हो," म्हाताऱ्यानें पुन्हा आपली सरबत्ती सुरू केली, "तुम्हीं जी ही एल्. सी. पी. एस्.ची लाइन ठरवलीत तींत काय असं विशेष पाहिलंत? (मी त्याच्या ह्या अंगचटीनें कंटाळून त्याच्याकडे एका विशेष अर्थाची नजर फेकली.) नाहीं, विचारण्याचा आपला इतकाच हेतु, कीं आमच्या चंदूनंहि माझ्याशीं भांडून भांडून तीच लाइन निवडली. तेव्हां म्हटलं, खरंच ह्या कोर्समधें कांहीं फायदा असेल तर तो मला समजून सांगा, म्हणजे माझ्या मनाचं जरा समाधान होईल. मी चंदूला म्हणत होतों, तूं आपला सरळ बी. ए. एम्. ए. हो. पण तो ऐकेना. शेवटीं त्याची तीव्र इच्छा जाणून मींच आपली माघार घेतली. म्हटलं होईना का त्याच्या इच्छेप्रमाणं... पण खरंच का हो, हा डॉक्टरीचा कोर्स चांगला आहे?...

त्या थेरड्याच्या या आगंतुकीचा मला आतां इतका संताप आला, कीं एक अवाक्षरहि न काढतां मीं माझी वळकटी सोडली व तींतून एक चादर काढून फर्‌कन् ती डोक्यावरून अंगाभोंवतीं गुंडाळली व खिडकींतून बाहेर पाहत मीं झोपेचें सोंग केलें. गृहस्थ-मजकूर आतां मला सोडून इतर उतारूंना आपल्या पुत्राच्या डॉक्टरीच्या हट्टाचें पुराण खुलासेवार सांगूं लागले.

मीं वरकरणी झोपेचें सोंग आणलें असलें, तरी अंतःकरणांत पेटलेली निराशेची आग स्वस्थ कुठली निजूं द्यायला? उलट त्या आगींत म्हाताऱ्याच्या बोलण्यानें सारखें तूप ओतल्यासारखें होत होतें. कारण जसजसा तो म्हातारा आपल्या पितापुत्रांमधील शिक्षणाच्या कोर्सबद्दल मांडलेल्या वादाचा इतिहास सांगत होता, तसतसा तसलाच एक दुसरा प्रसंग माझ्या नजरेसमोर उभा राहत होता. त्या दुसऱ्या प्रसंगांत त्या म्हाताऱ्याच्या ठिकाणीं मला माझ्या वडील बंधूची मूर्ति दिसूं लागली व चंदूच्या ठिकाणीं मी स्वतःला पाहूं लागलों. या दोन चित्रांत फरक होता तो विषयव्यत्यासाचा होय. माझी

इच्छा आर्ट्सकडे जाण्याची असतां, माझ्या पालकत्वाच्या जोरावर दादानें मला डॉक्टरीच्या दावणीस बांधण्याचें ठरविलें होतें. आणि माझ्या विनवण्यांची किंचित्‌हि पर्वा न करतां त्यानें माझी मोट आज डॉक्टरीसाठीं पुण्यास रवाना केली होती. या घटनेमुळें, मी मनांतून स्वतःवरच अत्यंत चिडून गेलों होतों. तशा त्या माझ्या मनःस्थितींत म्हाताऱ्याच्या लोचटपणामुळें मला अधिकच राग आला. चंदूलालबद्दल तर माझें मन पुरेंच विटून गेलें! बाप चांगला आर्ट्स्कडे पाठवीत असतां हें ध्यान डॉक्टरीच्या रूक्ष कोर्सकडे वळलें. चांगलें पक्वान्न ताटांत पडत असतां शिळ्या भाकरीसाठीं हट्ट धरण्यासारखेंच चंदूलालचें तें कृत्य मला वाटलें. आणि त्या अरसिक गाढवाबद्दल मला अतोनात तिटकारा त्या क्षणापासूनच वाटूं लागला. मनाचा विचित्र धर्म— दुसरें काय!

त्या पितापुत्रांच्या वादांत अखेर चंदूलालनें आपला हेका खरा करून विजय मिळविला होता; आणि आम्हां भावाभावांमधील तसल्याच वादांत माझा पुरा पाडाव झाला होता. बळी द्यावयासाठीं चालवलेल्या बकऱ्याप्रमाणें मी अगतिक होऊन माझ्या इच्छेविरुद्ध केवळ वडील भावाच्या दुराग्रहानें आज पुण्यास जात आहे या कल्पनेनें तर माझा भडकाच उडाला! चंदूलालनें आपल्या पित्यावर विजय मिळविला तसा मला वडील भावावर कां मिळवितां आला नाहीं? या माझ्या दुर्बळपणाची मला आतां चीड आली. मी स्वतःवर, भावावर, चंदूलालवर, त्याच्या त्या बुढ्ढ्या बापावर—साऱ्या जगावर चिडून गेलों.

आणि दुर्बलांना प्राणवत् अशी जी सूडाची कल्पना ती माझ्या डोक्यांत सणसणली—

भावाला चांगला हात दाखविण्याचें मीं ठरविलें.

माझ्या इच्छेविरुद्ध माझ्यावर डॉक्टरीचा कोर्स लादतो काय? ठीक आहे बचमजी! म्हणावें मीहि आतां औषधालासुद्धां अभ्यास न करतां परीक्षा नापास होऊनच बंधुराजांच्या डोळ्यांत अनुभवाचें अंजन घालतों.

बस्, ठरला हा विचार! अस्सेंच—

एरवीं माझ्या अपमानाची भरपाई कशी होणार?

“ **काय** दिवाकर, आज तुम्ही मेडिकल स्कूलमधें नांव घालायला जाणार आहांत ना?”

आमच्या गांवचे नारायणराव मोकाशी पुण्यास सराफीचा धंदा करीत असत. त्यांचा आमचा पूर्वापार घरोबा बराच असल्यामुळें मी पुण्यास आल्यावर त्यांच्याकडेच उतरलों होतों. त्यांच्याच घरीं एक खोली भाड्यानें घेऊन मीं राहावें, म्हणजे गार्डियन या नात्यानें त्यांची माझ्यावर देखरेख अनायासेंच राहील अशी आमच्या कळकळीच्या बंधुराजांची योजना होती. त्याप्रमाणें मीं नारायणरावांच्या घरीं मुक्काम ठोकला. एक-दोन दिवसांत सर्व जुळवाजुळव करून मीं आपलें 'बिऱ्हाड' एका खोलींत थाटलें.

माझी कितीहि इच्छा नसली तरी वरकरणी मला मेडिकल स्कूलमध्यें नांव दाखल करणें प्राप्तच झालें होतें. त्यामुळें मनांत नसतांहि मला त्याची सर्व तयारी करावी लागली. कोणी ओळखीचें भेटलें, कीं त्याच्यापुढें या कोर्सच्या निवडीचा पाढा वाचावा लागे व त्यानें केलेलें अभिनंदन हसतमुखानें मला स्वीकारावें लागे. पण खरी मनची गोष्ट कोणाजवळ बोलावयाची चोरी. त्यामुळें वरकरणी प्रकाशित दिसणाऱ्या पण अंतरंगांत जळून काळ्या पडणाऱ्या दिव्याच्या वातीसारखी माझी अवस्था झाली होती. त्यांतून जो भेटे तो आपला माझ्या आवडत्या आर्ट्स कोर्सची भरपूर निंदा करून या डॉक्टरीच्या कोर्सची मात्र मनमोकळी स्तुति करीत असे; त्यामुळें माझा कोंडमारा सारखा वाढत होता व त्या प्रमाणांत माझा संतापहि वाढत होता. आणि कोंडलेला वाघ जसा पिंजऱ्यावरच दात-ओठ खातो तद्वत् मी त्या मेडिकल स्कूलवर मनांतल्या मनांत आग पाखडूं लागलों.

अशा माझ्या मनःस्थितींत आज मिळालेल्या अनपेक्षित धक्क्यानें तर मीं हतबुद्धच होऊन गेलों!

“अजून मेडिकल स्कूल जॉइन केलंस कीं नाहीं?” अशी विचारणा करणारें पत्र आजच दादाकडून आलें व त्याची भाषाहि जरा दरडावणीची होती. तेव्हां आज स्कूल जॉइन करण्याचें मीं ठरविलें. पण उत्साह कसला तो वाटेचना! एरवीं कॉलेजांत जायचें म्हणजे मला मोठी उमेद वाटायची. माझी कोण धांदल व धांवपळ व्हायची! रोज दाढीची साफसफाई व्हायलाच हवी. भट्टीच्या कपड्यांखेरीज कॉलेजला जाईल तो पुणेरी छकडा कसला?

पण आज या कसल्याच गोष्टीकडे माझें लक्ष नव्हतें. दादाचें तें दुष्ट पत्र एखाद्या सुईसारखें माझ्या डोळ्यांत सलत होतें. दावेदार बंधूचा मनाशीं उद्धार करीत मी खोलींत बसलों असतां एकाएकी माझ्या कानांवर प्रश्न आदळा—

"काय दिवाकर, आज तुम्ही मेडिकल स्कूलमधें नांव घालायला जाणार आहांत ना?"

भरधाव सुटलेल्या वारूचा लगाम एकदम खेचला गेल्यावर तो जसा ठेंच-काळतो, तद्वत् आत्मविचारांत गुंग असतां कानीं आलेल्या त्या अनपेक्षित प्रश्नानें मी चांगलाच दचकलों. दाराकडे वळून पाहिलें तों तेथें अन्नपूर्णाबाई—नारायणरावांची मेहुणी उभी होती! मीं झटकन् स्वतःला सावरीत म्हटलें,

"हो. कां? कांहीं काम आहे?"

"होय, म्हणून तर विचारलं मीं तुम्हांला." चेहऱ्यावर आर्जवी स्मित आणून त्या बोलल्या.

"या ना, आंत या." त्यांना बसावयासाठीं खुर्ची कांहींशी पुढें सरकवीत मीं म्हटलें.

त्याहि आंत आल्या व खुर्चीवर बसल्या.

"काय काम आहे तुमचं माझ्याकडे?"

"काम कांहीं फारसं नाहीं." पुन्हा चेहऱ्यावर तेंच आर्जवी स्मित आणून अन्नपूर्णाबाई सांगू लागल्या, "मी काल कादंबिनीसह इथं आलें तो तिच्या शिक्षणाचा हेतु मनांत धरूनच. यंदाच ती झाली मॅट्रिक पास. पुढं तिला डॉक्टरीच्या कोर्समधें घालावी, असं मीं ठरवलं..."

"काय? डॉक्टरीचा कोर्स?" भान न राहून मी एकदम ओरडलों. जणूं डॉक्टरीचा कोर्स म्हणजे अंदमानचा प्रवासच! आणि तो चंदुलाल, ही कादंबिनी, सारींच त्या प्रवासाला आपणहून निघालीं आहेत याचें मला आश्चर्य वाटलें. पण स्वतःची चूक तत्क्षणींच माझ्या लक्षांत येऊन मला ओशाळल्या-सारखें झालें.

"कां हो, असे दचकलातसे?" अन्नपूर्णाबाईनीं किंचित् विस्मयानें विचारलें.

"तसं नाहीं, त्याचं असं झालं..." मीं स्वतःला सावरीत थाप ठोकली, "तुमची न् माझी निवड एकच हें पाहून जरा नवल वाटलं इतकंच."

" अहो, म्हणून तर मी तुमच्याकडे आलें. काल इथं आल्यावर माईनं ( नारायणरावांची पत्नी ) सांगितलं, कीं तुम्हीहि मेडिकल स्कूलमधें जाण्यासाठीं इथं आलांत म्हणून. तेव्हां म्हटलं बरंच झालं. आमच्या कादंबिनीला आयती घरचीच सोबत मिळाली. तुमची तिला अभ्यासांतहि मदत होईल. या विचारानंच आतां मीं तुमची मुद्दाम गाठ घेतली. तेव्हां आज तुम्ही स्कूलमधें जाल तेव्हां कादंबिनीला घेऊन जा बरोबर टांग्यांतून अन् तिला जरूर ती मदत करा ! होईल ना एवढं काम ? ... "

" वा, काय प्रश्न हा ? " असं म्हणून मान उडवून मी हसलों. त्याहि हसत हसत निघून गेल्या.

चंद्रमौळी घरांत जेथें जावें तेथें डोक्यावर पावसाच्या धारा पाडाव्यात तशीच माझी अवस्था झाली. जो आपला भेटे तो डॉक्टरीकडेच जातो. तें चंदूलालचें काळें ध्यान त्या रूक्ष कोर्सकडे गेलें, याचें मला इतकेंसें वाईट वाटलें नाहीं. पण काल येथें आलेली ही कादंबिनीसारखी सुरेख मुलगीहि त्याच नीरस कोर्सकडे वळावी, याचा मला खेद वाटला. जिच्या मंजुळ आवाजांतून सुंदर संगीत ऐकावयास मिळावें, ती आपल्या ईश्वरदत्त मधुर आवाजाचा उपयोग मटीरिया मेडिका घोकण्याकडे करणार ! जिच्या नाजुक हातांनीं तत्सदृश कुसुमांशींच चाळा करण्यांत सार्थक मानावें, तेच लुसलुशीत हात प्रेतांच्या चीरफाडींत व्यग्र व्हावेत, ही कल्पनाच मला सहन होईना !

इतक्या नाजुक सौंदर्याचा इतका हृदयविदारक दुरुपयोग दुसरा क्वचितच असूं शकेल, असें मला वाटलें.

आणि मी म्हणे कादंबिनीला या रूक्ष अभ्यासांत मदत करणार !

दगडानें फुलाला कोमलपणा उसना देण्यासारखेंच हें होणार, असें मला वाटलें. कारण माझा तर निश्चय होऊन चुकला होता, कीं कांहीं झालें तरी पुस्तकास हातहि न लावतां चैनींत दिवस घालवून अपयश मुद्दाम ओढवून आणावयाचें अन् दादाच्या झारशाहीवर सूड उगवावयाचा !

मग मी कादंबिनीला अभ्यासांत कसली मदत करणार ?

जाऊं द्या झालें! कोण कसली मदत करतो म्हणा. करतां येईल कशी तरी चुकवाचुकवी न् टाळाटाळी. पण आज मात्र अन्नपूर्णाबाईंना कबूल केल्याप्रमाणें कादंबिनीला बरोबर घेऊन जावें अन् द्यावी तिला त्या स्कूलच्या दावणीला बांधून म्हणजे संपलें आपलें कर्तव्य! मग पुढचें पुढें पाहतां येईल.

असा विचार करून मी बसल्या जागेवरून उठलों व सहजच बाहेर जाण्यासाठीं टेबलावरची टोपी घेण्यास गेलों. टेबलावरच्या भिंतीशीं टांगलेल्या मोठ्या आरशांत मला माझा चेहरा दिसला. क्रीडांगणावर उगवलेल्या तुरळक गवतासारखी माझ्या गालावर दाढी वाढलेली मला त्या आरशांत दिसली. अर्रर्र! अशा विरूप चेहऱ्यानें का मी कादंबिनीबरोबर टांग्यांतून जाणार?

हा विचार मनांत येतांच नाटकांतील ट्रान्स्फर सीनप्रमाणें सर्वच गाडें बदललें. ताबडतोब बाहेर जाण्याचा बेत रहित करून नेहमींपेक्षां अधिक काळजीनें मीं दाढी केली. तोंडाला स्नो लावला. कॅश्मीर फासून केस नक्षीदार वळविले. भट्टीचे कपडे निवडले. या कार्यक्रमांत माझा इतका वेळ गेला, कीं खाणावळींतून जेऊन येऊन मी जेमतेम कपडे करावयास लागलों इतक्यांत, खुद्द कादंबिनीच माझ्या खोलीच्या दाराशीं येऊन मधुर स्मित करून म्हणाली,

"इश्श! हें काय? जायची वेळ नाहीं का झाली? मी केव्हांची तयार होऊन राहिलें आहे. बायकांच्यापेक्षांहि कांहीं कांहीं पुरुषांना जामानिमा करायला वेळ लागतो म्हणायचा!"

तिचा तो मोहक दृक्शर व तो विनोदी वाक्शर यांपैकीं कोणी माझ्या हृदयास अधिक घायाळ केलें तें सांगणें कठीण आहे. मदनाप्रमाणें स्त्रियांची शस्त्रेंहि नाजुक फुलांचींच असतात; पण त्यांनीं केलेल्या जखमा पोलादी शस्त्रांनीं केलेल्या जखमांपेक्षांहि अधिक जबर असतात. तरीहि त्या जखमांचे पुरुषांना दुःख न होतां उलट सुखच वाटावें, हें नवल नव्हे काय?

माझेंहि तसेंच झालें. कादंबिनीच्या त्या गोड हल्ल्याचा स्मित करून स्वीकार करीत मीं म्हटलें,

"चला, माझीहि तयारी झालीच."

आणि टांग्यांत तिच्या शेजारीं बसतांना एक विशिष्ट भावलहरी माझ्या

हृदयांत हेलावली. कादंबिनीला मीं आजच प्रथम पाहिलें होतें, असें नाहीं. नारायणरावांच्या घरीं पूर्वी अनेक वेळां तिची माझी गाठ पडली होती; व तिचें माझें बरेंचसें बोलणेंहि होत असे. तथापि, आजचा प्रसंग मला विशेष उन्मादकारक वाटला हें मी नाकबूल करीत नाहीं. कादंबिनीहि आज पुष्कळच मोकळेपणानें बोलत होती असं मला वाटलें. कदाचित् ती माझी कल्पनाच असेल. पण टांग्यांत बसल्यापासून तिची वृत्ति उल्हसित दिसत होती, एवढें खरें.

मेडिकल कोर्स घेण्यांत आपण काय हेतु मनांत धरला आहे, या कोर्सचा स्त्रियांना किती उपयोग होण्यासारखा आहे, वगैरे गोष्टी ती सांगत असतांना, माझा तो नावडता विषय असूनहि हास्यमुखानें तिचें बोलणें ऐकत राहावें, असेंच मला वाटूं लागलें. डॉक्टरीच्या कोर्सची माझी नावड तिला उघडपणें बोलून दाखविण्याचें धैर्य मला झालें नाहीं. इतकेंच नव्हे तर, तिच्या मधुर वाग्गंगेंत खंड पडूं नये म्हणून, तिनें विचारलेल्या तद्विषयक प्रश्नांस मीं खुशाल अनुकूल उत्तरें देण्यासहि कमी केलें नाहीं. तिच्या साविर्भाव मधुर भाषणाची मोहिनी माझ्यावर इतकी पडली, कीं सासून हॉस्पिटलच्या आवारांत आमचा टांगा थांबून आम्हांस उतरणें भाग पडलें तेव्हां हा सुखकर प्रवास इतक्या लवकर संपल्याचें पाहून, मला त्या टांगेवाल्याचा संताप आला! खांचखळग्यांच्या रस्त्यांतून टांगा धावत असतां बसणाऱ्या हादऱ्यांनीं एक-मेकांचा अंगस्पर्श होऊन उत्पन्न होणाऱ्या मधुर भावनेचा अनुभव घेत आमचा प्रवास दीर्घकाल चालला असतां तर किती बहार झाली असती, असा विचार टांग्यांतून उतरतांना माझ्या मनांत रेंगाळत होता!

आणि एकदां जमिनींत पडलेलें बीं तेथें मूळ धरून वृक्षस्वरूप पावतें तसेंच माझ्या त्या दिवशीच्या त्या विचाराचें झालें. पुढें रोजच कादंबिनीबरोबर मला हॉस्पिटलमध्यें जावें लागलें व त्यामुळें त्या विचाराच्या बीजाला सहप्रवासाच्या पुनरावृत्तीचें पाणी मिळत गेलें. घरींहि आमच्या गप्पांना आतां विषयाची उणीव पडेनाशी झाली. नवा शिक्षणक्रम, नव्या शिक्षणसंस्था,

नवे वर्गबंधु, नवीं पुस्तकें, सर्व कांहीं नवें !— जणूं आयुष्याला नव्याच जगांत सुरुवात झाली आहे असें वाटूं लागलें. त्यामुळें या नव्या अनुभवाबद्दल टीकारूप चर्चा करून आपापलीं बनलेलीं मतें एकमेकांकडे बोलून दाखविण्यांत व तद्द्वारा आपापल्या मनाची करमणूक करून घेण्यांत आरंभीच्या दिवसांपैकीं आमचा पुष्कळसा वेळ जाई. कादंबिनीशीं बोलत असतांना त्याच गोष्टींची फिरून फिरून चर्चा करण्याचाहि मला कंटाळा येत नसे. या सर्व विषयांवर ती प्रत्येक प्रसंगीं जीं मतें व्यक्त करी, तीं प्रसंगविशेषीं मला बालिश वाटली, तरीहि तीं ऐकावींशीं वाटत एवढें मात्र खरें ! व त्यामुळें तिच्याशीं संभाषणाचे प्रसंग मी शक्य तितके जास्त आणण्याकडे लक्ष देत असे.

हें जरी खरें असलें, तरी एका बाबतींत मात्र मी अत्यंत दक्ष राहण्याची खबरदारी घेत होतों. आणि तो विषय म्हणजे अभ्यासाचा. मी होऊन तर या विषयाला स्पर्शहि करीत नसे. पण, केव्हां कादंबिनीनें हा विषय काढलाच, तर हरतऱ्हा करून मी विषयांतर करण्याचा यत्न करीत असे. आतां या प्रयत्नांत म्हणजे मला नेहमींच यश येत असे, असें मात्र नव्हे. उदाहरणार्थ, मीं कितीहि टाळाटाळी केली तरी, कादंबिनीसाठीं वर्गाचें वेळापत्रक, प्रोफेसरांच्या लेक्चरांविषयीं व स्वभावाविषयीं नव्या विद्यार्थ्यांना आवश्यक वाटणारी माहिती, अभ्यासासाठीं कोणत्या ग्रंथकारांचीं कोणतीं पुस्तकें घेणें अवश्य असतें, वगैरे बातम्या जुन्या व आनुभविक विद्यार्थ्यांकडून आणण्याची कामगिरी कांहीं मला अंगाबाहेर टाकतां आली नाहीं. या रूक्ष बाबतींत आमचे आगगाडींतील ओळखीचे दोस्त चंदूलाल यांनीं मदत केली नसती तर माझी काय अवस्था झाली असती देव जाणे ! अगदीं पहिल्याच दिवशीं चंदूलालनें मला गाठलें व नंतर हळूहळू वरील विषयांवरील आपल्या माहितीचा संपूर्ण खजिना माझ्यापुढें खुला केला. मला त्या खजिन्याचें प्रदर्शन पाहण्याची मुळींच इच्छा नव्हती. पण कादंबिनीसाठीं मला त्या खजिन्यांतून ओंजळ भरून घ्यावी लागली.

पण, असल्या विषयाचा संपर्क मीं स्वतःला लावून घ्यावयाचा नाहीं, असेंच ठरविलें असल्यामुळें, कादंबिनीचे असले कांहीं शालोपयोगी प्रश्न सोडविणें मला कठीण होत चाललें तेव्हां मीं निराळीच एक युक्ति योजली. माझ्या अंदाजाप्रमाणें चंदूलाल हा पुस्तकांतील किडा निघाला. तेव्हां अभ्यासाच्या बाबतींत

मदत होईल म्हणून मींच त्याची कादंबिनीशीं ओळख करून दिली. उद्देश हा, कीं यामुळें तरी अभ्यासाबाबत कादंबिनीची माझ्यामागची पिरपिर कमी होईल.

आणि तशी ती झालीहि.—

प्रथमतः मला माझ्या युक्तीचा आनंद वाटला. पण मधाच्या आशेनें पोळें जवळ करूं पाहावें तों मधमाशांच्या चाव्यांनीं अंग पोळावें, तसाच माझ्या या युक्तीचा परिणाम झाला हें कांहीं दिवसांनीं माझ्या ध्यानीं आलें.

त्या दिवशीं कसलीशी सुटी असल्यामुळें जेवण झाल्यावर थोडी झोप काढून कादंबिनीबरोबर कॅरमनें खेळावें असा मीं मनाशीं बेत केला होता. म्हणून मीं दुपारीं तिच्या खोलीवर पाहिलें तों ती नाहीं. घरांतहि ती नव्हती. आतां येईल, मग येईल, अशा आशेवर मीं चार-साडेचारपर्यंत तिची वाट पाहिली. अखेरीस मी अगदीं कंटाळून गेलों. मनांतल्या मनांत तिच्यावर थोडा सतापलोंहि ! शेवटीं कंटाळून कुठें मित्राकडे तरी जाऊन यावें, म्हणून मी बाहेर पडलों तों दारांतच कादंबिनी भेटली. तिला पाहून मला आनंद झाला. पण पक्षी पिकावर बसतो न बसतो तोंच गोफणींतून दगड सुटावा तशी माझी अवस्था झाली. तिच्या गैरहजेरीमुळें आलेला संताप तिच्या त्या रम्यदर्शनानें नाहींसा होऊन मन कोठें जरा आनंदित होतें आहे, तोंच तिच्याबरोबर आलेल्या चंदूलालचें दर्शन होऊन माझी तळपायाची आग मस्तकास भिडली.

“ बाहेर का निघालांत ? ” कादंबिनीनें स्मित वदनानें विचारलें.

तिच्या प्रश्नाचें उत्तर न देतां, मींच उलट तिला प्रश्न केला,

“ आपण आलांत वाटतं फिरून ? ”

माझ्या स्वरांत तीव्रता व उपहास मिसळले होते, याची जाणीव मलाहि झाली.

“ इश्श ! ही का वेळ फिरायला जायची ? ” ती हसत हसत मोकळेपणानें म्हणाली, “ मी गेलें होतें स्कूलमधें अभ्यासाला. या चंदूलालनीं आज माझ्या बऱ्याच डिफिकल्टीज् सोडवून दिल्या.”

'मोठाच आलाय् पंडित हिच्या डिफिकल्टीज् सोडवणारा!' असें मनांत म्हणून मी एकदम तेथून निघून गेलों.

मीं चंदूलालचें पुढचें पुराण कादंबिनीच्या तोंडून ऐकण्याचें टाळलें खरें, पण माझ्या डोक्यांत फिरणारें त्याच्याबद्दलचें विचारचक्र कांहीं केल्या थांबेना. उलट तें या प्रसंगानें जोरानें चालू झालें. अगदीं प्रथमदर्शनापासून ज्या चंदूलालबद्दल माझ्या मनांत तिटकारा उत्पन्न झाला होता, त्याच्याशीं कादंबिनीची इतकी सलगी असावी, ही गोष्ट मला सहन होईना. मला आतां पक्कें आठवूं लागलें, कीं कादंबिनीची चंदूलालशीं ओळख झाल्या दिवसापासून अभ्यासानिमित्त त्या दोघांचा संबंध उत्तरोत्तर वाढत गेला व जी कादंबिनी पूर्वीं माझ्याशीं तास-तास मनमोकळ्या गप्पा-टप्पा करीत असे, तिला आतां माझ्याशीं चार-सहा औपचारिक व घरगुती प्रश्नांपलीकडे अधिक कांहीं बोलण्यास वेळ मिळेनासा झाला.

आणि हा सारा त्या रूक्ष विषयांच्या नीरस अभ्यासाचा परिणाम!

तो अभ्यासाचा विषय मी टाळीत होतों म्हणून कादंबिनी मला अशी टाळीत आहे, हें लक्षांत येतांच मला त्या मेडिकल कोर्सचा किती संताप आला असेल, याची कल्पनाच करा. शक्य असतें तर कोणा मुसलमान सुलतानाप्रमाणें मीं जगांतील साऱ्या मेडिकल लायब्ऱ्या जाळून भस्म केल्या असत्या. पण—

मग काय कादंबिनीला आपण असें वंचित व्हायचें?

त्यापेक्षां तिला तिच्या अभ्यासांत मनःपूर्वक झटून मदत केली, तर तिचें सहवाससुख पुन्हा नाहीं का लाभणार?

आणि असा तो अभ्यास आहे काय, कीं तो माझ्या हातून रेटणारच नाहीं? जें चंदूलालसारखें घुंगुरटें करूं शकतें तें मला केवळ अशक्य ठरेल!

आणि वात झालेल्या माणसाच्या अंगीं प्रचंड शक्ति यावी तसें मला झालें. माझी त्या विषयाची नावड, अभ्यास करण्याची अनिच्छा, नापास होऊन भावावर सूड उगविण्याची घोर प्रतिज्ञा वगैरे अडचणींचे पर्वत उल्लंघून

माझ्या इर्षेची गरुडभरारी कादंबिनीच्या प्रेमाच्या पैलतीराला जाऊन पोंचावयास मग फार अवधि लागला नाहीं.

माझी अभ्यासाची ही तयारी पाहून कादंबिनीनें एकदां मला म्हटलेंहि, कीं—

" अलीकडं काय इतकं अभ्यासाचं भूत शिरलंय् अंगांत? या मेडिकल स्कूलच्या अभ्यासाला अगदीं विष समजत होता— त्याचं आतां अमृत झालं वाटतं ? "

मीं उत्तर केलें नाहीं. मी तिच्याकडे पाहून हसलों मात्र.

ती म्हणाली तें खरें होतें.

विषाचें अमृत झालें होतें— पण, तें घडवून आणणारा जादूगार?

लेखनकाल— सप्टेंबर १९३२.

---

# परीक्षा

गिरगांव बॅक रोडवरील मंगळदास बिल्डिंगमधील जिन्याच्या पायऱ्या अधिऱ्या उत्सुकतेनें चढून दुसऱ्या मजल्यावरील पांचव्या गाळ्यांतील माझ्या बिऱ्हाडीं मी येऊन पाहतों तों काय? गाळ्याला कुलूप! जिवाचा आटापिटा करून स्टेशन गाठावें अन् फलाटावर जाऊन पोंचतों न पोंचतों तोंच गाडी सुटल्याचा भोंगा ऐकूं यावा, तशी माझी अवस्था झाली. या भलत्याच वेळीं बिऱ्हाडाला कुलूप लागलेलें पाहून मला आश्चर्य वाटलें व रागहि आला. केवढ्या उत्सुकतेनें मृणालिनीला भेटण्यासाठीं मी आलों होतों. आमच्या फर्मला यंदा व्यापारांत बराचसा फायदा झाल्यामुळें खूष होऊन साहेबानें आजपासून मला दहा रुपये बढती दिली होती. ही आनंदाची बातमी मृणालिनीला केव्हां एकदां जाऊन सांगेन असें मला झालें होतें, म्हणून साहेबाच्या खास परवानगीनें आज दुपारीं तीन वाजतांच मी ऑफिसांतून सटकलों होतों. आज अस्मादिकांची स्वारी अत्यानंदामुळें खुषींत होती. या आनंदाचा उपभोग मृणालिनीसह आज पुरेपूर घेण्याचें मीं मनाशीं ठरविलें; व म्हणून ऑफिसांतून घरीं परत येतां येतां पेंढारकरांच्या आजच्या नाटकाचीं दोन तिकिटेंहि मीं रिझर्व केलीं.

पण पाण्यांत बुडून पोहण्याचा आनंद लुटूं इच्छिणाराचें डोकें पाण्याखालीं दडलेल्या खडकावर आपटावें, तसें आमच्या बिऱ्हाडास लागलेलें कुलूप पाहून मला झालें. मिठाच्या एकाच खड्यानें सगळें दूध नासून टाकावें त्याप्रमाणें मृणालिनीच्या या गैरहजेरीमुळें माझ्या साऱ्या आनंदावर पाणी पडलें. या झालेल्या निराशेमुळें मला मृणालिनीचा फारच राग आला, पण काय करणार? आपलेच दात व आपलेच ओठ. मी मुकाट्यानें कुलूप काढून आंत गेलों व कपडे काढून चहा करण्याच्या तयारीला लागलों. स्टोव्ह पेटविला व चहाच्या सामानाची जमवाजमव करूं लागलों. चहाच्या भांड्यांत पाणी ओतून तें स्टोव्हवर ठेवलें व चहा-साखर पाहूं लागलों, तों काय? साखरेचा डबा अजीबात रिकामा! उन्हाच्या माऱ्यानें तापलेल्या डोक्याला विश्रांति देण्या-साठीं झाडाखालीं मोठ्या आशेनें गेलेल्या खल्वाटाच्या डोक्यांत वरून नारळ पडावा, तशीच माझी दशा झाली!

या भलत्याच वेळीं मृणालिनी मला आगाऊ न सांगतांसवरतां बाहेर निघून गेल्यामुळें, आधींच माझ्या आनंदावर पडलेल्या निराशेच्या थंड पाण्यांत साखरेच्या या खडखडाटानें बर्फ टाकल्यासारखें झालें. रोजच्याप्रमाणें हसत-मुख मृणालिनीच्या प्रेमळ हातांतील गोड चहा पिण्याचें भाग्य आज माझ्या नशिबीं नव्हतें, म्हणून मला स्वतःलाच स्टोव्हची आराधना करावी लागली. त्यामुळें मृणालिनीच्या गैरहजेरीमुळें मला आलेल्या रागाचा पारा कांहीं अंशांनीं चढला. त्यांत साखरेचा डबा रिकामा दिसल्यामुळें तर मृणालिनीचा मला भारी संताप आला. वड्याचा राग वांग्यांवर काढावा त्याप्रमाणें तो डबा दणकन् जमिनीवर आपटून व स्टोव्हची किल्ली सोडून 'गेली तरी कुठें भवानी या उन्हातान्हांतून' असा विचार मनाशीं करीत, मी बाहेरच्या माझ्या बैठकीच्या खोलींत आरामखुर्चीवर येऊन पडलों.

शरीर आरामखुर्चीवर पडलें तरी मन कांहीं 'आराम' पावलें नव्हतें. उलट चहाच्या अभावामुळें मनाची अस्वस्थता वाढली मात्र. ती शांतविण्यासाठीं जवळच्या एखाद्या हॉटेलांत जाऊन यावें म्हणून मी उठलों व अंगांत शर्ट अडकविलाहि. इतक्यांत मला आठवण झाली, कीं डब्यांतील साखर संपली असली, तरी कोठीच्या कपाटांत ती असण्याचा संभव आहे. भक्ष्य दिसतांच मांजर जसें टुणकन् उडी मारतें, त्याप्रमाणें मी झटकन् कोठीच्या

फडताळाकडे वळलों. पण माझ्या दुर्दैवानें माझा आज पुराच पिच्छा पुरविण्याचें ठरविलें असावें असें दिसलें. कारण कोठीच्या फडताळालाहि एक गलेलठ्ठ कुलूप लोंबकळतांना दिसत होतें. त्या निर्जीव कुलपाकडे मीं रागानें तीव्र नेत्रसंधान फेकलें. पण जलताडनासारखीच तीं माझी कृति निष्फळ होती हें लक्षांत येऊन माझें मलाच किंचित् हसूं आलें !

या फडताळाची किल्ली नेहमींप्रमाणें मृणालिनीच्या मेजाच्या खणांत ठेवलेली असणार म्हणून मी तिच्या खोलींत गेलों. दारांतून आंत डोकावतांच समोरच्या कपड्याच्या कपाटाचें दार घाईघाईनें मिटविल्यामुळें अर्धवट उघडेंच राहिलें असल्याचें मला दिसलें. तसेंच डाव्या हातच्या पलंगावर मृणालिनी जें लुगडें नेसली होती, तें फेकलेल्या स्थितींत लोळत होतें. स्वाभाविक जिज्ञासेनें मीं तें कपाटाचें अर्धवट उघडें राहिलेलें दार पूर्णपणें उघडून पाहिलें. तिच्या अत्यंत आवडीचें पारवें पातळ व गुलाबी ब्लाउझ आपल्या नेहमींच्या जागेवर दिसत नव्हता. एकूण बाईसाहेब चांगला थाटमाट करून, मला न सांगतां-सवरतां निघून गेल्या अं !

मीं त्या कपाटाचें दार धाडकन् ढकलून दिलें व कोठीच्या फडताळाची किल्ली मिळविण्यासाठीं मृणालिनीच्या ड्रेसिंग टेबलाकडे वळलों. उजव्या हातचा खण थोड्याशा रागानें जरा जोरानें हिसकला. डावा खणहि उघडून पाहिला; पण फडताळाची किल्ली कांहीं दिसेना. मृणालिनीचा मला असा राग आला होता, कीं या वेळीं ती समोर असती तर टेबलाचा तो खण सबंध बाहेर काढून तिच्या अंगावर फेकण्यास मीं कमी केलें नसतें. जरा घुस्शांतच उघडलेला खण मीं आंत ढकलला. पण, तो आंत जाईनाच! म्हणून रागानें मीं तो आणखी थोडा पुढें ओढला तों, तो एकदम जमिनीवरच आपटला. खणांतील सारें सामान इतस्ततः पसरलें. संकटें जूट करून येतात असें म्हणतात, तें आज माझ्या पुन्हा प्रत्ययास आलें !

मी अगदीं वैतागून गेलों; पण करणार काय? आपल्याशींच धुसफुसत फुसफुसत मी तें सामान परत त्या खणांत भरूं लागलों. धन्याची नजर चुकवून एखादें कोंकरूं कळपांतून निसटावें त्याप्रमाणें वरचे कांहीं कागद खणांत ठेवीत

असतां एक बंद केलेलें पाकीट त्यांतून निसटून खालीं पडलें. मीं तें साहजिकच उचलून पाहिलें. खास तें पत्र मृणालिनीनेंच लिहिलेलें असलें पाहिजे. पत्त्याचें हें सुंदर गोलाकृति अक्षर काय आपल्या परिचयाचें नाहीं? पण तिनें त्याला हें पत्र लिहिल्याचें या पत्त्यावरून दिसतें, तो हा मनोहर गोडांबे कोण? तिची अन् ह्याची ओळख कुठली? केव्हांची—अन् कशी? मीं तर या मनोहर गोडांब्याचें नांव तिच्याकडून केव्हांच ऐकिलें नव्हतें. मग हें काय 'रहस्य' आहे?

माझ्या पुरुषी हृदयांतील फाल्गुनराव जागा झाला. त्या पत्राकडे एकवार मीं एक विषदिग्ध दृष्टिक्षेप केला. हिंदुस्थानचा शोध लावण्याच्या मोहिमेवर निघालेल्या कोलंबसाच्या हातीं अमेरिका अभावितपणें लागली, त्याचप्रमाणें कोठीच्या फडताळाच्या किल्लीचा शोध लावीत असतां अवचित हें पत्र माझ्या हातीं लागून, जणूं काय मृणालिनीच्या मला आजवर अज्ञात असलेल्या रहस्याच्या कपाटाची ही किल्लीच मला सापडली असें मला वाटलें.

तें पत्र बंद करून त्यावर पत्ताहि लिहिलेला दिसत होता, पण पोस्टांत टाकण्याचें मात्र विसरून राहिलें असावें. टरकन् तें पत्र फोडून मीं एकदम वाचण्यास सुरवात केली—

"चरणीं सेवेशीं,

एखाद्या बागेंत फलपुष्पसंपन्न वृक्षाशेजारींच एक नाजुक वेली उगवावी, व त्या वृक्षाच्या उदार सावलीखालीं ती वाढावी, दिवसगतीनें त्या वृक्ष-वेलींच्या मनांची मिळणी व्हावी, म्हणजे त्या वेलीला वाटूं लागतें, कीं आपलें आयुष्य या प्रेमळ वृक्षाच्या अंगावर खेळण्याबागडण्यांतच जावें. वेली अशीं मनोज्ञ सुखस्वप्नें कल्पनेनें आपल्या मानसनेत्रांसमोर नाचवूं लागते न लागते तोंच, बागेच्या माळ्यानें येऊन शेजारीं एक कामट्यांचा मांडव घालून, त्या वेलीला, तिच्या इच्छेविरुद्ध, त्या मांडवाशीं संलग्न करून टाकावें अशीच कांहींशी माझी अवस्था झाली आहे म्हणायची! पण यांत माझा काय बरें दोष आहे? बाबांच्या कठोर कृतनिश्चयाच्या विरुद्ध जाण्याइतकें धैर्य मज अबलेमध्यें कुठून येणार? माझ्या ललाटीच्या या विधिलिखितामुळें माझा सारा जन्म

दुःखाच्या खाईंत होरपळत जाणार! मीं आपल्या खऱ्या प्रेमाकडे पाठ केली, त्याचें देव मला योग्य तेंच प्रायश्चित्त देतों आहे असें म्हटलें पाहिजे, दुसरें काय!

परवांपर्यंत मी किती सुखी होतें. आपला उभयतांचा विवाह होऊन आपण सुखाचा संसार थाटूं, यंव करूं, त्यंव करूं, अशा किती तरी आशा मीं हृदयाशीं बाळगल्या होत्या. पण मोठ्या मेहनतीनें उभार-लेला पत्त्यांचा मनोहर बंगला वाऱ्याच्या झुळुकेनें क्षणार्धांत उधळून लावावा, त्याप्रमाणें या माझ्या लग्नानें माझ्या व त्याबरोबरच आपल्याहि सर्व आशा मातीस मिळविल्या. मुक्या जनावराला मालक वागवील तसें निमूट वागणें भाग असतें, तशीच आम्हा स्त्रियांची आपल्या समाजांत स्थिति आहे.

पण मनोहरपंत, माझ्या शरीरावर जरी आता दुसऱ्याची सत्ता असली, तरी माझें मन, माझें अंतःकरण, यांवर मात्र आपल्या प्रेमाची मधुर मालकी अद्यापहि पूर्वीप्रमाणेंच कायम आहे. प्रेमाचा बाजार कोणालाहि मांडतां येत नाहीं. हृदयाचें दान आयुष्यांत एकदांच देतां येतें. तें दान मी आपल्याला केव्हांच देऊन चुकलें आहे. जें केवळ हृदयानेंच देतां येण्यासारखें आहे, त्या प्रेमांत माझ्या शरीराच्या स्वामींना वाटा कसा मिळेल? माझ्या लग्नामुळें मी एकीकडे मन व दुसरीकडे तन, अशा द्विधा मनःस्थितींत सापडलें आहे. या तन व मन यांच्या लढ्यांतून सुटण्याचा मला एखादा मार्ग आपण तरी सुचवूं शकाल काय?

मी दुसऱ्याची झालें म्हणून मजवरील आपल्या प्रेमांत खंड पडूं देऊं नका अशी नम्र विनंति आहे. अधूनमधून भेटीचा योग आणल्यास माझ्या दुःखी हृदयाचें तेवढेंच सांत्वन होईल."

पाण्यांत पडलेली माशी तडफडावी तसा रागाच्या तडाख्यांत सापडलेला माझा जीव तडफडत होता. मला कांहीं सुचेनासें झालें. फुलांची माळ म्हणून मी जिला हृदयाशीं कवटाळून धरीत होतों ती अखेर काळी नागीण निघाली अं! मृणालिनीचें माझ्याशीं लग्न होऊन आज वर्ष तरी सहज होऊन

गेलें असेल. पण तिच्या आयुष्यांत अशी कांहीं तरी गूढ व रहस्यमय कादंबरी लपून बसलेली असेल, अशी शंकाहि मला कधीं आली नाहीं. सुखाच्या अत्युच्च शिखरावरून मी दुःखाच्या दारुण दरींत फेकला गेलों.

हें सारें खरें असेल का? माझ्या मनानें शंका काढली. एक वर्षाच्या आपल्या वैवाहिक आयुष्यांत मृणालिनीचें आपल्याशीं जें वर्तन झालें, त्यांत संशय घेण्याला जरासुद्धां जागा कधीं आढळली नाहीं. तिचें आपणावर किती निर्मळ व हार्दिक प्रेम असल्याचें आपल्या प्रत्ययास आलें आहे! छे, हें नसेलच खरें! मृणालिनी पहिल्यापासूनच थोडी खोडसाळ व चेष्टेखोर आहे. तिच्या या खोडसाळपणाचाच हा मासला असावा! जर या पत्रांतील हकीकत खरी असेल तर तिनें पत्रावर सही कां नाहीं केली? छे, हें सर्व खरें नसेलच! मृणालिनीविषयीं अशी शंका घेणें म्हणजे शुक्राच्या चांदणीवर हीनतेजाचा आरोप करण्यासारखेंच आहे.

मनाच्या आंतल्या गाभाऱ्यांत या विचाराचा लामण दिवा मिणमिणे खरा; पण माझ्या संशयाच्या विजेच्या झगझगाटापुढें त्याचा प्रकाश मुळींच पडेना. स्त्रियांचें चरित्र ब्रह्मदेवालासुद्धां जाणतां येत नाहीं म्हणतात तें काय उगीचच? शिवाय, मृणालिनीच्या हातचा हा लेखी पुरावा आपल्या हातीं असतांना आतां शंका कसली? त्या पत्राकडे नजर जातांच, समुद्राची परतलेली लाट पूर्वीपेक्षां जोरानें उसळावी, त्याप्रमाणें माझा राग चेतविला गेला.

मला मृणालिनीचा अतोनात संताप आला. तिला असेल तेथून ओढून आणून याचा जाब विचारावा असें मला वाटलें. त्या विचाराच्या आवेशासरसा मी बसलेला उठलोंहि; पण मृणालिनी कोठें गेली आहे हें कोठें मला ठाऊक होतें? मग जाणार कोठें आणि तिला आणणार कशी?

ती त्या पाजी मनोहर गोडांब्याला तर भेटायला गेली नसेल? हो, असेंच असलें पाहिजे. म्हणून तर आपणाला आगाऊ कांहींच न कळवितां ती निघून गेली. एवढया भर उन्हाचें जायचें नाहीं तरी तिचें काय अडलें होतें? मी ऑफिसला गेल्यावर दुपारच्या वेळीं ती अशीच वरचेवर त्या पाजी माणसाकडे जात असावी. त्या पाजी प्रियकराची भेट घेण्यासाठीं म्हणूनच तिनें आज पारवें पातळ नि गुलाबी ब्लाऊझ हा आपल्या आवडीचा पोषाक केला असावा, हें समोरच्या अर्धवट उघड्या कपाटाकडे दृष्टि जातांच माझ्या ध्यानीं आलें.

—आणि अंगाचा नुसता आगडोंब झाला!

काय करूं रे? अस्साच मनोहरच्या बिऱ्हाडीं जाऊन त्या दोघांनाहि लाथेच्या ठोकरीनें उडवूं काय?—

मनोहरचा पत्ता समजून घेण्याच्या उद्देशानें खालीं पडलेला त्या पत्राचा लिफाफा मीं खसकन् ओढून पाहिला. पण त्यावर—

श्रीयुत **मनोहरपंत गोडांबे,**
गंगानिवास, मुंबई.

येवढाच पत्ता होता. एवढया पत्त्यावरून त्या मनोहरचा ठावठिकाणा लावूं पाहणें म्हणजे सागराच्या लाटा मोजण्यासारखेंच मूर्खपणाचें होतें. रागानें मीं त्या लिफाफ्याचे तुकडे तुकडे करून ते फेकून दिले! जणूं त्या लिफाफ्यानेंच माझ्या मृणालिनीला पळवून नेलें होतें.

मला कांहीं सुचेनासें झालें. मीं दाणदाण पाय आपटीत खोलींत येरझारा घालूं लागलों. मृणालिनीचा शोध घेण्यासाठीं माझे डोळे खोलीभर फिरत होते, ते आतां एका ठिकाणीं खिळून राहिले. माझे पायहि येरझारा घालण्याचें विसरून जागच्या जागीं खिळून राहिले. माझ्या डोळयांतून जणूं अग्निवर्षाव होत होता.

समोरच्या भिंतीवर मृणालिनीचा एन्लार्ज केलेला बस्ट्फोटो मोठ्या दिमाखानें माझ्याकडे पाहून हसत होता!

लग्न झाल्यानंतर लवकरच मीं तो मुद्दाम एका प्रसिद्ध फोटोग्राफरकडून काढवून घेतला होता. तो खुद्द मृणालिनीला व मला स्वतःलाहि इतका आवडला होता, कीं नित्यदर्शनासाठीं मीं तो त्या खोलींत अगदीं प्रमुख ठिकाणीं टांगला होता. हा फोटो माझा अगदीं आवडता होता आणि त्याच्याकडे पाहत राहून मृणालिनीच्या विरहाचा काळ मी घालवीत असे.

आज मात्र तो फोटो मला दृष्टिसमोरहि नकोसा झाला. त्या फोटोंतील मृणालिनी माझ्याकडे पाहून उपहासानें हसत आहे असें मला वाटलें. मला तें दृश्य बघवेना. मी दातओठ चावून पुढें झालों. दोन्ही हातांनीं मीं तो जोरानें हिसकला. फोटो ज्या दोरीनें खुंटीवर टांगला होता ती तटकन्

तुटली. फोटो माझ्या हातीं आला. मीं एकवार त्याकडे क्रुद्ध नजरेनें पाहिलें आणि दणकन् जमिनीवर आपटला. फ्रेमला लावलेली काच खळ्कन् फुटली. माझ्याहि संसाराच्या चित्राला लाविलेली सुखाची काच मृणालिनीच्या त्या पत्रामुळें अशीच फुटली नव्हती काय?

फोटोची काच फुटली, तरी आंतील मृणालिनीचें छायाचित्र तसेच होतें तें मीं फ्रेममधून हिसकलें. कांहीं क्षण त्याकडे एकसारखी टक लावून पाहिलें आणि नंतर एक काडी पेटवून तीवर मीं तो फोटो धरला!

फोटो अर्धामुर्धा जळला असेल-नसेल तोंच पाठीमागून तो कुणी तरी माझ्या हातून हिसकून घेतला. नेम धरून लक्ष्यावर आतां बाण सोडणार, इतक्यांत धनुष्याची दोरी तुटावी तसें मला झालें. मीं रागानें मागें वळून पाहिलें--

ती मृणालिनी होती!

एखाद्या क्रुद्ध नागिणीप्रमाणें ती माझ्याकडे पाहत होती. संतापानें तिच्या नाकाचा शेंडा लाल झाला होता, डोळ्याची पापणीहि न हलवितां ती माझ्याकडे रोखून पाहत होती. नाकांतून जोरानें चाललेल्या श्वासोच्छ्वासामुळें तिचा उरोभाग एकसारखा वरखालीं होत होता!

तिनें तो जळत असलेला फोटो विझवून दोन्ही हातांनीं आपल्या छातीशीं धरला आणि मजकडे क्रुद्ध दृष्टिक्षेप करून तिनें विचारलें,

"कां, आज माझ्या फोटोवरसा राग? त्यानं काय आपलं घोडं मारलं आहे?"

रागामुळें तिच्या तोंडून शब्दहि धड बाहेर पडत नव्हता. तिचा तो अवतार पाहून मी तिच्याकडे पाहतच राहिलों! तिला काय उत्तर द्यावें, या विचारांत माझें मन कांहीं क्षण गोंधळलें. पण कांहीं क्षणच! माझ्या हातांतील मृणालिनीच्या त्या पत्राकडे माझी नजर जातांच माझें पौरुष जागें झालें.

मीं ताडकन् उत्तर केलें—

"त्यानं नसेल मारलं माझं घोडं, पण त्याच्या मालकिणीनं हत्ती मारला आहे ना? एवढ्या उन्हाची असा थाटमाट करून कुठं गेली होती आपली धिंडका? आपल्या भेटीवांचून कुणाचे पंचप्राण गळ्याशीं आले होते?..."

माझें बोलणें पुरें होण्यापूर्वींच मृणालिनी हसूं लागली. तिचा राग आतां गेला असावा. आपल्या तिरप्या डोळ्यांतून मजकडे दृष्टि रोखून हसत हसत ती म्हणाली,

"एवढ्याचसाठीं का हा सारा गहजब? बाई, बाई, बाई! काय तरी घायकुत्या स्वभाव हा! मी गेलें होतें खारला माझ्या मावसबहिणीकडे, बरं का फाल्गुनराव?"

तिनें पुन्हा एकवार हास्याची लकेर सोडली. तिच्या या खोडसाळपणानें व विशेषतः फाल्गुनराव म्हणून मला चिडविण्याच्या प्रयत्नानें मला भारीच चेव आणला. मीं ताडकन् प्रश्न केला,

"मावसबहिणीकडे कीं मनोहरपंताकडे?"

"मनोहरपंत? हा कोण मनोहरपंत?" तिनें विस्मयचकित मुद्रा करून विचारलें.

"हा कोण मनोहरपंत तें हें पत्र वाच म्हणजे येईल तुझ्या ध्यानीं. वाच–"

मीं तें पत्र तिच्या अंगावर फेकलें. तिनें एकवार त्या पत्रावरून नजर फिरवली आणि ती आपल्याशींच हसली.

"मला वाटलं होतं तसंच झालं म्हणायचं. एकूण मीं केलेली आपल्या स्वभावाची परीक्षा अगदींच चुकली नाहीं म्हणायची."

असें अर्धवट आपल्याशीं व अर्धवट मला उद्देशून बोलून ती पलंगाकडे गेली व पलंगाखालून तिनें कसलेंसें एक जाड पुस्तक काढलें व त्यांतील एक विशिष्ट पान उघडून तें पुस्तक माझ्या हातीं देत तिनें कुचेष्टेच्या स्वरांत म्हटलें,

"हं फाल्गुनराव, हें वाचा म्हणजे कळेल तो मनोहरपंत कोण आहे तो."

मीं पुस्तकाकडे पाहिलें. साहित्यसंग्रह मासिकाची ती तीन वर्षांपूर्वीची बांधीव फाईल होती. मृणालिनीनें त्यांतील जें पान उघडून दिलें होतें त्या पानावर स्वतः मींच लिहिलेली 'तन आणि मन' नांवाची गोष्ट छापलेली होती. त्या गोष्टींतील नायिकेचें लग्न तिच्या इच्छेविरुद्ध तिचा बाप नायकाला सोडून दुसऱ्याशीं लावून टाकतो, त्यामुळें एकीकडे तन व दुसरीकडे मन अशी त्या नायिकेची स्थिति कशी होते, या गोष्टीचें शब्दचित्र मीं त्या

गोष्टींत काढलें होतें. त्या गोष्टीचा आरंभ नायिकेच्या ज्या पत्रानें केला होता त्याच पत्राची नक्कल, म्हणजे मृणालिनीचें तें पत्र होतें!

"का? झाली का संशयानिवृत्ति! आपली परीक्षा पाहण्यासाठींच मीं तें पत्र लिहून ठेविलं होतं. एकूण पुराणांतलीं वांगीं पुराणांत म्हणतात, तें कांहीं खोटं नाहीं." माझ्याकडे खोडसाळ टक लावून मृणालिनी कुत्सितपणें म्हणाली.

पण या खेपेस तिचा मला मुळींच राग आला नाहीं. शेतांत माजलेलें तण खुरपून टाकल्यावर पेरलेलें धान्य भरारून उगवावें, त्याप्रमाणें मनांतील नसत्या संशयाची निवृत्ति होतांच, मृणालिनीवरचें माझें प्रेम पूर्वीपेक्षांहि जोमानें हृदयांत उसळी मारूं लागलें.

मी तिला हृदयाशीं ओढून तिचें खट्याळ हसरें तोंड बंद करून टाकणाऱ्या मुक्या मंत्राचा तिजवर प्रयोग केला!

दुसऱ्या दिवशीं मृणालिनीचा पुन्हा एक मोठा एन्‌लार्ज फोटो आणून मीं पूर्वीच्या ठिकाणीं लावला. मृणालिनीनें मात्र या प्रसंगाचें स्मारक म्हणून तो अर्धवट जळका फोटोच फ्रेम करून आपल्या टेबलावर ठेवून दिला!

लेखनकाल—मार्च, १९३२.

---